नागेशकविकृत

# सीतास्वयंवर

( मूळ, प्रस्तावना, टीपा व शब्दकोश यांसह )

संपादक

दत्तात्रेय सीताराम पंगु, एम्. ए.,
मराठीचे प्रोफेसर, राजाराम कॉलेज, कोल्हापूर.



नोव्हेंबर १९३७ ] [ मूल्य २॥ रुपये

## आमच्याकडे एजन्सी असलेलीं कांहीं पुस्तकें

| | | रु. आ. पै |
|---|---|---|
| १ | महात्माजींची आत्मकथा, भाग १ व २ | २– ०–० |
| २ | स्वराज्य शिष्टाई ( महात्मा गांधी ) | ०– ६–० |
| ३ | हिंडलग्याचा प्रसाद ( काका कालेलकर ) | ०– ९–० |
| * ४ | हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें ( प्रो. राधा कृष्णन् ) | १– ०–० |
| * ५ | उपनिषदांतील दहा गोष्टी ( आवृत्ति २ री ) | ०– ६–० |
| * ६ | विद्यार्थी–जीवन ( ,, ) | ०– ८–० |
| * ७ | फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास (देवगिरीकर) | १– ०–० |
| ८ | संयम कीं स्वैराचार ? ( महात्मा गांधी ) | ०– ८–० |
| ९ | कॉंग्रेसचा इतिहास ( आवृत्ति दुसरी ) | २– ०–० |
| १० | समाजवादच कां ? ( जयप्रकाश नारायण ) | ०–१०–० |
| ११ | सोशॅलिझम ( पां. वा. गाडगीळ ) | १– ०–० |
| १२ | खानबंधूंचा अल्प परिचय ( प्रेमा कटंक ) | ०– ९–० |
| १३ | जवाहरलाल नेहरू ( आत्मचरित्र ) | ५– ०–० |
| *१४ | विश्राम ( साने गुरुजी ) | ०–१०–० |
| *१५ | भारतीय संस्कृति ( ,, ,, ) | १– ८–० |
| *१६ | श्याम ( ,, ,, ) | १– ०–० |
| १७ | सोंन्या मारुती ( ,, ,, ) | ०–१२–० |
| १८ | धडपडणारीं मुलें ( ,, ,, ) | १– ०–० |
| १९ | आजचें स्वराज्य ( वा. वा. जोशी ) | ०– ६–० |
| २० | काम आणि कामिनी ( प्रेमा कंटक ) | २– ८–० |
| २१ | आधुनिक भारत ( शं. द. जावडेकर ) डिसेंबरमध्यें प्रसिद्ध होईल. | |
| २२ | मोठ्यांच्या छोट्या गोष्टी ( साने गुरुजी ) | ०– २–० |

**महाराष्ट्र ग्रंथभांडार**, प्रकाशक व पुस्तक विक्रेते, महाद्वार रोड कोल्हापूर.

---

* हीं पुस्तकें मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड सरकार विद्याखात्यांनीं शाळांकरितां मंजूर केलीं आहेत. विद्यार्थी–जीवन हें टेक्स्ट म्हणून सुरू केलें आहे.

# कवि नागेश

## ( चरित्र व काव्यविवेचन )

### प्रस्तावना.

महानुभावीय कवीपासून तों मोरोपंतापर्यंतच्या प्राचीन कवींचे, दोन वर्ग पाडले जातात. अध्यात्माच्या किंवा भक्तीच्या बैठकीवर बसून, बहुजन समाजाला परमार्थाची गोडी लावण्यासाठीं, ज्यांनीं आपली रचना केली, त्यांना संतकवि अशी संज्ञा असून, आपल्या सरस, सगुण, सालंकार अशा वाणीनें ज्यांनीं सहृदय वाचकांची चित्तवृत्ति आंदोलित केली, त्यांना कलाकवि किंवा आख्यानकवि असें म्हणावयास हरकत नाहीं. कांहीं संतकवींचे विषय निव्वळ भगवद्गीता, भागवत ११ स्कंध असे असत, तर कांहींनीं भागवतीय आख्यानासारखा विषय घेऊनही आपला सर्व भर, अध्यात्म किंवा भक्ति यांवरच दिला. पंडित दामोदर, भास्कर इत्यादि महानुभाव कवि, किंवा एकनाथमहाराज हे याच वर्गांत मोडतात. भक्ति किंवा अध्यात्मासारखी कडू गुटिका, त्यांनीं लौकिक वर्णनें, रस व अलंकार, इत्यादिकांच्या शर्करेंत घोळली आहे. पण या प्रथेंत लवकरच बदल झाला, व हा करण्याचें बरेचसें श्रेय नाथांच्या रसिक नातवानेंच पदरीं घेतलें. मुक्तेश्वरानें आपला विषयच असा निवडला; कीं, त्यांत त्याला आपली रसिकता व कलात्मकता दर्शवितां यावी. अध्यात्माचा लंबक कलेकडे झुकवितांना, अनादिकालापासून चालत आलेल्या ओंवीवृत्तापेक्षां, रसाविर्भावास अनेक वृत्तात्मकरचना कशी पोषक असते, हें आपल्या 'रामायणां'त अनेक वृत्तांचा अवलंब करून, त्यानें दाखवून दिलें. अशा दुहेरी कामगिरीनें, मुक्तेश्वर सर्व कलाकवींचा मोहरा झाल्यास नवल नाहीं.

मुक्तेश्वराच्या कालानंतर येणाऱ्या उज्ज्वल अशा शिवकालांत, रामदास

तुकाराम इत्यादि स्वतंत्र रचना करणाऱ्या संतकवीबरोबरच मुक्तेश्वराची प्रथा चालविणारे, अनेक रसिक कलाकवि निर्माण झाले. अध्यात्माचा किंवा भक्तीचा पालव तर न सुटावा, व इकडे आपल्या अंगांतील रसिकता, बुद्धीची सूक्ष्मता व इतर काव्यगुण तर प्रगट होण्यास संधि मिळावी, यासाठीं जगड्व्याळ रचनेच्या पाठीं न लागतां, महाभारत भागवत व रामायण यांसारख्या पुराण ग्रंथांतील आख्यानें व स्वयंवर-प्रसंग निवडून काढून, त्यांच्या आधारें त्यांनीं मराठी काव्य, व पर्यायानें भाषा, समृद्ध व अलंकृत केली. या कालांत झालेल्या कलाकवींत वामन, विठ्ठल, नागेश, सामराज व रघुनाथ पंडित, यांचा प्रामुख्यानें समावेश होतो. यांपैकीं वामन व विठ्ठल वगळल्यास, नागेश, सामराज व रघुनाथ पंडित, हे राजदरबारपरिचित, व्यवहारदक्ष व मर्मज्ञ, असल्याचें दिसून येतें. श्रीमंताच्या पदरीं राहिल्यामुळें, त्यांचीं काव्यें केवळ हौसेकरितांच निर्माण झालीं. व काव्याकडे पाहण्याची लौकिक किंवा वास्तवदृष्टि, वर्णनाची संपन्नता व स्वभाववर्णनांची सूक्ष्मता, हे या कवींचे विशेष ठरून गेले. याच दृष्टीचा प्रसार होऊन वाचकांस काव्याची गोडी लागावी व कुतूहल उत्पन्न व्हावें, यासाठीं त्यांनीं स्वयंवरासारखे लोकप्रिय व लोकमनोरंजक प्रसंग आपल्या काव्याकरितां निवडले. वामनानें भागवत व रामायण यांतील बहुतेक ठळक आख्यानें अत्यंत रसिकतेनें वर्णिलीं असून, विठ्ठलानें द्रौपदीस्वयंवर, सीतास्वयंवर, बिल्हणचरित्र व रसमंजरी आणि सामराज व रघुनाथ पंडित यांनीं अनुक्रमें रुक्मिणीस्वयंवर व दमयंतीस्वयंवर हे आपल्या काव्याचे विषय निवडून काढले आहेत. काव्याचें ध्येय, परमार्थ किंवा ईशचिंतन हा जो सनातन रुळलेला मार्ग, तो बदलून महाराष्ट्राला काव्यनंदाची खरी माधुरी, याच कवींनीं प्रथम चाखावयास लावली. व काव्य म्हणजे कांहीं तरी अगम्य गूढ असलें पाहिजे, ही कल्पना साफ बदलून टाकली. या कालांत संस्कृत वाङ्मयांतील पंचकाव्यांच्या धर्तीवर अनेक वृत्तात्मक सरस व सालंकार अशीं जीं

महाकाव्यें व खंडकाव्यें, मराठींत अवतीर्ण झालीं, तीं मात्र दीर्घकालपर्यंत अज्ञातवासांतच राहिलीं. माधवचंद्रोबाचें ‘ सर्वसंग्रह ’ व परशुरामपंत गात्यांचें ‘ नवनीत ’त यांच्या द्वारां रघुनाथ पंडितांच्या ‘ नल-दमयंती स्वयंवराख्याना ’ चा वाचकांना प्रथम परिचय झाला. विठ्ठलाचे काव्यग्रंथ व नागेशाचें ‘ चंद्रावळीवर्णन ’ काव्यसंग्रहांतून प्रसिद्ध झालें, तर नागेशाचें सीतास्वयंवर व सामराजाचें रुक्मिणीहरण हीं दोन नितांत सुंदर काव्यें, प्रसिद्ध वाङ्मयसंशोधक कै. विनायक लक्ष्मण भावे, यांनीं आपल्या ‘महाराष्ट्र कवि’ मासिकाच्या द्वारां अनुक्रमें शके, १८२५ व १८२७ या वर्षी वाचकांस प्रथम उपलब्ध करून दिलीं. अशा रीतीनें हीं काव्यें उजेडांत येऊनही त्यांचें अस्तित्व समजण्यापलीकडे मात्र, विशेष फायदा झाला नाहीं. पण यांचें नष्टचर्य संपण्याचे दिवस लांब नव्हते. मुंबई विश्वविद्यालयाच्या पदवी-परीक्षेच्या अभ्यासक्रमांत मराठी भाषेस स्थान प्राप्त झाल्यामुळें, उत्तम काव्यग्रंथांची वाण भासूं लागलीं, व प्राचीन काव्यांचा पुनरुद्धार होण्याची संधि अनायासें प्राप्त झाली. विठ्ठलाचें ‘ सीतास्वयंवर ’ याच सुमारास ( १९२३ ) निर्णयसागर छापखान्यानें स्वतंत्र प्रसिद्ध केलें, तर त्याच्या पुढील वर्षी ( १९२४ ) प्रो. गोपाळ विष्णु तुळपुळे यांनीं, सामराजाच्या रुक्मिणीहरण काव्याची सटीप आवृत्ति प्रसिद्ध करून, वरील उणीव भरून काढण्याचें पुण्य पदरीं घेतलें. या काव्यांतील पाठभेदाबद्दल व शब्दांच्या अर्थाबद्दल महाराष्ट्रीय विचिकित्सकांची, जी चर्चा विविधज्ञानविस्तारांतून बरेंच दिवस चालू होती, ती पुष्कळांना उद्बोधक वाटली, व प्राचीन मराठी कवितेबद्दलचे दुर्ग्रह घालविण्यास तिचा पुष्कळच उपयोग झाला, यांत संशय नाहीं. असो. अलीकडे तर प्राचीन वाङ्मयाचा अभ्यास व अभिरुचि वाढत आहे, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे; व या गोष्टीचें दृश्यफल म्हणजे श्री. अनंत काकबा प्रियोळकर या मुंबईच्या साक्षेपी संशोधकांनीं नुकतीच संपादित केलेली ‘नल-दमयंती स्वयंवरा’ची प्रत होय. रा. प्रियोळ-करांनीं रघुनाथ पंडितासंबंधीं संशोधनपूर्वक मिळविलेली नवीन माहिती

या प्रतींत समाविष्ट केली असून ‘ दमयंती स्वयंवरा ’ चे मूळ पाठभेदासह विशेष कसोशीनें ठरविलें आहे. प्राचीन काव्याची पाठचिकित्सात्मक संपादणी कशी करावी, याचा रा. प्रियोळकरांचा ग्रंथ हा एक आदर्श असून, त्याबद्दल मराठी भाषा त्यांची सदैव ऋणी राहील.

अशा रीतीनें विठ्ठल, सामराज, रघुनाथपंडित यांच्या काव्यांचा झालेला पुनरुद्धार पाहून नागेशकडे माझें लक्ष वेधलें गेलें. व त्याचा ‘ सीता-स्वयंवर ’ हा काव्यग्रंथ आपल्याकडून स्वतंत्रपणें प्रसिद्ध झाल्यास पहावा अशी मनीषा उत्पन्न झाली. नागेशासारखा उच्च दर्जाचा शिव-कालीन कवि, मागें पडण्यास त्याच्या काव्यांत आढळणारा पांचटपणा, थोडाबहुत कारणीभूत झाला असेल. पण त्याचे इतर गुण पाहून, हा कवि एकीकडे अज्ञात व विचारणारहित स्थितींत खितपत पडावा, हें माझ्या मनास बरें वाटेना; व ‘सीतास्वयंवरा’ची स्वतंत्र प्रत प्रसिद्ध करण्याचें ठरवून मी तत्संबंधीं कै. भावे यांचे चिरंजीव श्री. लक्ष्मण विनायक भावे यांच्याकडे परवानगी मागितली. त्याही उदार गृहस्थानी मला तशी परवानगी दिली, हे माझ्यावर त्यांचे मोठे उपकार आहेत. पूर्वी ‘ वच्छ-हरणा ’ची प्रत काढतांनाही त्यांच्या वडिलांनीं अशीच परवानगी देऊन मला उपकृत करून ठेवलें होतें. अशा रीतीनें उण्यापुऱ्या चौतीस वर्षांनंतरच्या नागेश कवीच्या या पुनरुद्धाराचें बहुतेक श्रेय रा. लक्ष्मण विनायक ऊर्फ राजाबापू भावे यांजकडे आहे. इतकी प्रस्तावना करून आतां नागेशाच्या कुलवृत्ताकडे वळतों.

## ( १ ) नागेशाची वैयक्तिक माहिती

कै. भावे यांनीं नागेशाचें ‘ सीतास्वयंवर’ आपल्या ‘महाराष्ट्र कवीं’तून प्रसिद्ध करतांना त्याला जी प्रस्तावना जोडली आहे, तिच्यांत या कवीचें वृत्त त्यांनीं दिलें आहे.[१] हा कवि आपल्या काव्यांत ‘ नागेश, ’ ‘नागदेव, ’

१ ‘ महाराष्ट्र कवि ’ शके १८२६.

'नागजोशी' 'नागेंद्र' इत्यादि शब्दांनीं आपल्या नांवाचा उल्लेख करतो. याचें नांव नागभट्ट असून हा अहमदनगराजवळील भिंगार या गांवचा.[१] याचे वंशज अजूनही तेथें राहतात. गांवाच्या अगदीं शेवटास याचें राहतें घर असून, गांवाशेजारींच असणाऱ्या लहानशा ओढ्याच्या कांठीं याच्या घराण्यांतील मृत पुरुषांच्या समाधि आहेत. त्यांतली कोणती समाधि कोणत्या पुरुषाची, हें कोणासही सांगतां येत नाहीं. फार काय पण आपल्या गांवांत 'नागेश' नांवाचा कोणी कवि होऊन गेला, याबद्दल गंधवार्ताही हल्लींच्या नागेशाच्या वंशजास किंवा भिंगार येथील लोकांस नाहीं. इ. स. १९०४ सालीं, कवीच्या वंशजांत त्रिवेणीबाई या नांवाची एक सुमारें ऐंशी वर्षांची, वृद्ध विधवा बाई होती. वृद्धापकाळामुळें तिची स्मरणशक्ति असावी तशी नव्हती. परंतु आपल्या घराण्यांतील पूर्वजांचीं नांवें सांगतांना 'कोंड जोशी,' 'मोर जोशी,' 'नाग जोशी,' नरसिह जोशी', अशीं कांहीं नांवें, व त्यांच्यासंबंधीं कांहीं अव्यवस्थित माहिती, आणि 'अमावास्येच्या दिवशीं चंद्र दाखविला,' इत्यादि ठराविक हकीकतीच्या आख्यायिका, ही बाई सांगत असे. हिच्या दोन्ही चिरंजिवांस हेंही ज्ञान नव्हतें, असें कै. भाव्यांना आढळून आलें.

नागेशाच्या वडिलांचें नांव मोर जोशी असून आईचें नांव जानकीबाई असें होतें. मोरजोशांस तीन मुलगे होते. थोरला मल्हारी, मधला त्र्यंबक व धाकटा नागेश. हा सर्वांत धाकटा जो नागेश, तोच प्रस्तुत काव्याचा लेखक होय. मधला "त्र्यंबक जोशी बिन मोर जोशी, कसबे भिंगार यांसी शके १५९१ सोम्य नाम संवत्सरे जेष्ट शु. सप्तमी वार शुक्रवार ते दिवशीं" एका कुळकर्ण्यानें लिहून दिलेला महजर प्रसिद्ध आहे.[२] नागेशानें आपल्या संबंधींची माहिती आपल्या[३] 'चंद्रावळीवर्णन' या काव्याच्या शेवटीं दिली आहे ती अशीः—

---

१ पहा—'भृंगारवासी कवि नागजोशी' चंद्रावळीवर्णन, ३१७. २ महाराष्ट्र सारस्वत, आवृत्ति ३. भाग २. ३ काव्यसंग्रह २३—चंद्रावळी-वर्णन—उपसंहार.

" पिता मोर जोशी महाख्यात आहे, तथा जानकी नाम मातेसि आहे, ।
अहो ! थोरल्या दोन्हि बंधूंसि साचें, असें नाम मल्हारिचें त्र्यंबकाचें. ॥ १ ॥
तया धाकुटा तोच नागेश पाहे; कवित्वीं जया ज्ञान संपूर्ण आहे "

या कुटुंबाची वृत्ति ग्रामजोशाची व ग्रामलेखकाची ( कुळकर्ण्याची ) होती. नागेशानें सीतास्वयंवरास जाणाऱ्या भटजींचें, व त्यांच्या शिष्योपशिष्यांचें केलेलें विनोदी पण यथातथ्य वर्णन, शिष्यांच्या भाषणांत आलेला तूळ, मकर या लग्नांचा कोटियुक्त उल्लेख, लहान रामाला शिवधनुष्य उचलेल कीं नाहीं, या भीतीनें सीतेनें धनुष्यावर केलेले अनिष्ट ग्रहांचे आरोप, सीतारामांच्या विवाहप्रसंगीं बारिकसारिक सोहळ्यांचें व धार्मिक विधीचें त्यानें केलेलें वर्णन, इतकेंच नव्हे तर, विवाहापूर्वी गणपतिस्थापना आधीं कीं, कलशस्थापना आधीं, या मुद्यावर झालेलें भटजींचें भांडण, इत्यादि गोष्टी पाहिल्या म्हणजे, नागेशाची वृत्ति जोशाची होती इतकेंच नव्हे, तर भटजींच्या जीवनक्रमाशीं त्याचा निकट परिचय असून, त्यानें तो बारकाईनें पाहून ठेवला होता, हें स्पष्ट दिसतें. असो. जोशीपण अजूनही या वंशांत आहे. यांचें उपनांव मुळे. हे वत्सगोत्री माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी ब्राम्हण. यांचें आराध्य दैवत त्रिभांडेश्वर होय. एके वेळीं विद्वत्तेबद्दल यांचें कुटुंब चांगलें प्रसिद्ध असावें असें दिसतें. नागेशाचा बाप मोर जोशी हा चांगला ज्योतिषी असून, स्वतः पंचांग वर्तवी. कोकाट्या यशवंतराव या नांवाचा कोणी श्रीमंत सरदार, नगरप्रांतीं होऊन गेला; त्याच्या पदरीं हा मोर जोशी असे. नागेशानें आपल्या 'चंद्रावळीवर्णनां'त[१] यासंबंधीं उल्लेख केला आहे:--

"कोकाट्या यशवंतराव जगतीं विख्यात राजा असे, ।
त्याच्या पुण्यकृती पुरोहित बरा तो मोर जोशी वसे. ॥

१ चंद्रावळीवर्णन—उपसंहार श्लोक ३.

आमचा कवि तर, या कोकाख्यास 'विख्यात राजा म्हणतो, मग त्याची कांहींच माहिती कशी मिळत नाहीं ? असो. 'मोर जोशासही बरी वाईट मराठी कविता करण्याचा नाद होता, असें त्यांच्या घरच्या कागद पत्रांवरून दिसतें,' असें कै० भावे म्हणतात. यावरून नागेशाच्या अंगांत असलेला काव्यगुण त्याला त्याच्या वडिलापासून परंपरेनें प्राप्त झाला होता, असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

## ( २ ) विनय व आत्मविश्वास.

नागेश विनयशाली दिसतो. [१]आपल्या अंगांत कौशल्य नाहीं, असें तो म्हणतो. सीतेचें वर्णन करतांना सनक किंवा बृहस्पतीसारखे हतबुद्ध होतात, तेथें आपल्यासारख्या साध्या जोशाची स्थिति कशी होईल, असें लघुत्व त्यानें स्वीकारलें आहे[२]. प्राचीन कवीबद्दल त्याला आदर आहे[३]. पण या विनयाची किंवा आदराची परिणति, न्यूनगंडत्वांत ( inferiority complex ) झालेली नाहीं. उलट नागेशामध्यें योग्य तो आत्मविश्वास वसत असलेला दिसतो. एके ठिकाणीं तो आपणास 'कविसुंदर'[६] व 'श्रीनागेशकवीश्वर'[५] असें संबोधीत असून, आपलें काव्य, सर्व पृथ्वीतलावर एकटें शोभणारें आहे, व तें महाकवींनाही मान्य झालेलें आहे, अशी त्यास खात्री आहे. आपलें सीतास्वयंवर 'विद्वज्जनां मानलें' असा कवीला पूर्ण भरंवसा आहे . नागेशाची एकंदर रचना पाहतां हा आत्मविश्वास सार्थ आहे, असें म्हणावें लागतें.

## ( ३ ) विनोद

नागेशाचा स्वभाव बराच विनोदी आहे. किंबहुना प्राचीन मराठी कवींत त्याच्याइतका विनोदी कवि सांपडेल कीं नाहीं, याची शंकाच आहे. तो

---

१. सीता. स्वयं. ३५. २. सीतास्वयंवर श्लोक २४,२१९. ३. सीतास्व. श्लो. ७. ४ सीतास्व. ३१. ५ चन्द्रा.

ज्ञात्याच विनोदी, त्यामुळें जेंथें वाव सांपडेल तेथें त्याची ही विनोदी बुद्धि उचल खाते. नारद परशरामाकडे जाऊन रामावताराची वर्दी देतांना, " पहा विचार कर, आतां तुझा अवतार संपला " असें ठांसून सांगतो. दोन अगदीं प्राकृत माणसें हल्लीं परस्परांना जशीं बोलतील, त्याच मासल्याचें भाषण नारद–परशरामासारख्या अवतारी पुरुषाच्या तोंडीं पाहून थोडी मजा वाटते.[१] त्याचप्रमाणें अहिल्यास्वयंवराच्या वेळीं, पृथ्वीला सात प्रदक्षिणा घालून अगोदर परत येणाऱ्यास, अहिल्या देण्याचा पण ब्रम्हदेवानें जाहीर केला. सर्व दिक्पतींना व साक्षात् विघ्नहर्त्या गणपतीलाच, हा पण, अत्यंत अवघड वाटून, प्रत्येकानें आपल्या वाहनाच्या दुरवस्थेची जी करुण कहाणी सांगितली आहे, ती फारच मनोरंजक वाटते. दिक्पती किंवा गणपति यांसारख्या बलाढ्य देवांना देखील, हा पण कठीण वाटावा, व त्यांनीं अगदीं एखाद्या लेच्यापेच्या माणसाप्रमाणें, कांहीं तरी सबबी सांगून, आपला आब कोणीकडून तरी राखण्याचा प्रयत्न करावा, हें पाहून करमणूक झाल्याशिवाय रहात नाहीं. आमच्या गणपतीशीं, व त्याच्या दोंदिलाशीं कोणीही सलगी करावी, व तशी ती आमच्या कवीनेंही केली आहे.[२] रावणाचें उग्र स्वरूप पाहून सीतास्वयंरार्थ जमलेल्या राजे लोकांच्या उडालेल्या धांदलीचें व फजीतीचें वर्णनही याच मासल्याचें आहे.[3] लौकिक व अलौकिक वस्तूंमधील विरोध दाखवून विनोद उत्पन्न करण्याची नागेशाची हातोटी विलक्षण आहे. स्वभावनिष्ठ विनोद करण्यांतही त्याचा हातखंडा आहे. रामानें शिळेची सुंदर अहिल्या बनविली हें पाहून कांहीं ब्राह्मणांच्या सुपीक डोक्यांत, आपली घरांतली हिडिंबा सोडून द्यावी व एकादी डोंगरांतील चांगली लांब शिळा रामाच्या पायाजवळ धरून, तिची सुंदर नार बनवून घ्यावी, असें आलें. ते डोक्यावर एकेक शिळा घेऊन रामापुढें उभे राहिले. कामासक्त व लोभी ब्राह्मणांचा असंबद्ध स्वभाव व वर्तन, यांचें कवीनें असें कांहीं वर्णन केलें आहे कीं, सहृद-

१ सीतास्वयंवर ३८. २ श्लोक १०३-१०७. ३ सीतास्व. ३२६-३२९.

याची हंसून मुरकुंडीच वळावी.[1] याच प्रसंगीं घरीं एक स्त्री असून, रामाकडून दुसरी मिळविण्याच्या फंदांत पडणाऱ्या वरील ब्राह्मणांच्या नांवानें, हांका मारणाऱ्या ब्रह्मचाऱ्याचें वर्णनहि, कमी मनोरंजक नाहीं. या ब्राह्मणांनीं दोन दोन बायका केल्यावर, एकदांही ज्याचें लग्न झालेलें नाहीं, अशा आपणास, हात चोळीतच बसावें लागणार, हा वरील ब्रह्मचाऱ्याचा झालेला समज, त्यानें पुष्कळ काळ कंठलेल्या अविवाहित स्थितीचा व हावऱ्या वृत्तीचा निदर्शक आहे[2]. पुढें ढोंगी गोंसाव्याच्या वर्तनाचें शब्दचित्र रंगवितांना, त्याच्या आहाराचें जें प्रमाण दिलें आहे तें वाचून, त्याच्या वृत्तीचा व त्याच्या आहाराचा मेळ घालतां न आल्यामुळें, वाचक संताप व हास्य यांच्या कात्रींत सांपडतो. हें सर्व अन्न हा गोसावी इतक्या लवकर उडवीत असे कीं, मागें चित्राहुतीशिवाय कांहींच उरत नसे.[3] अशा या औदरिकाचें वर्णन, मार्मिक, तितकेंच हास्यकारक आहे. नागेशाच्या विनोदाचीं हीं उदाहरणें पाहिलीं असतां, त्याचा विनोद बहुतांशीं, मानवी स्वभावांतील विरोधदर्शनावर व असंबद्धतादर्शनावर आधारला असल्याचें कळून येईल. अशा प्रकारचा विनोद, विनोदाच्या इतर जातींपेक्षां उच्च दर्जाचा समजला जातो; व मार्मिकपणा व सूक्ष्मता अंगीं असल्याशिवाय, हा सहसा निर्माण करतां येत नाहीं. सर्वच प्राचीन मराठी कवींवर, गांभीर्याचा आरोप करणारांनीं, नागेशाची विनोदी वृत्ति लक्षांत घेतली असतां; कोणत्याही आधुनिक मराठी विनोदी लेखकापेक्षां, तो कमी नाहीं हें त्यास कबूल करावें लागेल.

## ( ४ ) नागेशाचे काव्यग्रंथ

असो. आमच्या कवीनें पांच ग्रंथ लिहिल्याची माहिती लागते. या पैकीं ( १ ) चंद्रावळीवर्णन पूर्वींच काव्यसंग्रहांतून प्रसिद्ध झाल्याचें

---

१ सीतास्व. १३२, १५१. २ सीतास्व. १४८. ३ सीतास्व. १९०, १९१.

सांगितलें आहे. ( २ ) सीतास्वयंवरही ‘ महाराष्ट्र कवीं ’त छापल्याचें नमूद केलें आहे. ( ३ ) रुक्मिणीस्वयंवर कै. वामन दाजी ओक वगैरे गृहस्थांनीं पाहिलें होतें; परंतु त्याची प्रत कै. भाव्यांनाहीं उपलब्ध झाली नाहीं. ( ४ ) ‘ रसमंजरीचीं ’ कांहीं पानें कै. भाव्यांनीं पाहिली होती, पण हाही ग्रंथ त्यांना साग्र कोठें सांपडला नाहीं.[1] (५) ‘शारदा विनोद ’ या काव्याचींही कांहीं पानें कै. भाव्यांनीं पाहिलीं होतीं. या काव्याच्या शेवटीं, “ मी भृंगीपुरास ( भिंगारास ) राहणाऱ्या ‘ नाना काव्यकलापचतुर श्रीनागराज ’ कवीनें हा ग्रंथ रचला ” असा उल्लेख केला आहे. ग्रंथांत यालाच ‘ सरस्वतीविनोद ’ असें सर्वभर म्हटलें आहे. पोथीची नक्कल कोणीं ‘ रघुनाथ ’ नांवाच्या लेखकानें शके १६२० बहुधान्य संवत्सरीं केलेली आहे.[2]

“ नागेशाला[3] लिहिण्याचा नाद बराच होता, असें दिसतें. यानें नक्कल केलेल्या अनेक पोथ्या यांच्या घराण्यांत आहेत. परंतु हे सर्व ग्रंथ म्हणजे या पोथ्यांची विस्करलेली सुटीं पानें पोत्यांत भरून कैक वर्षे लोळत पडल्यामुळें, आजमितीस त्यांतून एकही ग्रंथ पुरा निघत नाहीं. यांपैकीं एक ‘ स्वप्नासंबंधीं फलाची ’ पोथी, सचित्र आहे. यावरून कवीस चित्रें काढण्याचा नाद फार असावा असें दिसतें. नागेशाचीं काव्यें एके काळीं फार लोकप्रिय होतीं. याचीं ‘ गणेश बोले बहु आदरानें । नेला असे उंदिर मांजरानें । ’ वगैरे पद्यें, लहानपणीं आमच्या तोंडीं असत. पूर्वी तीं पुष्कळ ठिकाणीं ऐकूं येत.

सुमारें पन्नास वर्षांपूर्वी नागेशाच्या घराण्यांतील पुष्कळ पोथ्या— गं. भा. त्रिवेणीबाई म्हणत होत्या सुमारें शें, दोनशें पोथ्या—कोणा महाबळेश्वरकर शास्त्र्यानें त्यांचे घरून महाबळेश्वरास नेल्या. तेथून त्या

---

१ ‘ महाराष्ट्र कवि ’ शके १८२५. २ महाराष्ट्र सारस्वत, आवृत्ति ३. पृ. ७५. ३ महाराष्ट्रकवि, शके १८२५.

पोथ्या वांईस गेल्याचें, कै. भाव्यांना कळलें होतें. यावरून वांई प्रांतीं या कवीचे कांहीं ग्रंथ सांपडण्याचा संभव आहे.

## ( ५ ) नागेशाचें अध्ययन व विद्वत्ता.

नागेशाच्या ग्रंथाचीं नुसतीं नांवें, व त्याच्या उपलब्ध काव्यग्रंथांचें अंतरंग आस्थापूर्वक पाहिलें म्हणजे, त्याच्या विद्वत्तेबद्दल खरी कल्पना येते. चंद्रावळीवर्णन हें आख्यान कवीनें अग्निपुराणाच्या आधारें रचिलें आहे, तर सीतास्वयंवराला त्यानें विठ्ठल बीडकराप्रमाणेंच

"कांहीं 'श्रीहनुमंत नाटककथा, कांहीं रघूवंशिचीं ।
कांहीं आदिकविप्रमेयरचना, कांहीं गिरा देशिची ॥"

अशा ग्रंथांचा आधार घेतलेला दिसतो. सीतास्वयंवरांतील श्लोक ३२० व ३५८ हा हनूमन्नाटकांतील तदर्थसूचक श्लोकांचा स्पष्ट अनुवाद आहे. सीतास्वयंवरांतील कांहीं वर्णनावरून सामराजाप्रमाणें, आमच्या कवीचाही 'रघुवंश' या काव्याशी दृढ परिचय होता, असें दिसून येतें. उदाहरणार्थ, स्वयंवराच्या मंडपांत जमलेल्या राजांची हकीकत सांगतांना सीतेची सखी रामाचें व त्याच्या पूर्वजांचें जें वर्णन श्लोक २७८–२८३ यांत करीत आहे, तें रघुवंशाच्या १ ल्या, व पांचव्या सर्गापासून ९ व्या सर्गापर्यंतच्या कथाभागावरून रचिलें आहे. ( टीपा पहा ). रंगमंडपांत जमलेल्या राजांचें निरीक्षण करीत करीत सीता चालली असतां, राजांनीं केलेल्या शृंगारचेष्टा, ( श्लोक २७३–२७५ ) रघुवंश सर्ग ६ मधील इंदुमतीच्या स्वयंवरांतील राजांची आठवण करून देतात. इंदुमतीची सखी जशी सुनंदा, तशी सीतेची जया, हें साम्य देखील 'रघुवंशा'च्या छायेचेंच स्पष्ट द्योतक आहे. तसेंच धनुर्भंगानंतर, राम शिबिकारूढ होऊन लग्नाकरितां जनकगृहीं जात असतां, रामाची मिरवणूक पाहण्यास सरसावलेल्या पौरस्त्रियांची धांदल आमच्या कवीनें वर्णिली आहे. (श्लोक ३८४–३८७). हें वर्णन रघुवंशाच्या ७ व्या सर्गांतील अजराजाच्या

मिरवणुकीचें हुबेहूब चित्र आहे. 'चंद्रावळीवर्णनां'त चंद्रावळीचें अवयव-वर्णन, व सीतास्वयंवरां'तील आपादमस्तक केलेले सीतेच्या अवयवांचें वर्णन, पूर्वमहाकवींच्या संकेतास धरून असून, त्यावरून नागेशाचा पंचमहा-काव्याशीं असलेला परिचय स्पष्ट दिसतो. ( टीपा पहा. ) निरनिराळ्या अवयववर्णनांत साधलेले, व्यतिरेक हेतूत्प्रेक्षा, अपन्हुति, रूपक इत्यादि अलंकार, त्याच्या अलंकारशास्त्राच्या ज्ञानाची साक्ष देतात. नागेशानें पुराण-ग्रंथाचें उत्तम अवलोकन केलें होतें. अग्निपुराणाचा उल्लेख वर आलाच आहे. पण सीतास्वयंवराला हजर राहण्यास गेलेल्या ऋषिमंडळींचा उल्लेख कर-तांना,[१] प्रत्येकाच्या प्रभाववर्णनावरून त्याचें नांव सूचित करण्याची कवीची कौशल्यपूर्ण पद्धति पाहिली असतां, भागवतपुराणांसारखीं पुराणेंही त्यानें अवलोकिलीं होती, याबद्दल संदेह रहात नाहीं. ' भानुदासाच्या रस मंजरीशीं कवीचा पूर्ण परिचय दिसतो ' अशा रा. प्रल्हाद धोंडो कानिट-कर यांच्या विधानास,[२] नागेशाच्या ' रसमंजरी ' या भाषांतरित ग्रंथानें पुष्टीच मिळाली आहे. तथापि रामाच्या विवाहसमयींच्या मिरवणुकी-मागें असणाऱ्या स्त्रियांत,[३] चित्रिणी, पद्मिनी, हस्तिनी व शंखिनी, अशा चार जातींच्या स्त्रियांचीं जीं लक्षणयुक्त वर्णनें दिलीं आहेत, तीं तर ' अनगरंगां 'त त्या स्त्रियांच्या दिलेल्या वर्णनाचा अक्षरशः अनुवाद होत. ( टीपा पहा ). नागेशासारखा रसिक, असे कामशास्त्रविषयक ग्रंथ दृष्टिआड करील हें संभवत नाहीं. असो. नागेशानें आपल्या काव्यांत ठिकठिकाणी योजलेले संस्कृत शब्द पाहिले म्हणजे त्याच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानाबद्दल शंकाच रहात नाहीं. बहुश्रुततेनें एकादा कवि कांहीं संस्कृत शब्द योजील, पण ज्यावेळीं तो, अखर्व, प्रमाणिक, सुरगोप, धम्मिल्ल, मनु, विभाकर, देशांतक, विंशतिनेत्रशंका, धिषण, हीमवासनाहीं, आरव, मेढा, परिपाक, असे थोडे अपरिचित शब्द योजतो, त्यावेळीं संस्कृत भाषेचें पूर्ण ज्ञान किंवा विस्तृत वाचन, असल्याशिवाय तो ते कसा योजील ?

---

१ सीतास्व. ७०. २ विविधज्ञानविस्तार, मे. १९२९. ३ सीतास्व. ३७९-३८२.

'सीतास्वयंवरां'तील विश्वामित्रानें केलेल्या गंगेच्या स्तुतींतील श्लोक, किंवा रामानें शिवधनुर्भंग केल्यावर सीतेनें केलेली रामाची स्तुति, (श्लोक ३६६ —३७०) अथवा श्लोक २४० मधील कुचवर्णन, हे भाग वाचले असतांही त्याच्या संस्कृतप्रचुर रचनेची थोडी कल्पना येईल. शिवाय 'ज्ञान, अज्ञानिया सांग जो शीकवी,' या चरणावरून व 'आगमसूत्रा' या रामास लावलेल्या विशेपणावरून वेद—वेदांगें नागेशाच्या कानावरून तरी गेलीं असावीं. 'रामरक्षे'चाही त्यानें उल्लेख केला आहे (श्लो ३३०). 'हनहतलामा' या रामास लावलेल्या विशेषणावरून, त्यानें प्राकृत भाषेचेंही ज्ञान संपादलें असावें असा समज होतो; व त्यानें योजलेल्या व प्राकृतांत रूढ असणाऱ्या 'मकरकशीर्षा' या वृत्तानें तो दृढ होतो.

वरील प्रपंचाचा निष्कर्ष इतकाच कीं, नागेशाचें संस्कृत भाषेचें ज्ञान उत्तम असून, आपण वाचलेल्या संस्कृत भागांचा योग्य स्थळीं मराठी अनुवाद करण्याची त्याची पात्रता होती. पंचमहाकाव्यें व तदनुषंगिक ग्रंथ त्यानें चिकित्सेनें अभ्यासल्याचें प्रत्यंतर, त्याच्या काव्यांत पदोपदीं मिळतें. अलंकाराचा व छंद:शास्त्राचाही अभ्यास, त्यानें कसोशीनें केलेला दिसतो. काव्य, नाटक, पुराणग्रंथ, व अनंगरंगासारखें कामशास्त्रविषयक ग्रंथ, त्यानें रसिकतेनें वाचले होते व त्यांचा आपल्या काव्यांत त्यानें औचित्यानें उपयोग करून घेतला आहे. असें असतां कांहीं ठिकाणीं केवळ यमकानुप्रासाकरितां त्यानें कांहीं संस्कृत मराठी शब्दांच्या बाबतींत ऱ्हस्व दीर्घाची ओढाताण केली म्हणून, "त्याचा संस्कृत भाषेशीं साधारण परिचय असावा[1]" असें म्हणणें थोडें अन्यायाचें होईल असें, वाटतें. वामनपंडितांच्या रचनेंतही अशी ऱ्हस्वदीर्घाची ओढाताण कांहीं कमी नाहीं. पण त्यांच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानाबद्दल शंका घेण्याचें धाडस कोणी केलें नाहीं. मग आमच्या कवीनेंच काय केलें आहे? आतां नागेश विद्वान् होता कीं नाहीं हा प्रश्न थोडा वादग्रस्त आहे,

१ महाराष्ट्र कवि, शके १८२५.

'विद्वान्' याचा अर्थ षट्शास्त्रांपैकीं, निदान एक दोन शास्त्रांत पारंगत असा केल्यास, मात्र तो या कसोटीस कदाचित् उतरणार नाहीं. पण तो उत्तम संस्कृतज्ञ असून त्या भाषेंतील ललित ग्रंथांचें त्यानें सूक्ष्म अध्ययन केलें होतें, याबद्दल कोणाचेंच दुमत होणार नाहीं.

## ( ६ ) नागेशाची बहुश्रुतता.

नागेशाच्या वाचनास त्याच्या बहुश्रुततेची जोड मिळाली होती. यशवंतराव कोकाट्यासारख्या जहागीरदाराच्या पदरीं वागण्याचें भाग्य लाभल्यामुळें, श्रीमंताच्या तैनातींत असणाऱ्या अनेक गोष्टींचें त्याला प्रत्यक्ष ज्ञान झालें होतें. ललकारणाऱ्या भालदार चोपदारांचा व राजांच्या पटाईत शिपायांचा, त्याला नित्याचाच परिचय असावा.[१] "ज्या हुद्यावर एकाद्याची नेमणूक झालेली असते, तो हुद्दा गेला म्हणजे, त्या माणसाची लाजिरवाणी स्थिति होते[२]" असें नारदाच्या तोंडून परशरामास सांगवणारा नागेश कवि, राजदरबार व तेथील उलथापालथ यांमध्यें चांगलाच मुरलेला असावा. निदान अशा कांहीं गोष्टीं त्याच्या डोळयादेखत तरी घडलेल्या असाव्या. नागेश मोठा चौकस आहे. आपल्या कालच्या अनेक गोष्टींचें ज्ञान त्यानें परिश्रमानें मिळविलेलें आहे. सीतास्वयंवरास जमलेल्या राजांच्या यादींत, त्यानें आपल्या काळच्या महाराष्ट्र, सौराष्ट्र, चव्हाण, राणे, तुंगार, शृंगार मोरे, गोरे, तोरे, गुजर, सिरसाट, संक्राड, व साटे इत्यादि मराठा राजांचीं नांवें गोविलीं आहेत. कदाचित् ज्या यशवंतराव कोकाट्याचा या घराण्याला आश्रय होता, त्याच्या परिचयानें वरील मराठे सरदारांची माहिती त्याला झाली असावी. पुढें नागेशानें केलेल्या अगस्त्याश्रमाच्या वर्णनांतील अनेक फुलाफळांचा, किंवा सीतेच्या अंगावरील अनेक बारिक सारिक दागिन्यांचा उल्लेखही तत्कालीन असून, वर्णनाला मोठी संपन्नता आणतो. नागेशानें ज्या फळांचा उल्लेख केला आहे, तीं सामाराजाच्या

---

१ सीतास्व. १७३, १७०. २ सीतास्व. ३९

रुक्मिणीहरणकाव्यांत व रामदासांच्या ब्रम्हारण्यवर्णनांत[1] सांपडतात. पण आमच्या कवीनें सीतेच्या अंगावरील दागिने सांगतांना अशा कांहींचा उल्लेख केला आहे कीं, ते त्याच्यासारख्या साक्षेपानें माहिती जमविणाऱ्या-शिवाय सांपडणारच नाहींत. सोळाव्या शतकांत रूढ असणाऱ्या बायकांच्या दागिन्यांचें, येथें साग्र प्रदर्शनच मांडलें असून, इतकें तपशीलवार वर्णन निरंजनमाधवाशिवाय कोणाही मराठी कवीनें केलेलें नाहीं. डोक्यांतील दागिन्यांत, मोर, बोर, कांसव, मासा, आवळे, सालफळ, बेलफळ हे विशेष होत. तसेंच नाकांतील दागिन्यांत फुली, बेंसर, मोर, मोती व नथ अशा पाचांचा उल्लेख नागेशानें केला आहे.[2] सामराजानें 'फुली' दिलेली नाहीं. कानांतील 'तोंगलें' व 'नागोत्तरें' नवीनच आहेत. त्याचप्रमाणें गळ्यांतील दागिन्यांत अंबरसा, हयकोल, अहिदोरा, हंबेल, ` दागिने व बोटांतील 'जेहगीर' व पायांतील 'जेहर' हे दागिने मुसलमानी पद्धतीचे असून, नागेशाच्या काळीं अहमदनगर प्रांतावर असणाऱ्या मुसलमानी अंमलाची साक्ष देतात. हयकोल, अहिदोरा, हंबेल, हे शब्द मला कोणत्याही प्रचलित मराठी शब्दकोशांत किंवा राजव्यवहारकोशांत आढळले नाहींत. व त्याचें मला नवलही वाटलें नाहीं. पण हल्लीं कसोशीनें चालू असलेल्या व 'भ' या अक्षरापर्यंत आलेल्या महाराष्ट्र शब्दकोशांत, जेव्हां 'जेहगीर' व 'जेहर' हे शब्द आढळले नाहींत, तेव्हां मात्र विशेष आश्चर्य वाटलें. जुन्या मराठी काव्यांतील शब्द, साक्षेपानें निवडून काढणाऱ्या शब्दकोशमंडळाचें लक्ष, नागेशाच्या 'सीतास्वयंवरा'कडे कसें गेलें नाहीं कोण जाणे! कारण त्यांनीं ज्यांतून अवतरणें घेतलीं अशा ग्रंथांच्या यादींत, नागेशाच्या ग्रंथांचीं नांवें नाहींत. असो. यापुढें तरी वरील संपादकमंडळानें जुन्या काव्यांतील

---

१ रुक्मिणीहरण-निरीक्षण—प्र. धों. कानिटकर. पान २.

२ ,, ,, ,, पान ५.

शब्दांकडे अवधान द्यावें, अशी त्यांना विनंति आहे. वरील शब्दांचे अर्थ निश्चित करतांना, प्रो. माधवराव पटवर्धनांनीं साध्य करून दिलेल्या मौलवी फझली अल्लीकृत पर्शिअन-इंग्रजी कोशाचा, मला फार उपयोग झाला. याबद्दल माधवरावांचा मी ऋणी आहे. वरील विषयांतराचा निष्कर्ष इतकाच कीं, नागेशानें उल्लेखिलेल्या सर्व दागिन्यांचीं नांवें, राजव्यवहारकोशांत मिळत नसून, नगरप्रांतीं प्रचारांत असलेले कांहीं मुसलमानी पद्धतीचे दागिनेही पाहून त्यानें त्यांची नोंद करून ठेविली, हें लक्षांत यावें. मिथिलेंत वाजणाऱ्या कर्णे, नफेऱ्या, नगारे, तुतारे, दमामे इत्यादि अनेक वाद्यांचा,[१] किंवा रामाच्या हातांतील बांकदार, भाला, समशेर, तरवार, पराणी इत्यादि हत्यारांचा,[२] आमच्या कवीनें स्वकालीन उल्लेख करून आपली बहुश्रुतता व्यक्त केली आहे. हीं हत्यारें त्याच्याकाळीं मराठा सरदारांच्या उपयोगांत होतीं. पण याहीपेक्षां रामाच्या घरच्या, घोड्यांच्या जाती सांगतांना नागेशानें आपल्या चौकसपणाची कमाल केली आहे. नागेशानें येथें दिलेल्या घोड्यांच्या जाती, तत्कालीं प्रसिद्ध असून त्यांतील बरींच नांवें राजव्यवहारकोशांत सांपडतात. फक्त रुमी, घुट्ट, फिरंगी, येंबिये व सुभेद या घोड्यांच्या जाती मात्र, अगदीं अभिनव आहेत. अहमदनगरासारख्या राजधानींत व कोकाटे सरदारांच्या दरबारीं त्यानें हें अश्वजातिशास्त्र अवगत करून घेतलें असावें.

वरील बहुश्रुततेचा गुण लक्षांत घेतांना, रामाच्या काळीं स्वकालीन मुसलमानी भूषणांचा, वाद्यांचा व हत्यारांचा उल्लेख करून नागेशानें कालविपर्यासाचा दोष (Anachronism) केला, म्हणून तो काव्यमर्मज्ञांच्या रोषास कदाचित् पात्र होईल. पण याच दोषामुळें आपणास नागेशाच्या कालाचा व तत्कालीन परिस्थितीचा कयास बांधण्यास मदत होत असल्यानें, वरील दोष चंद्रकलंकाप्रमाणें भूषणभूत वाटतो.

---

१ सीतास्वयं. १६८. २ सीतास्व. २९२.

## ( ७ ) रसिकता व सूक्ष्मता.

नागेशाची विशिष्ट ललितविषयक वाचनाची अभिरुचि, त्याचें चित्रकलेचें ज्ञान, त्याचा वर वर्णिलेला चौकसपणा, लक्षांत घेतां, 'शारदाविनोद' या आपल्या काव्यांत, ' नानाकाव्यकलापचतुर नागराज कवि ' असा जो स्वतःसंबंधीं त्यानें उल्लेख केला आहे, तो सार्थ वाटतो. आपल्या रसिक अभिरुचीप्रमाणें तो वाचलेल्या ग्रंथांतून चटकदार व रसभरित कथाप्रसंग निवडून काढी. 'अग्निपुराण' त्यानें वाचलें, पण त्यांतील 'चंद्रावळीवर्णन' तेवढेंच त्याच्या नजरेंत भरलें. याला कारण त्याची शृंगाररसप्रिय वृत्ति. चंद्रावळीनामक एका गवळ्याच्या स्त्रीवर भुलून, श्रीकृष्णानें तिला वश करून घेण्याकरितां, आपला सोबती पेंद्या पाठविला. त्याला तिनें दाद दिली नाहीं असें पाहून, कृष्णानें चंद्रावळीस बाजारांत गांठली. पण ती तेथूनही निसटली. श्रीकृष्णानें यानंतर चंद्रावळीच्या बहिणीचें रूप घेऊन चंद्रावळीची एकांतांत गांठ घेतली व तिला चकित केलें. असें वर्णन देणारें आख्यान, नागेशानें विशेष कौतुकानें वर्णिलें आहे. नागेशाची सौंदर्यसमीक्षाही त्याच्या रसिकवाचनाचें परिणत फल होय. आपल्या रसिकवृत्तीस व सौंदर्यदृष्टीस वाव मिळावा म्हणून, तो विषयांतर पत्करूनही तसे प्रसंग, स्वप्रतिभेनें निर्माण करतो. उदाहरणार्थ, अहिल्योद्धारप्रसंगीं ब्राह्मणांच्या अनेक टाकाऊ स्त्रियांचीं वर्णनें करून, तद्विरोधी व पत्नीत्वास सर्वस्वी ग्राह्य अशा सुंदर स्त्रियांचीं, जीं लक्षणें त्यानें वर्णिलीं आहेत, तीं त्याच्या सौंदर्यदिदृक्षेचें जाज्वल्य प्रतीक होय. त्याचप्रमाणें रामाच्या मिरवणुकीमागून जाणाऱ्या स्त्रीवर्णनांतही त्याची मार्मिकता दिसून येते. स्त्री, आपल्या कोणत्या अवयवसौंदर्यानें पुरुषाच्या नजरेंत भरेल, हें सांगतां यावयाचें नाहीं; हें तत्त्व नागेशानें वरील वर्णनांत सूचित केलें आहे.

पण कित्येक वेळां नागेशाचा ताळ सुटतो, व त्याच्या रसिकतेची मजल अश्लीलतेपर्यंत किंबहुना बीभत्सतेपर्यंत जाते. रसिक माणसाचें कित्येक

वेळां असेंच होतें, त्यांतलाच हा प्रकार आहे. ‘ त्यांत थोडा गांवढळपणा आहे’ असें कै. भावे म्हणतात,[१] तें ‘ चंद्रावळीवर्णनांत ’ चंद्रावळीबरोबरच्या गोपांगनानीं श्रीकृष्णाच्या संवगड्यांना हांसडलेल्या कांहीं अश्लील शिव्यांवरून अगदीं खरें वाटतें.[२] ‘सीतास्वयंवरां’तही, अहिल्या-इंद्राच्या रतिप्रसंगाच्या संभाषणप्रसंगीं[३] व पुढें भोंदू गोसाव्याचा कावा वर्णन करतांना,[४] नागेशानें सदभिरुचीला हीनता आणणारी भाषा वापरली आहे. चार लोकांत जे शब्द उच्चारतांना मनाला खंत किंवा किळस यावी, असे शब्द काव्यांत योजतांना आमच्या कवीला कवडीचीही दिक्कत वाटत नाहीं. ब्राह्मणाच्या कांहीं त्याज्य बायकांचीं लक्षणें[५], रावणाला पाहून स्वयंवरास आलेल्या राजांची उडालेली गाळण,[६] किंवा शिवधनुष्य उचलतांना रावणची झालेली फजीति[७], हीं स्थळें वरील विधानास पुष्टि देणारीं आहेत. कदाचित् आपल्या काव्यांत नवरसांचा परिपोष व्हावा या अभिनिवेशानें, किंवा रावणासारख्या व्यक्तीबद्दल लोकांना घृणा उत्पन्न व्हावी म्हणून, अशी भाषा नागेश वापरीत असावा. एवढें मात्र खरें कीं, अश्लील व बीभत्स यांमध्यें आज आपण जो फरक करतों, तो हा कवि जाणत नसावा. अश्लीलांत उत्तान किंवा संभोग शृंगाराचा समावेश होत असून, सदभिरुचीला विघातक म्हणूनच ती गोष्ट चारचौघांत उच्चारण्यास आपण दबकतों. वास्तविक अश्लील गोष्ट मनाला ऐकावीशी वाटते. याच्या उलट बीभत्स हा रस, मनाला घृणा, चिळस, उत्पन्न करणारा आहे. बीभत्स गोष्टी पाहून व ऐकून ओकारी येते, म्हणून त्या मनाला नकोशा वाटतात.

नागेशानें आपल्या काव्यांत अशा रसाला व वर्णनाला कां थारा दिला, याचें कारण वर दिलेंच आहे. बीभत्साची गोष्ट सोडल्यास, अश्लीलत्वा-

---

१ महाराष्ट्र सारस्वत—आवृत्ति ३. पृ. ७५. २ चंद्रावळी वर्णन २२६—२४०. ३ श्लोक ११४-११७. ४ श्लोक १८५. ५ श्लोक १४१. श्लोक ६ ३२७—३२८. ७ श्लोक ३४३, ३४७.

बद्दल नागेशास एकट्यास जबाबदार धरतां यावयाचें नाहीं. वामन पंडितासारख्या वेदांती कवीनें, आपल्या ‘ राधाभुजंग ’ व ‘ राधाविलास ’ या प्रकरणांत श्रृंगाराचा अतिरेक केला आहे. मुक्तेश्वराच्या काव्यांत विशेषतः आदिपर्वांतील शकुंतलाख्यानांत, अशा वर्णनास बहर आला आहे. शिवाय जी गोष्ट संस्कृत कवींनीं केलेली चालते, ती मराठी कवींनीं केलेली पुरवत नाहीं, हें कसें ? कालिदासाचे ‘ ज्ञातास्वादो ’ इ. सारखे श्लोक, रसिक मिटक्या मारित वाचतात, पण तीच गोष्ट नागेशासारख्यानें मराठींत म्हटली कीं, त्याच्यावर ‘ अश्लील ’ असा शिक्का बसतो. याचें कारण संस्कृत भाषेची अगम्यताच होय. श्रृंगारिक मराठी काव्यें, संयमानें वाचण्याची संवय अंगीं मुरल्याशिवाय वरील मनोवृत्ति नष्ट होणार नाहीं.

असो. नागेशाच्या वर वर्णन केलेल्या गुणाबरोबर त्याच्या बुद्धीच्या सूक्ष्मतेबद्दल थोडें लिहिणें जरूर आहे. नागेश डोळे उघडे ठेवून वागत असे. त्यानें आपल्या भोंवतीचें जग बारकाईनें पाहिलें होतें. गुरुशिष्यांचें वर्तन, शिष्यांचा बडबड्या स्वभाव, गोसाव्याचें बकध्यान या गोष्टी त्यानें केव्हां तरी पाहून स्मरणसंपुटांत ठेवून दिल्या. कोंकणस्थ हे बुद्धीचे तरल असतात, ही गोष्ट नागेशाच्या दृष्टींतून सुटलेली नाहीं. “ शास्त्रापेक्षां रूढीकडे ग्रामजोशाचें विशेष लक्ष असतें. विवाहविधींतील, कृत्यें टराविक क्रमानेंच झालीं पाहिजेत यावर त्यांचा कटाक्ष असतो ”[१] या गोष्टींचें सूचक म्हणून दोन ब्राह्मणांचें जें भांडण, कवीनें वर्णन केलें आहे, तें त्याच्या सूक्ष्मावलोकनाचेंच द्योतक आहे.

## ( ८ ) नागेशाचे काव्यगुण

यानंतर आमच्या कवीच्या काव्यगुणाकडे वळण्यापूर्वी, काव्य म्हणजे काय याचा अगदीं थोडक्यांत विचार करणें, अस्थानीं होणार नाहीं, असें वाटतें. काव्याच्या व्याख्येसंबंधीं संस्कृत साहित्यशास्त्राच्या ग्रंथांत जो मतमतांतराचा गलबला उडालेला दिसतो, त्याचा परामर्श घेऊन जागा

१ विविधज्ञानविस्तार—मे. १९२९—प्र. धों. कानिटकर.

अडविण्यापेक्षां, येथें एवढेंच सांगावेसें वाटतें कीं, सौंदर्यदर्शनानें सात्विक आनंदाची प्राप्ति घडविणें हें काव्याचें ध्येय, भावनेनें किंवा रसाविष्कारानें जितकें घडून येतें, तितकेंच तें कल्पनेच्या उच्च भरारीनेंही प्राप्त होऊं शकतें. यावरून भावना व कल्पना किंवा रस व अलंकार यांपैकीं एके-काचा किंवा एकसमयावच्छेदेंकरून दोघांचा जो विलास, त्यांस 'काव्य' म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. कित्येक माणसें भावनाप्रधान तर कित्येक बुद्धिप्रधान असतात. कांहींना निरनिराळ्या भावनांचा किंवा रसांचा आस्वाद घेतांना आनंद होतो, तर कित्येकांना रम्य कल्पनांनीं नटलेलें वर्णन वाचून विशिष्ट प्रकारच्या आनंदाची प्रतीति होते. विभाव, अनु-भाव व व्यभिचारीभाव या सर्वांच्या मिलाफानें उत्पन्न झालेल्या स्थायी-भावांच्या आस्वादास रस अशी संज्ञा आहे. हे रस नऊ आहेत. त्याच-प्रमाणें कवींचा कल्पनाविलास, काव्यामध्यें ज्या निरनिराळ्या प्रकारांनीं प्रकट होतो, त्यांस संस्कृत साहित्यशास्त्रांत 'अलंकार' अशी संज्ञा आहे. हे अलंकार, साम्य, विरोध, भेद, अभेद, अशा आधारांवर उभारले गेले आहेत. त्यामुळें यांत अनेक भेद पडून, त्यांची संख्या शंभरावर गेली आहे.

भावना व कल्पना यांच्या द्वारां रमणीय अर्थाची निष्पत्ति, अशी जी वर काव्याची व्याख्या दिली आहे, तिला अनसरून पाहूं गेल्यास, नागेशाच्या काव्यांत दोघींचाही विलास पहावयास सांपडतो. आपल्या 'सीतास्वयंवर' काव्यांत नवरसांचा परिपोष झाला आहे, असा कवीचा अभिनिवेश आहे[1]. इंद्र—अहिल्या संभाषणांत शृंगार, तर गौतम-अहिल्येच्या संभाषणांत कारुण्य, रामानें शिवधनुष्य पदनखानें उचलून टाकण्यांत वीर, तर शिवधनुर्भंग झाल्यावर पृथ्वीतलावर व अन्यत्र उडा-लेल्या हाहाःकारानें रौद्र, सीतास्वयंवरास जाणाऱ्या गुरु—शिष्यांच्या वर्ण-

१ सीतास्व. श्लो. ३१.

नांत हास्य, तर रावणाच्या स्वयंवर-मंडपांतील आगमनानें राजांच्या उडालेल्या धांदलींत भयानक, ब्राम्हणांच्या कुरूप स्त्रियांच्या वर्णनांत व शिवधनुष्य उचलतांना, रावणाच्या झालेल्या फजीतींत बीभत्स, तर रामपदस्पर्शानें शिळेची अहिल्या बनण्यांत अद्भुत, व शेवटीं रामाच्या ' शुभ मंगल सावधान ' समयीं शांत, अशा नवरसांचा परिपोष वरील निरनिराळ्या प्रसंगीं आमच्या कवीनें केला आहे. परंतु साधरणतः शृंगार, हास्य व बीभत्स, या तीन रसांचेंच आधिक्य प्रस्तुत काव्यांत दिसून येईल.

नागेशाला भावनेचा आविष्कार उत्तम साधतो. अहिल्यारूपी शिळेस पाय लावतांना, रामाची चलचित्तवृत्ति व हळुवार मन, उत्तम व्यक्त झालें आहे. शाप झाल्यावर अहिल्येनें गौतमाची केलेली विनवणी, हृदयाला पाझर फोडणारी आहे. प्रचंड धनुष्य व वामनमूर्ति राम असा विरोध पाहून, रामाला धनुष्य उचलेल कीं नाहीं, याबद्दल सीतेला लागलेली हुरहूर, तिनें केलेल्या देवांच्या नवसामुळें उत्कटतेनें प्रतीत होते. धनुष्य उचलण्याच्या पूर्वी रावणाचें ब्रम्हांडाला गवसणी घालणारें बढाईखोर भाषण, व धनुष्य उचलतांना, तें जेव्हां त्याच्या छातीवर बसलें, व तो उलथून पडला, त्यावेळीं त्यापासून आपली सुटका करण्यासाठीं, तेथें जमलेल्या राजांची व लोकांची त्यानें केलेली विनवणी, हे परस्परविरोधी प्रसंग पाहिले म्हणजे, एकाच माणसाची भिन्न परिस्थितींतील भिन्न भावना वर्णन करण्यांत, नागेश किती कुशल होता, हें पटल्यावांचून रहात नाहीं.

कल्पनाविलासांतही आमचा कवि कोणत्याही प्रतिभासंपन्न कवीपेक्षां कमी ठरणार नाहीं. केवळ सीतेच्या केलेल्या आपादमस्तक व तपशीलवार अवयववर्णनावरून, वरील विधानाची सत्यता पटेल. यांत सीतेच्या पदनखांवर केलेल्या हेतूत्प्रेक्षा, तिच्या कटीवर केलेले व्यतिरेक, रोमराजीचें वर्णन करतांना केलेल्या हेतूत्प्रेक्षा व अपन्हुति, पयोधरावर केलेल्या हेतूत्प्रेक्षा, पाहिल्या म्हणजे नागेशाच्या बुद्धीचे नवनवोन्मेष दृष्टीस पडतात.

'उत्प्रेक्षा' हा अलंकारच असा आहे कीं, एकाच वर्ण्यवस्तूच्या ठिकाणीं, निरनिराळे कल्पनाविलास कवीला त्यामुळें दाखवितां येतात. आमच्या कवीनें याच अलंकाराचा उपयोग प्रामुख्यानें केला आहे. त्यानें केलेल्या या अवयववर्णनास संस्कृत कवींच्या ठराविक संकेतांचा आधार असला, तरी त्यानें आपल्या योजकतेनें व आंगच्या प्रतिभेनें एक दोन ठिकाणीं कल्पनेचें स्वातंत्र्य दाखविलें आहे. संस्कृत ललितवाङ्मय रसिकतेनें वाचून त्यांतील ज्या रम्य कल्पना नागेशानें आपल्या मनांत सांठविल्या, त्यांनाच आपल्या उच्च प्रतिभेची जोड देऊन, त्यानें सीतेच्या 'रोमराजी' चें 'पयोधरां' चें, आपांग नेत्रांचे, व 'भांगा' चें वर्णन केलें. हें मराठी वाङ्मयांत अभिनव व आल्हादकारक वाटल्यावांचून राहणार नाहीं. या अवयववर्णनाव्यतिरिक्त मिथिला नगरींतील उंच फडफडणाऱ्या निशाणावर कवीनें

"काय येत नभि निर्मळ मासा"

अशी जी नाविन्यपूर्ण उत्प्रेक्षा केली आहे, ती कोणाला कौतुकास्पद वाटणार नाहीं? भावना व कल्पना यांचें अभिनव व सुंदर मिश्रण नागेशाइतकें दुसऱ्या मराठी कवीनें दाखविलेलें दिसत नाहीं.

काव्याच्या वरील दोन घटकांबरोबरच, नागेशाच्या काव्यांत इतर काव्यगुणही सामावलेले दिसतात. ओज, प्रसाद व माधुर्य या त्रिगुणांपैकीं ओज गुण नसला तरी बाकीच्या दोन गुणांचें अस्तित्व त्याच्या काव्यांत भरपूर आहे. प्रसाद हा गुण सर्व रसानुकारी असून, त्यायोगानें काव्य उच्चारतांच, तत्प्रतीतीनें मनःपटावर तदर्थाचा विस्तार होऊन इच्छित रसाची निष्पत्ति तत्क्षणींच होते. नागेशाच्या काव्यांत प्रसाद चांगला असून अगम्य असा भाग त्यांत फार अल्प आहे. सर्वसुलभता हा या कवीच्या काव्यांचा विशेष असून, सोप्या शब्दांत वर्णिलेलीं शृंगार, हास्यरसादि वर्णनें अतएव वाचनीय झालीं आहेत. 'साहित्यदर्पणांत' "चित्तस्य द्रवीभूतमयोल्हादो माधुर्यमुच्यते" अशी माधुर्याची व्याख्या दिली आहे. माधुर्य प्रतीत

होण्यास ट् वर्गाशिवाय, कूपासून मूपर्यंत, सर्व वर्ण असावे लागतात त्याचप्रमाणें प्रत्येक वर्गाच्या मागें, त्या त्या वर्गाचे अनुनासिक, व ऱ्हस्वस्वरान्वित र्, ण्, असावे लागतात. सारांश कर्णमधुररचना, हीच वरील गुणाची द्योतक असून, नागेशाच्या काव्यांत अशीं स्थलें म्हणजे गौतमाश्रमवर्णनप्रसंग,[१] किंबहुना द्रुतविलंबित वृत्तांतील त्याची बहुतेक रचना, असें म्हणावयास हरकत नाहीं.

अर्थाला व रसाला सर्वस्वी अनुकूल अशी नादवती वर्णरचना ( sound with the sense ) योजणें, हा नागेशाच्या काव्यांचा आणखी विशेष होय. करुण किंवा शृंगाररसवर्णनाच्या वेळीं, त्याची रचना मृदु; तर रौद्र, भयानक व बीभत्स या रसांच्या वेळीं, ती कठोर बनते. रसस्थलांचा वर उल्लेख केला असल्यामुळें, यासंबंधीं जास्त लिहून विस्तार करीत नाहीं. पण एवढें मात्र खरें कीं, आमच्या कवीला अर्थालंकारांपेक्षां शब्दालंकाराचीच विशेष गोडी आहे. नागेश आपल्या काव्यांत अनुप्रास, यमक, व श्लेष यांची यथेच्छ पेरणी करतो. पादाच्या शेवटीं दोन दोन अक्षरांचीं यमकें सर्व साधारण असून, तीं बहुधा श्लिष्ट आहेत. पण चार चार पांच पांच अक्षरांचींही यमकें योजतांना याला कांहीं त्रास पडत नाहीं. नाचे, नाचे; काचे, कांचे; वर दाने, वरदाने; विराजतो, कविराज तो; हीं त्याचीं कांहीं आवडतीं यमकें आहेत. कै. भावे म्हणतात कीं " मोरोपंताप्रमाणें पुष्कळ अक्षरांची लांब लांब यमकें करण्याच्या हौसेनें यानें आपल्या रचनेस क्लिष्टता आणली आहे.[२] " पण अशीं 'समुद्र यमक' साधल्याचीं स्थळें, 'चंद्रावळीवर्णनां'तील श्लोक २८५, व 'सीतास्वयंवर' २८९ " पाहा वयाचा भवभाव लाहे। पाहावयाचा भवभावला हे " एवढीं दोनच आहेत. अशा एक दोन स्थलांवरून कवीच्या सर्वच रचनेवर क्लिष्टतेचा आरोप करणें, योग्य होणार नाहीं. यमकाकरितां तो वामनाच्या मानानें शब्दाची क्वचित्च ओढा-

---

१ सीतास्वयंवर ८९–९४. २ महाराष्ट्र सारस्वत. आवृ. ३ पृ. ७४.

ताण करतो. उलट त्याच्या रचनेंत सभंग श्लेषात्मक यमकाची, सुंदर उदाहरणें पुष्कळच सांपडतील. अनुप्रास देखील नागेशाच्या रचनेचा विशेष असून सीतास्व. श्लोक २४३, ३४६ व ३४७ हीं त्याचीं ठळक उदाहरणें होत. वरील विवेचनावरून नागेशाचें काव्य अगदीं निर्दोष आहे, असें माझें म्हणणें नाहीं. वृत्तसुखार्थ त्यानें ऱ्हस्वदीर्घांची ढिली रचना केली आहे. ( उदा० शिबिकारुढ, क्षिरोदरीं, अनुपम्य, चरणेक-घात, तीन्हे, सैन्यकास तीक्षण ). एकाच श्लोकांत एकदां आलेल्या कल्पनेची त्याच श्लोकांत, किंवा पुढील एक दोन श्लोकांत तो पुनरुक्ति करतो.[१] बीभत्सवर्णनानेंही त्याच्या काव्यास थोडें गालबोट लागलें आहे. हे दोष वगळल्यास नागेशाच्या काव्यांत भावनांचा व कल्पनांचा रम्य-विलास, व प्रसाद, माधुर्य या गुणांचा गौरव, झालेला कोणालाही आढळेल. त्याच्या काव्यावरून साहित्यशास्त्राशीं त्याचा चांगला परिचय दिसून येतो. मग, "तसेंच काव्य म्हणावें कशाला? या साध्या गोष्टींसंबंधींचीही याची कल्पना अगदीं पुसट व अंधुक असल्यामुळें, याच्या काव्यांत अनेक तऱ्हेचे दोष आले आहेत.[२]" हा आरोप टिकावा कसा ?

## (९) वर्णनशैली.

यानंतर नागेशाच्या वर्णनशैलीकडे वळावयाचें आहे. कोणत्याही कवीच्या काव्यांत व्यक्तिवर्णनें व स्थलवर्णनें हा महत्त्वाचा भाग समजला जातो. त्यास अनुसरून, नागेशाच्या काव्यांत दोन्हीं तऱ्हेचीं वर्णनें आलीं आहेत. तथापि स्थलवर्णनापेक्षां व्यक्तिवर्णनांत तो विशेष रमतो. व्यक्तींचें तो अशा बारकाव्यानें वर्णन करतो कीं, वर्ण्यविषय चटकन् दृष्टीसमोर उभा रहावा. गुरुशिष्यांच्या झालेल्या हास्यविनोदाचें शब्दचित्र,[३] नागेशानें अशा कौशल्यानें काढलें आहे कीं, तसा प्रसंग आपण पाहतों आहों,

---

१ सीतास्व. १०, २५, २६, २७४, २७५. २ महाराष्ट्र सारस्वत आवृ. ३ पृ. ७४. ३ सीतास्व. ७२—७७.

असा भास होतो. निरनिराळे कुरूप शिष्य व गडबड्या स्वभावाचे अतएव खालीं आपटणारे वृद्ध, तट्टाला फोक मारणारे शिष्य, व त्यांच्या माकडचेष्टा, नागेशानें पाहून वर्णिल्या असाव्या. ढोंगी व भोंदू गोसाव्याच्या वर्तनाचें वर्णन करून, त्यानें तत्कालीन बुवाबाजीवर चांगलाच प्रकाश पाडला आहे. गोसाव्याच्या डोळ्यांची हालचाल, त्याचा आहार, विधवांना लगामी लावण्याचें त्याचें कसब, या गोष्टींवर नागेशाचा कटाक्ष असून, आपल्या काळच्या अशाच एकाद्या गोसाव्याचीं कुलंगडीं बाहेर काढण्याची संधि, या वर्णनानें त्यानें साधून घेतली असावी. नागेश थोडा फार रसिक असल्यामुळें, पुरुषवर्णनापेक्षां स्त्रीवर्णनाकडे त्याचें लक्ष जास्त आहे. कुरूप स्त्रीचें त्याचें वर्णन वास्तविक, तर सुंदर स्त्रीचें त्यानें केलेलें वर्णन, किंवा सीतेचें सर्वच वर्णन ('चंद्रावळीवर्णनां'त हेच श्लोक चंद्रावळीवर्णनप्रसंगीं घातले आहेत) अलौकिक अतएव काव्यमय वाटतें. 'सीतास्वयंवरां' तील गौतमाश्रमवर्णन ( हेच श्लोक 'चंद्रावळीवर्णनां'त हरिवनवर्णनासाठीं योजले आहेत. ) किंवा मिथिला नगरीच्या लांबूनच्या दृश्याचें वर्णन, हीं स्थलवर्णनें देखील ठराविक ठशाची व अतिशयोक्तिमय आहेत. या वर्णनांत संस्कृतच्या सरणीप्रमाणें चैतन्यावरोपाचा (pathetic fallacy) कवीनें अवलंब केला आहे. पण पुढें केलेलें मिथिलानगरीचें वर्णन[1] मात्र अगदीं वास्तविक असून, कै. भावे म्हणतात त्याप्रमाणें[2] तें नागेशकालीन अहमदनगर राजधानीचें असेल, असें कोणालाही वाटेल. नागेशाच्या काळीं अहमदनगरप्रांतावर मुसलमानी अंमल जारी होता, व कर्णे नफेऱ्या, इ० राज्यव्यवहारकोशांत सांपडणाऱ्या वाद्यांच्या उल्लेखानें तर वरील विधानास दृढता येते.

असो. नागेशाच्या वर्णनशैलीबद्दल कांहीं आक्षेप काढण्यांत आले आहेत. "वर्णनाची मर्यादा किती असावी, वगैरे साध्या गोष्टींसंबंधाचीहि याची कल्पना अगदीं पुसट व अंधुक असल्यामुळें, याच्या काव्यांत

---

१ सीतास्व. १६६—१७४. २ महाराष्ट्र सारस्वत आवृ. ३ पृ. ७५

अनेक तऱ्हेचे दोष आले आहेत. हा एकदां वर्णन करूं लागला म्हणजे मूळ कथानक अगदीं नजरेआड करतो; व वर्णनाचा अगदीं कंटाळा येऊन वाचक मनांत दहादां पुरे पुरे म्हणेपर्यंत हा आपलें तें चऱ्हाट चालूंच ठेवतो. तसेंच वर्णन कशाचें करावें आणि कशाचें न करावें, हा विधिनिषेध तर याला काडीइतका नाहीं.[१]" असा आरोप कै० भाव्यांनीं केला आहे. 'चंद्रावळीवर्णनां'त दिलेल्या गोपींच्या नांवांनीं व श्रीकृष्णाच्या संवगड्यांच्या नांवांवर कोटी साधून त्यांच्या स्वभावाच्या केलेल्या वर्णनांनीं वाचकांना थोडा बहुत कंटाळा वाटतो. पण हें म्हणणें 'सीतास्वयंवरास' लागू करतां येणार नाहीं. नागेशानें या काव्यांत आपल्या वर्णनांना आपल्या विनोदाची अशी जोड दिली आहे कीं, हीं वर्णनें पुनः पुनः वाचावींशीं वाटतात. सीतेच्या वर्णनांत तर त्याची प्रतिभा अशी चमकली आहे कीं, असें वर्णन तो आणखी लांबवील तर बरें, असें वाटूं लागतें. जागजागीं त्यानें असें प्रसंग निर्माण केले, म्हणून त्याच्या वर्णनास लज्जत आली आहे. मराठी कवींना शृंगार किंवा भक्ति यांशिवाय इतर रसांची ओळख नाहीं, असा एकीकडून आरोप तर, नागेशासारख्या कवीनें थोडेंसें विषयांतर करून हास्य, विनोद व बहुश्रुतता दर्शविली तर त्यालाही 'चऱ्हाट' असा शेरा मिळाल्यास, यांतून मार्ग कसा काढावयाचा? शिवाय आपण कोठें अतिशयोक्ति करून वर्णनविस्तार करतों, याची जाणीवही कवीला आहे—

श्रीराम येईल भजोनि येथें, म्हणोनि साही ऋतुवास यथ ।
याकारणें मिश्रित वर्णनांनीं, ने देइजें दूषण पंडितांनीं ॥ ९९ ॥

अशी स्पष्ट क्षमायाचना त्यानें केलेली आहे. निरनिराळ्या प्रकारचे दागिने, हत्यारें, वाद्यें व घोडे यांचीं वर्णनें, मध्यंतरीं विषयांतर करून घातलीं, म्हणून जर कवीला 'कशाचाच विधिनिषेध' नाहीं म्हणून

---

१ महाराष्ट्र सारस्वत आवृ. ३ पृ. ७४.

म्हणावयाचें, तर मग मराठी कविं निवळ टाळकुटे होते, व त्यांचें आजू-बाजूला लक्ष नव्हतें, असा आरोप तरी त्यांच्यावर काय म्हणून करावयाचा ?

## ( १० ) तत्वज्ञान.

पण, तत्त्वज्ञानाच्या बाबतींत नागेश शांकरमतानुयायीच दिसतो. ' ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' । असें अद्वैत तत्त्व त्याला मान्य आहे.[१] कर्में, बंधनरूप असून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटणें हें मोक्ष-रूपी ध्येय, त्यानें आपणांपुढें ठेविलें आहे.[२] हठ योगादि शास्त्रें कुचकामाचीं असून अहंभाव नष्ट होऊन सर्वत्र समदृष्टि झाल्यानें यमाचा फेरा चुकवितां येतो, अशी त्याची खात्री आहे.[३] या अद्वैताबरोबरच जड अज्ञानाची बेडी तोडण्यास, श्रीरामनामाचा ज्यावेळीं तो तोडगा सांगतो, त्यावेळीं निर्गुण–सगुणोपासनेची तो इतर मराठी कवीप्रमाणेंच सुंदर सांगड घालतो.[४] ' सीतास्वयंवर ' हा भक्तीचा एक प्रकार असून, नागेशकालीं श्रीसमर्थांनीं महाराष्ट्रांत प्रसृत केलेल्या रामभक्तीचें तें एक प्रतीक आहे.

## ( ११ ) नागेशाची भाषा

याप्रमाणें नागेशाच्या अनेक गुणांचें यथाक्रम व यथासांग विवेचन केल्यावर, आतां त्याच्या भाषेकडे थोडें वळणें बरें. ग्रंथकाराचा काल ठरविण्यास जशा इतर बाह्य गोष्टी उपयोगीं पडतात, तद्वतच भाषेसारखीं अंतःसाधनेंही विचारांत घ्यावीं लागतात. नागेशाची भाषा मराठी, संस्कृत, अपभ्रष्ट व फारशी, अशा चतुर्विध शब्दांनीं अलंकृत झाली आहे. याची कांहींशी कल्पना यावी, यासाठीं खालील निवडक शब्दांचीः—

**जुने मराठी शब्दः**—भार, सज्ज, नाचे, माला ( मायला ), उटाळी, सपेटी, वोपा, जनला, वोजा, कांचें, समापणें, तारा, सांवरिली, बहुवस, बहु-वस्त, भातुकें, बरग, बांदरी, सींतरणें, तलगा, करबाडें, बाडें, जमदाडें, परज,

---

१ चंद्रावळीवर्णन ३०५. २ सीतास्व. श्लोक. ८, ११, १४. ३ सीतास्व. श्लोक १८, २६, ३२. ४ सीतास्व. श्लोक ८.

मेहुणें, सातें, उगला, निशाणें, पेलणें, गांठीं, रळी, झासा, संचणें, गदूटी, थोंट, खुळी, चाट, तिवाटी कुऱ्हाडी, खटाळी, गटाळी, सटाळी, फटाळी, पाळी, शारें, धडफुडे, धडका, विपारे, लंडी, ग्लांति बरवंटी, परवंटी, सळे, कुडपुणें, पूर्वील, हटेलें, ठोंक, निचरणें, आयती, भुलणें, आवा.

**संस्कृत शब्द:**—प्रमाणिक, अखर्व, सुरगोप, धामिल्ल, मनु, विभाकर, देशांतक, धिषण, विंशतिनेत्रशंका, ह्रीमवासना, कुक्कुर, परिपाक आरव, ग्रीवाखर्व, मुदिर, सौराज्य, मरुज, भुक्ति, कामागार, बहुभर्तृका.

**अपभ्रष्ट शब्द;**—साहे, ( साह्य ), जाला ( झाला ) सइंवर, येक ( एक ), उच्छ्राप, बुद्धुर.

**फारशी शब्द:**—हुदा, मेवा, तमासा, दमामा, तमाम, तोहबंदी, हय-कोल, सरताज, हंमैल, जेहगीर, जेहर, माडी, झरोका, तोरा, बागदार, हुमिया ( हुमा ), बदक्षान् , नामर्द, हराम, सादर, शफत, सफेरत, चादर, गल्बला, गपा, शफत.

अशी यादी दिली आहे. आमच्या कवीची भाषा संस्कृतशब्दप्रचुर किंवा संस्कृत समासबद्ध असें म्हणतां यावयाचें नाहीं. फक्त जेथें 'रघुवंशा'सारख्या आधारभूत संस्कृत ग्रंथांचाच अनुवाद केला आहे, तेथें ती तशी असणें अपरिहार्य आहे. पण त्याची मराठी भाषा जिवंत व कसलेली आहे, हें त्यानें योजलेल्या, हुदा फिरणें, रान लावणें, उरीं फुटणें, शिरीं धोंड बसणें, डोळे घालणें, खोळे पाडणें, तारूं लुटणें, टिका घेणें, रानें लावणें, कपाटें देणें, ठोक फोडणें, मांडीखुटी येणें, करीं धरणें, मुरकुंडी घालणें, शंका येणें, चुडे राखणें. इत्यादि म्हणींवरून व अनेक जुन्या मराठी शब्दावरून लक्षांत येईल.

कोणत्याही कवीच्या लेखनशैलींत त्याच्या स्वतःचा किंवा त्याच्या काळचा असा एक ठसा उमटलेला असतो. नागेशाच्या काव्यांत सिंतरणें, फट्ट, नामर्द लंडी, कारभारी, शेला, पटका, वाडा, झरोका, विपारे, ग्लांति, हे शब्द त्याचें समर्थकालीनत्व दर्शवितात. 'सीतास्वयंवरां'त होइजे, घेइजे,

साधिजे, अशीं कर्मकर्तरी प्रयोगाचींही रूपें आढळतात. 'भारें करूनि' अशा तृतीयेच्या उदाहरणांत, तृतीयेच्या रूपापुढें 'करून' जोडण्याची रीत त्याकाळीं होतीसें दिसतें. 'शुभलक्षणेशीं' असें ज्ञानेश्वरकालीन सहार्थी तृतीयेचे रूपहि येथें आहेच. पंचमीचे ऊन–हून प्रत्यय, शब्दाच्या सप्तमीच्या रूपापुढें जोडलेले सांपडतात. ( पहा 'कपाळींहुनि' ); द्वितीयेच्या प्रत्ययाबद्दल 'लागुनिया' या शब्दाचा प्रत्ययासारखा उपयोग केला आहे; ( गौतमालागुनिया ), षष्ट्यर्थी सामान्यरूप घालण्याची ज्ञानेश्वरीची पद्धति एक दोन ठिकाणीं डोकावलेली आहे ( कन्यके लाभ ), तर षष्ठीकरितां एके ठिकाणीं द्वितीयेचा उपयोग केला आहे. ( ब्रह्मांडासि करीन दोन शकलें ). एकच शब्दाला दोन सप्तमीचे प्रत्यय लावल्याचें उदाहरणहि काव्यांत सांपडतें, ( ' भूतळींत, ' श्लो. २८ ). नागेशाच्या भाषाशैलीचा आणखी दुसरा विशेष म्हणजे, तो 'लागणें' याबद्दल 'निघणें' या शब्दाचा उपयोग करतो, ( करूं निघाला ). 'झाला असता' याबद्दल 'होता' अशीही शब्दयोजना त्यानें केली आहे. 'म्हणून' बद्दल 'म्हणवुनि' याचा तो उपयोग करतो, ( श्लोक ११७ ). त्याचप्रमाणें, नामापासून क्रियापद करण्याची पद्धति, (आशिर्वदला); व ' नवस नवसणे,' अशा तऱ्हेच्या ( Cognate object) सजातीय कर्माचें उदाहरणही त्याच्या रचनेंत नाहीं असें नाहीं. आमचा कवि वृत्तसुखार्थ खालील दोष स्वीकारतो.:—

[ १ ] संधि करण्याचें टाळतो, ( उदा० पिच्छ—आशा, श्रवण-अवधि, नृप अवतारा इ० ). [ २ ] मराठींत होत नाहीं तेथें संधि करतो ( उदा० धरिताहे, करिताहे ). [ ३ ] मूळ शब्दांतील मात्रा गाळतो ( ' देखे ' बद्दल ' देख ', चिंचपेटी' बद्दल 'चिंचपटी'). [४] मुळांत नसेल तेथें कान्याची भर घालतो. ( ' दहा ' बद्दल ' दाहा ', 'बदामें' बद्दल 'बादामे', ) [५] वर्णागम घडवून आणतो. ( तीक्षण, आकरोटें, मारिग. )

नागेशाच्या भाषेचे आणखी थोडे विशेष सांगावयाचे म्हणजे [ १ ] शब्दश्लेष—पर ( शत्रू ), पर ( पिसें ). रामा (सुंदर स्त्री), रामा ( देवाचें

नांव ), तूळ ( रास ), तूळ ( तुल्य ). [ २ ] नकारार्थी अव्यययुक्त क्रियापदें,–' नोबले ' ' नायकाल.' [ ३ ] संस्कृत शब्दाचीं अपभ्रष्ट रूपें– ' अनुपम्य, सैन्यकास, रघोत्तमा, चरणेकघात; असे थोडे फार देतां येतील. इतकें असून ' दुःखासि द्यावें मन हेंच रामा ! ' अशी थोडीशी चमत्कारिक वाक्यरचनाही एके ठिकाणीं आढळली. कवीची शब्दसंपत्ति अपार असून तो कांहीं शब्दांचा दास बनतो. सामराजानें ' निपट ' या शब्दाचा नुसता ध्यास घेतला आहे. पण नागेशाचा अगदीं लाडका असा शब्द नाहीं. फक्त सामराजाप्रमाणेंच 'सज्ज' हा शब्द इतरांच्या मानानें त्यानें जरा जास्त वेळ वापरला आहे.

इतर शब्दांबरोबरच नागेशानें राजव्यवहारकोशांत सांपडणाऱ्या शब्दा-व्यतिरिक्त, बरेच अरबी व फारशी शब्द आपल्या काव्यांत योजले आहेत. मुसलमानी राज्यांत त्याच्यासारख्या विचक्षण कवीस फारशी भाषेचें ज्ञान झाल्यास नवल नाहीं. पण त्यानें सफेरत, सरताज, हुमिया, असे कांहीं शब्द वापरले आहेत कीं, ज्यामुळें त्याच्याप्रमाणेंच फारशी शब्द उपयोगणाऱ्या सामराजापेक्षां, त्याचें हें भाषाज्ञान विशेष वाटावें. साम-राजाच्या काव्यांत फारशी शब्दांचा भरणा नागेशापेक्षां जास्त आहे, असें श्री. प्र. धों. कानिटकर म्हणतात. पण तशी मोजदाद केल्यास, ते तितके अल्प भरणार नाहींत. शिवाय सामराजाच्या हजार श्लोकांचें व नागे-शाचें ४१५ श्लोकांचें मान लक्षांत घेतल्यास, त्रैराशिकानें नागेशाचेच फारशी शब्द जास्त भरतील. वर केलेल्या विचारावरून नागेशाची भाषा जुनी असून तीं सामराजाच्या भाषेशीं अगदीं तंतोतंत जुळते. 'शिकवीस', ' बसलीत ' अशीं जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें, ' नवजाय ' हें जुन्या कवींत सांप्रडणारे क्रियापद, विशेष्याप्रमाणें विशेषणाचा लिंगभेद ( तरळा दीपमाळा ), असे कांहीं सामराजाचे प्रकार मात्र आमच्या कवींत सांपडत नाहींत. तसेंच सजातीय कर्मांचा उपयोग सामराजानें जास्त वेळां केला आहे. यावरून नागेश, सामराजानंतरचा, म्हणजे त्यानें सामराजाचें

काव्य पाहिलें असावें, असा तर्क करण्याकडे मन वाहतें.

## (१२) वृत्तप्रभुत्व

नागेशानें आपल्या रचनेंत सामराजाप्रमाणें सर्वसाधारण उपजातिवृत्ताची योजना केली असून, मध्यतरीं द्रुतविलंबित, स्वागता, भुजंगप्रयात, वसंततिलका, स्रग्विणी मालिनी, इंद्रवज्रा, तोटक, मदिरा, चंपकमाला, माल्यभारा, अशीं नेहमींचीं, तर प्रमाणिका व मकरकशीर्षा, अशीं थोडींशीं अपरिचित वृत्तेंही, त्यानें वापरलीं आहेत. प्रमाणिका व मकरकशीर्षा या वृत्तांमुळेंच नागेशाचें छंदःशास्त्राचें ज्ञान खोल असावें असें अनुमान निघतें. नाहीं तर, मुद्दाम कान्याकोपऱ्यांतलीं वृत्तें आपल्या काव्याकरितां कोण शोधून काढील ? नागेशाच्या समकालीन कवींनीं या वृत्तांचा कोठें फारसा अवलंब केलेला नाहीं, यावरूनही त्याचें छंदःशास्त्र–वैशिष्ट्य इतरापेक्षां चटकन् मनांत भरतें. प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं आपल्या 'छंदोरचना' या ग्रंथांत 'प्रमाणिका' वृत्ताचें लक्षण व इतिहास दिला आहे. त्यांत 'मराठींत उदासदासकृत महाबळचरित्र आणि अनंतकृत सुरसुधन्वाख्यान (६७–७४) नि बभ्रूवाहनाख्यान (१।५९–६५) इत्यादिकांची रचना प्रमाणिका वृत्तांत आहे' असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें 'मकरकशीर्षा' वृत्ताचेंही लक्षण व इतिहास सांगतांना, राजशेखराची 'कर्पूरमंजरी,' रूपदेवकृत 'स्तवमाला' व वि.वा. भिडेकृत 'जीवजागृति' यांचा त्यानीं उल्लेख केला आहे. आपला ग्रंथ शक्य तितका प्रमाणभूत व सर्वंकष व्हावा, म्हणून ब्रह्मांड धुंडाळणाऱ्या साक्षेपी माधवरावांचें लक्ष, हीं दोन्हीं वृत्तें योजणाऱ्या नागेशाच्या 'सीतास्वयंवरा'कडे न जातां, तें उदासदास व अनंत कवि, अशा बुद्रुक कवीकडे, किंवा राजशेखरासारख्या प्राकृत, व भिड्यासारख्या अलीकडच्या कवीकडे मात्र जावें, हें खरोखरच मोठें आश्चर्य होय. त्यांचें लक्ष या आमच्या कवीकडे जातें, तर प्रोफेसरसाहेबांना वरील दोन्ही वृत्तांचीं उदाहरणें, स्वतः बनवून आपल्या ग्रंथांत

समाविष्ट करण्याची तसदी पडली नसती; व अशा रीतीनें या वृत्तांच्या स्वकृत उदाहरणांपेक्षां नागेशाच्या उदाहरणांनीं, ग्रंथांचें प्रामाण्यही वाढण्यास मदत झाली असती. असो. समवृत्ताप्रमाणेंच अर्धसमवृत्तांच्या बाबतींतही नागेशाचें थोडें वैशिष्टय आहे. इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा यांच्या मिश्रणानें साधणारें उपजाति वृत्त, त्यानें सर्वत्र योजल्याचें वर सांगितलें. पण 'सीता-स्वयंवरां'त भुजंगप्रयात व स्वागता यांच्या मिश्रणाचा ( श्लोक ४० ), व

सइंवर इचे तें काळ नाहीं गमाया ।
सकळ सुरवरां हे ब्रह्मिची योगमाया ॥
अमुप गुण याते वेदवेदां कळेना ।
मनुज बहुत देवा सर्वथा आकळेना ॥

असा पहिला चरण १४ अक्षरांचा तर दुसरा १५ अक्षरांचा, तिसरा पुनः १४ अक्षरांचा तर चवथा १५ अक्षरांचा, अशा मिश्र मालिनीचा (श्लोक५११), अशीं अर्धसमवृत्तांचीं प्रचलित वृत्तदर्पणांत न सांपडणारीं दोन उदाहरणें मला सांपडलीं. अशा अर्धसमवृत्तांचीं नांवें कोणतीं, हें पाहण्यासाठीं मी पुनः 'छंदोरचने'कडे धांव घेतली. पण तेथेंही या बाबतींत निराशा झाल्या-मुळें, मी प्रो. माधवरावाकडे यासंबंधीं पुण्यास पत्रद्वारें पृच्छा केली. त्यांनींही 'जें वृत्त मला माहीत नाहीं, त्याचें नांव कसें सांगू' अशीच थोडी सुंठ मोडली. मध्यंतरीं वे. शा. सं. बाळाचार्य खुपेरकरशास्त्री हे करविरीं आले असतां, त्यांना वरील मिश्रवृत्तासंबंधीं विचारलें. 'अनंतरोदीरित-लक्ष्मभाजौ पादौ यदीयावुपजातयस्ताः ।' असा 'वृत्तरत्नाकरा'चा दाखला सांगून वरील श्लोकाचें वृत्त 'उपजाति' असा त्यानीं आपला निर्णय दिला, याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. मात्र हा नियम मला अगोदर ठाऊक नसल्यामुळें, श्लोकांवर वृत्तें देतांना मला वरील श्लोकांवर तें वृत्त-नांव देतां आलें नाहीं.

नागेशाचें वृत्तप्रभुत्व कळण्यास, 'प्रमाणिका' व 'मकरकशीर्षा' या अपरिचित वृत्तांचा उपयोग, व वर वर्णन केलेलीं अर्धसमवृत्तांची

अभिनव उदाहरणें, पुरेशीं आहेत. तो कधीं कधीं वृत्ताचें नांव, त्या त्या श्लोकाच्या शेवटच्या चरणांत अशा कौशल्यानें गुंफतो कीं, ते वर्ण्यविषयाचें विशेषणही व्हावें. अशीं उदाहरणें, श्लोक ६८ ( प्रमाणिका ), श्लोक १४३ (चंपकमाला) श्लोक १४५ (स्रग्विणी) अशीं प्रस्तुत काव्यांत सांपडतात. अशा प्रकारची रचना निरंजनमाधवानेंही केली असून वृत्तें लक्षांत ठेवण्यास तिचा फार उपयोग होतो.

## ( १३ ) नागेश व इतर कवि

आमच्या कवीचें कविमंडळांतील स्थान ठरविण्यास त्याची समकालीन कवीशीं थोडी तुलना होणें इष्ट आहे. वामन, विठ्ठल, रघुनाथपंडित व सामराज, हे आख्यानकवि नागेशाच्या समकालीनांत मोडतात. वामनपंडितांची रचना इतकी विपुल कीं, त्या बाबतींत नागेश त्यांच्या पासंगास पुरणार नाहीं. नागेश जसा रसिक तसे पंडितही रसिक. पण नागेशाची बहुश्रुतता, त्याचें राजदरबारचातुर्य, प्रसंगनिर्मिती व वर्णनास विनोदाची दिलेली जोड, या गोष्टींचा पंडितामध्यें अभाव आहे. पंडित नागेशापेक्षां विद्वान्. पण त्याबरोबरच विद्वज्जडत्व, व क्लिष्टता हे दोष त्यांच्या काव्यांत शिरले आहेत. उलट नागेशाचें काव्य प्रासादिक, प्रतिभासंपन्न व ललितरम्य आहे. नागेशाच्या काव्यांत त्याच्या आत्मत्वाचा ठसा जसा स्पष्ट उमटलेला दिसतो, तसा पंडितांतच काय, पण इतर कोणत्याही मराठी कवींत दिसत नाहीं. विठ्ठलकवीचीही रचना नागेशापेक्षां पुष्कळच आहे. चित्रकाव्यरचना व छंदःशास्त्रनैपुण्य हा या कवीचा विशेष असून, संस्कृतांतलीं अनेक नवीं वृत्तें, यानें मराठींत आणलीं. यानें आपली रचनाही थेट संस्कृत महाकाव्यांच्या धर्तीवर केली आहे. पण शब्दरचनेचे चित्रविचित्र प्रकार करण्यामध्यें गुंतल्यामुळें, याच्या काव्यांत रसाचा खडखडाट झाला आहे. व्यापारी पेशामुळें, प्रवासांत मिळालेली बहुश्रुतता, थोडीबहुत त्याच्या काव्यांत व्यक्त झाली आहे. पण कवि या नात्यानें, नागेश याच्यापेक्षां

सर्वांशानें श्रेष्ठ आहे. नागेशाची बहुश्रुतता, विठ्ठलापेक्षां मोठी असून रसिकतेंत, सूक्ष्मावलोकनांत, प्रतिभेंत व इतर काव्यगुणांत तर नागेशाची विठ्ठलाशीं तुलनासुद्धां होणार नाहीं. आपलें काव्य सरस, चटकदार, कसें करावें, हे नागेश उत्तम जाणतो. उलट विठ्ठल त्या मानानें धीरगंभीर संस्कृतच्या ठराविक चाकोरींतून जाणारा, अतएव जड वाटतो.

रघुनाथपंडिताची गोष्ट कांहीं न्यारी आहे. त्याची रसिकता अभिजात स्वरूपाची असून, नागेश त्या मानानें थोडा ग्राम्य वाटतो. कोणतीही गोष्ट वाच्यार्थानें न सांगता ध्वनीनें सांगणें, हा त्याचा विशेष आहे. ' शृंगार ' रघुनाथालाही प्रिय आहे. पण त्याचें स्वरूप ' मुग्ध ' व ' विप्रलंभा' सारखें मनोहर असून, नागेशाच्या ' शृंगारा ' सारखें 'उत्तान' किंवा ' संभोग ' अशा स्वरूपाचें नाहीं. आपल्या काव्यांत आपण पाहिलें तें सर्व ओतण्याचा नागेशासारखा अभिनिवेश, रघुनाथपंडितानें धरलेला नाहीं. सूक्ष्म भावनांची तार छेडणें, कल्पनेची भरारी मारणें, व सुंदर व सोज्वळ सृष्टिवर्णनें करणें, या उच्च अभिरुचिनिदर्शक सर्वच गोष्टींत, रघुनाथपंडित नागेशासच नव्हे तर कोणत्याही मराठी कवीस हार जाणार नाहीं. फक्त विनोद तेवढाच नागेशांत अभिनव आहे. सारांश नागेश, हा काव्यगुणांत रघुनाथपंडितापेक्षां खालच्या, तर वामन व विठ्ठल या दोघांपेक्षां वरच्या दर्जाचा आहे.

## (१४) नागेश व सामराज

वरील कवींपेक्षां नागेशाची ज्याच्याशीं सर्व बाजूंनीं तुलना होईल, असा कवि सामराजच होय. या दोघां कवींत अनेक बाबतींत इतकें कल्पनातीत साम्य आहे कीं, रघुनाथपंडित व आनंदतनय यांच्या, व्याहीपणाची जशी आख्यायिका प्रसिद्ध आहे, तशी यांच्या मित्रत्वाची, किंवा देवनाथ व रघुनाथ पंडित यांच्या भेटीच्या आख्यायिकेप्रमाणें नागेश—सामराजांच्या भेटीची तरी निदान आख्यायिका असेल कां, अशी कल्पना

मनांत आल्यावांचून रहात नाहीं. दोघांच्या भाषाविषयक साम्याबद्दल, मागें विस्तृत विवेचन केलें आहे; व त्यांच्यांतील कल्पनासाम्यही टीपांत जागजागीं तशीं साम्यस्थलें उध्दृत करून दर्शविलें आहे. येथें थोडें इतरविषयक साम्य देण्याचा विचार आहे:—

( १ ) दोघांच्याही काव्यांत आढळणारे शब्द:—तुकाई, विपंची, उगला, वोजा, झासा, फासा, तिवाटी, अपाई, विपारा, माला, राजस, मानणें (आवडणें), अदृष्ट इ. इ. (२) फारशी शब्द दोघांच्याही काव्यांत पुष्कळ आले आहेत. ( ३ ) वर्णनसाम्य:—सीतास्वयंवरास गेलेल्या अनेक देशांच्या राजांचीं आडनावें, नागेशाप्रमाणेंच सामराजानें आपल्या रुक्मिणीहरण काव्याच्या सहाव्या सर्गांत दिलीं आहेत. त्याचप्रमाणें सीतास्वयंवरास जाणाऱ्या ब्राह्मणांचें विनोदी वर्णन, व सामराजाचें रुक्मिणीस्वयंवरास जाणाऱ्या ब्राह्मणांचें विनोदी वर्णन ( सर्ग ६।४०५७, ) यांत आश्चर्यकारक साम्य आहे. नागेशानें गौतमाश्रमाच्या वर्णनांत दिलेली फुलाफळांच्या नांवाची यादी, सामराजानें तशीच पण अधिक विस्तृतपणानें आपल्या रुक्मिणीहरण सर्ग ३ श्लोक ४९, यांत दिलेली आढळते. नागेशाचें मिथिलानगरीचें बाह्यवर्णन व सामराजाचें द्वारकावर्णन, वाद्यें, खंदक, इ. बऱ्यांच तपशिलांत जुळतें. सीतेच्या अंगावरील अलंकार, बहुतेक रुक्मिणीच्याही अंगावर दिसतात; व नागेशाची सीता, रूपाच्या बाबतींत पुष्कळ अंशीं सामराजाच्या रुक्मिणीसारखीच आहे.

कोणापासून कोणाला आपलें काव्य रचण्याची स्फूर्ति झाली, हें समजण्यास आज मार्ग नाहीं. तथापि सामराजाचें महाकाव्य[1] नजरेस पडल्यामुळें, आपण तसें एकादें काव्य रचावें अशी बुद्धि नागेशास झाली असावी. सामराज व नागेश हे दोघेही कवि तुल्यबल आहेत. बहुश्रुतता कल्पकता, व्युत्पन्नता, विनोद व रसिकता दोघांतही आहे. पण नागेशांत

१ पद्य सामराज ( १९३० ) द. सी. पंगु पृ. ४०

सामराजापेक्षां विनोद, भावना, सूक्ष्मता व बुद्धीची स्वतंत्रता या गुणांचें आधिक्य विशेष आहे, हें निःसंशय.

## (१५) सीतास्वयंवर

प्राचीन कवींत अनंत, अमृतराय, आनंदतनय, गिरिधर जयरामस्वामी, गोसावीसुत नागेश, वामन, विठ्ठल, विष्णुदास व वेणाबाई, अशा अकरा कवींनीं 'सीतास्वयंवरा' वर रचना केल्याचें आढळतें. यांतील एक दोन सोडून बाकीचे बहुतेक शिवकालीन आहेत. समर्थांनी तत्कालीं रामभक्तीचा जो प्रसार केला, त्यामुळेंच यांना या प्रकरणावर रचना करण्याची स्फूर्ति झाली असावी. वरील अकरा कवींच्या 'सीतास्वयंवरां'त, आनंदतनय, विठ्ठल, वामन, नागेश व वेणाबाई, यांच्याच कृति विशेष प्रसिद्ध आहेत. आनंदतनयानें जनकाच्या शिवधनुर्भंगाच्या पणापासून आपल्या काव्यास प्रारंभ करून, राजे लोकांचें स्वयंवरास गमन, सीता व दासी यांचें राजेलोकाबद्दल संभाषण, सीतेची चिंता, रावणाच्या प्रचंड शरीराचें वर्णन, त्याची बढाई व धनुष्य उचलतांना त्याची फजीति, रामकृत शिवधनुर्भंग व सीतेकडून रामास वरमालार्पणविधि, असे प्रसंग वर्णिले आहेत. त्याची रचना ओजगुणयुक्त जोरदार व अलंकारप्रचुर असून, 'आरणीच्या शिपायास' शोभेशी आहे. वामनानें या प्रकरणाचा उपयोग भक्ति व अध्यात्म यांची सांगड घालण्यासाठींच केवळ केलेला दिसतो; त्यामुळें स्वयंवराचा गोडवा येथें पहावयास मिळत नाहीं. वेणाबाईनीं आपलें प्रकरण, रामभक्तीनें प्रेरित होऊन, मानसपूजा करतात त्याप्रमाणें, विशेष सोहळ्यानें वर्णिलें आहे. एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवराचा तर्जुमा वर्णनशैलीच्या बाबतींत त्यांनीं केला आहे. भक्तीचें आवरण यांच्या सर्व काव्यावर पसरलें आहे. वामन व वेणाबाई यांनीं भक्ति व अध्यात्म यांचा उपदेश, हें ध्येय पुढें ठेवून, स्वयंवरप्रसंग हें केवळ साधन कल्पिलें आहे. तशी गोष्ट विठ्ठल व नागेशांची नाहीं. विठ्ठलानें नागे-

शाचाच कथाभाग दृष्टींत धरला आहे. पण सर्गबंधात्मक महाकाव्याची रचना करण्याचा त्याचा अभिनिवेश आहे. त्याच्या काव्याचे विशेष मागें दिलेच आहेत. नागेशाच्या 'सीतास्वयंवरां' त ४१५ श्लोक असून, काव्याचा आरंभ परशुराम व जनकराजा यांच्या मुलाखतीपासून होऊन सीतेच्या कन्यादानांत काव्याची समाप्ति झाली आहे. काव्यांत आलेले विषय, श्लोकविल्हेनें टीपांत दिले आहेत. नागेशाच्या काव्याचें विस्तृत परीक्षण आतांपर्यंत केलें आहे. येथें एवढेंच सांगावेसें वाटतें कीं, प्रसंग-निर्मिति, विनोद, कल्पकता व स्वकालीन उल्लेखानें दिसणारी बहुश्रुतता व रसिकता या गुणांत नागेशाचें 'सीतास्वयंवर' इतर कवींच्या 'सीता-स्वयंवरा'पेक्षां श्रेष्ठ दर्जाचें आहे. "नागेशांत थोडेसें अंगचें जें वारें आहे[1]" तेंच त्याचें वैशिष्ट्य आहे. त्याचें काव्य सर्गबद्ध नाहीं, म्हणून त्याला कायद्यानें 'महाकवि' म्हणतां आलें नाहीं, तरी सृष्टिवर्णनें व नायक-नायिकांचीं स्वभाववर्णनें, नवरसांचा परिपोष, इत्यादीवरून ती पदवी त्यांस बहाल करण्यास हरकत नाहीं, असें म्हणावेसें वाटतें. महा-काव्य रचनेचें ध्येय त्यानें आपल्यापुढें ठेविलें नव्हतें. नाहीं तर तसें एकादें महाकाव्य रचण्याची पात्रता त्यानें येथें सिद्ध केली आहे.

## ( १६ ) नागेशाचा काल.

यानंतर नागेशाच्या कालासंबंधींच लिहावयाचें राहिलें आहे. कोण-त्याही कवीचा काल व स्थल ठरविण्यास अंतःसाधनें व बहिःसाधनें, पार-खून घ्यावीं लागतात. कवीनें आपल्या काव्यांत केलेलें आत्मचरित्रपर उल्लेख, भाषापद्धति, तत्कालीन सामाजिक व राजकीय स्थिति, इत्यादींचा अंतःसाधनांत समावेश होत असून, कवीच्या समकालीन किंवा उत्तरका-लीन कवींनीं तत्संबंधीं केलेले उल्लेख, कवीच्या कालीं व प्रांतीं रूढ अस-लेले अलंकार, पेहराव, शस्त्रें, त्याचप्रमाणें शब्द व वाक्प्रचार, इत्यादि गोष्टी बहिःसाधनांत अंतर्भूत होतात. नागेशाचा काल ठरविण्यास वरील

---

१ महाराष्ट्र-सारस्वत-आवृ. ३ पृ. ७५.

दोन्ही प्रकारच्या साधनाबरोबरच, सामराजाशीं असणारें त्याचें निकट साम्य, फारच महत्वाचें होऊन बसलें आहे. त्यामुळें सामराजाच्या कालनिश्चितीवर नागेशाच्या कालाची रूपरेखा बरीच अवलंबून आहे. सामराजाचा काल ठरविण्यांत श्री. प्रल्हाद धोंडो कानिटकर यांची कामगिरी विशेष प्रशंसनीय असून, त्यावरून त्यांची शोधकबुद्धि व अचूक अनुमान विशेष प्रत्ययास येतें. आपल्या ‘ रुक्मिणीहरण–निरीक्षण ’ या पुस्तिकेंत ( १९२९ ) त्यांनीं सामराजाच्या कालासंबंधीं जी साधनसामग्री मांडली आहे, तिचा निष्कर्ष येणेंप्रमाणें:—( १ ) सामराज एकनाथांचा ऋणी असल्यामुळें, एकनाथानंतर झाला. ( २ ) नागेश व जयराम पिंडे, हे भाषेवरून समकालीन असावे; राधामाधवविलासचंपूचा काल शके १५७५–८० हा असून, त्या अनुरोधानें नागेशाचा काल शके १५७०–७५ असा असावा. ( ३ ) सामराज, नागेश, जयराम व कवींद्र परमानंद ( शिवभारतकर्ता ) हे समकालीन असावे, कारण या चौघांनीं ‘ मोर ’ हा नाकांतला अलंकार दिला आहे. राजव्यवहारकोश ( शके १५९६–९८ ) किंवा वामन विठ्ठल ( शके १५९६–१६०९ ), आनंदतनय, वेणाबाई ( १६०० शके ) हा शब्द देत नाहींत. यावरून हा अलंकार १५७५ शकेच्या सुमारास प्रचारांत होता. तसेंच नाथांच्या रुक्मिणीस्वयंवरांत ( शके १४९३ ) त्याचा निर्देश नाहीं. ( ४ ) सामराजानें दिलेलें फळाचें वर्णन[1], नागेशानें केलेलें गौतमाश्रमांतील फळाचें वर्णन, व समर्थांचें ब्रम्हारण्यांतील फलवर्णन, यांत फार साम्य असून ते तिघेही समकालीन होते. समर्थ शके १५५६त महाबळेश्वरास होते. ( ५ ) तुकारामाच्या अभंगांत, सामराजानें योजलेलें बहुतेक फार्शी व देशी शब्द येतात. वामन, विठ्ठल बीडकर व आनंदतनय यांच्या काव्यांत, फार्शी शब्द फार अल्प आहेत. तुकारामांनीं शके १५७२–७३ त लेखनव्यवसायास सुरवात केली. यावरून रुक्मिणी-

---

१ रुक्मि. ह. सर्ग ३।४९.

हरण शके १५७०–७५त लिहिलें गेलें असावें. ( ६ ) सामराज, नागेश व जयराम यांच्या काव्यांत फार्शी शब्द येतात. नागेशाच्या काव्यांत त्यांचें प्रमाण अल्प असून, सामराजांत तें चौपट पांचपट आहे. यावरून सामराज शके १५५०–१५७५ या काळांत झाला असावा, व तो नागेश व जयराम यांच्या पूर्वीचा असावा. ( ७ ) सामराज व विठ्ठल कळपूरकर ( शके १५३६ ) यांच्या काव्याच्या नमनाच्या श्लोकांत विलक्षण साम्य आहे. असेंच साम्य दोघांच्या काव्याच्या इतर भागांत असल्यास सामराज शके १५३६ नंतर झाला असावा. ( ८ ) 'वैद्यजीवन'कार लोलिंबराज ( शके १५५६ ) व सामराज यांची भाषा सारखी आहे. सामराजानें त्याचें कवित्व पाहिलें असावें. ( ९ ) वामनाचा काळ शके १५५०–१६१६ हा आहे. फारशी शब्द, दागिन्यांचीं नांवें, कर्मणीप्रयोगरचना, प्राकृत शब्द इ. गोष्टी, सामराज हा शाहुमहाराजकालीन नसून, वामनपूर्वकालीन असावा, हें प्रामुख्यानें दर्शवितात. यावरून रुक्मिणीहरण काव्य, सामराजानें शके १५६०–१५७० या काळांत रचिलें असावें. ( १० ) सारांश सामराज हा, एकनाथ व लोलिंबराज यांचा उत्तरकालीन असून, वामन, नागेश, जयराम, परमानंद, यांचा समकालीन व वेणाबाई आनंदतनय यांचा पूर्वकालीन होय.

वरील अचूक कालगणना करून सामराजाचा काल निश्चित केल्याबद्दल, श्री. कानिटकर यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. पूर्वी[1] याच त्यांच्या कालनिश्चितीवर उलट टीका मी केली होती; पण आतां सामराज व नागेश यांच्या काव्यांचें तुलनात्मक अवलोकन झाल्यावर, व विशेषतः नागेशाच्या 'सीतास्वयंवरा'ची नक्कल शके १६१६ मध्यें, व 'शारदाविनोद' या पोथीची नक्कल शके १६२० मध्यें केली गेली आहे हें कळल्यावर, मी श्री. कानिटकरांचा अनुयायी बनलों.

---

१ सामराज—पृष्ठ. ७५—द. सी. पंगु.

हें सांगण्यास मला आनंद वाटतो. असो. वरील त्यांच्या विधानांच्या साह्यानें नागेशाच्या कालासंबंधीं खालीं दिल्याप्रमाणें निश्चित मत देण्यास जागा झाली आहे:—

( १ ) सामराजाच्या काव्यांत नागेशापेक्षां फारशी शब्द चौपट पांचपट आहेत, म्हणून सामराज हा नागेशापूर्वीचा, या विधानांतील वर दिलेलें कारण मला मान्य नाहीं. सामराज व नागेश यांच्या रचनेच्या मानानें फारशी शब्दांचें प्रमाण दोघांच्याही काव्यांत सारखेंच भरेल. मात्र सामराजाच्या भाषेंत येणारी जुन्या वर्तमान काळाचीं रूपें, व सामराज व नागेश यांच्या काव्यांतील विलक्षण शब्दसाम्य, वृत्तसाम्य, वर्णनसाम्य व कल्पनासाम्य, इत्यादि लक्षांत घेतां, नागेशानें सामराजाचें महाकाव्य पाहिलें असावें असें वाटतें. सामराजाच्या रुक्मिणीहरणाचा लेखनकाल शके १५६०–७० हा वर ठरविलाच आहे. यावरून नागेशानें आपलें 'सीतास्वयंवर' त्यानंतर म्हणजे शके १५७०–१५७५ च्या सुमारास रचलें असावें. नागेशानें आपलें हें काव्य, आपल्या सर्व रचनेच्या शेवटीं 'करून संवरून भागल्यावर,' आपल्या उतार वयांत रचलें असावें, याबद्दल या काव्यांत

" त्याच्या गुणें अर्जित मी धनासी।
तें होतसें साधन बंधनासी " ॥

× × ×

वाग्देवते! मी श्रम दे तुला हे।
खळापुढें नाचविले तुला हे ॥

× × ×

अपार संसार तरी तराया।
त्वरें यमाचें गति सीतराया ॥

× × ×

नको मना ! हांव धरूं धनाची ।
हे कारणें साधन बंधनाची ॥

हा जो पुरावा सांपडतो, तो त्याच्या शेवटीं झालेल्या वैराग्यवृत्तीचा निदर्शक आहे. आपल्या वाणीस केवळ पोट जाळण्यासाठीं, दुष्टापुढें नाचवावी लागली याबद्दल कवीला पश्चात्ताप झाला आहे. यावरून नागेशानें 'सीतास्वयंवर' काव्य उतारवयांत लिहिलें, असें वाटतें. नागेशाच्या 'सीतास्वयंवरा'चा काल, वर शके १५७०–१५७५ असा दिला आहे; त्यावरून त्याची प्रत शके १६१६ मध्यें (म्हणजे जवळ जवळ ५० वर्षांनंतर होणें शक्य आहे. सामराजाप्रमाणें नागेशही दीर्घायुषी होता असें म्हणण्यास थोडा फार पुरावा आहे. त्याच्या वंशांतील गं. भा. त्रिवेणीबाई, ८० वर्षांची होऊन वारली. यावरून नागेशही ७५—८० वर्षें वांचला असावा. नागेशानें आपली रचना अगदीं मरणकालापर्यंत चालूं ठेविली असेल, हें संभवत नाहीं. शेवटीं शरीरांत व बुद्धींत कदाचित् तितका त्राणही राहिला नसेल. म्हणून काव्यरचनेचा व्यवसाय त्यानें आपल्या वयाच्या साठ वर्षांपर्यंत चालूं ठेवला असावा. साठाव्या वर्षी त्यानें आपली शेवटची कृति 'सीतास्वयंवर' रचली असें मानल्यास, शके १५१५–१५९० हा नागेशाचा अदमासानें काल ठरतो. या सुमारें ७५ वर्षांच्या काळांत त्यानें आपली सर्व काव्यरचना केलेली दिसते.

वरील विवेचनावरून नागेश हा सामराजाचा अगदीं समकालीन असून, ते दोघेही वामनपंडितापेक्षां पुष्कळच वडील आहेत. त्यामुळें मराठींत अनेकवृत्तात्मक रचना सुरूं करण्याचा मान, पंडितांकडे न जातां यांच्याकडेच जातो. नागेश हा मुसलमानी अमदानींत वाढलेला, म्हणून सीतेच्या अंगावर, अंबरसा, हयकोल, जेहर, जेहगीर असे मुसलमानी पद्धतीचे दागिने पडून, तिला ओढणीही घ्यावी लागली आहे.[१]

---

१ सीतास्व. २१८.

रामालाही हातांत 'बागदार' 'समशेर' व 'पुराणी' हीं हत्यारें घ्यावीं लागलीं आहेत, व त्याच्या पागेंत विदेशी घोडे खेंकाळत आहेत. रावणाला पाहून थंडी वाजून आल्यामुळें, कांहीं राजांना कपाळाला पटका बांधावा लागला आहे. स्वयंवरास जमलेल्या राजांच्या यादींत, मोरे, चव्हाण, राणे, इत्यादि मराठे सरदारांचीं नांवें आहेत. त्यांत भोंसल्याचें कोठेंच नांव नाहीं. पण नागेशानें 'सिसोदये' यांचा उल्लेख केला असून या वंशालाच पुढें 'भोंसले' हें नांव पडलें. कदाचित् शिवाजी राजांचा राज्याभिषेक नागेशानंतर बरेच वर्षांनीं झाल्यामुळें, व शहाजीराजांच्या कारकीर्दीत हें नांव फार प्रसिद्ध नसल्यामुळें नागेशानें त्याचा तसा उल्लेख केला नसावा.

## ( १७ ) प्रस्तुत आवृत्तीची संपादणी

या काव्याच्या कै. भाव्यांना दोन प्रती मिळाल्या. एक कै. रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचेकडून, व दुसरी कै. रा. रा. नारायण चिंतामण केळकर, काव्यसंग्रहकर्ते यांजकडून. रा. राजवाडे यांची प्रत जुन्या खर्ची कागदावर सुमारें ११ इंच लांब, व ६ इंच रुंद, अशा उभ्या वहीवर लिहिलेली होती. ही वही रा. राजवाडे यांस पंढरपुराकडे एका बडव्याच्या घरीं मिळाली. या वहींत 'ही प्रत नागोजी शिवदेव तोतड्या वशिष्टगोत्री यानें, शके १६१६ भावनाम संवत्सरीं माघ वद्य ८ स केली' असें या काव्याच्या शेवटीं लिहिलें होतें. सदरहू नागोजीनें ही वही गणेशभट हराळे या नांवाच्या कोणा भिक्षुकाच्या वहीवरून उतरून घेतली, असा उल्लेख होता. ही वही फार अशुद्ध असून अगदीं जीर्ण झाली होती. शिवाय हींत अक्षरें, शब्द, चरण व कित्येक ठिकाणीं सबंध श्लोकही गाळले होते.

दुसरी प्रत रा. केळकरांकडली. ही सुमारें ११ इंच लांब व ८ इंच रुंद अशा पुस्तकवजा वहीवर काळजीपूर्वक लिहिलेली होती. ही प्रत त्रुटित होती, व मूळ लेखकानें या काव्याच्या प्रारंभीं 'सीतास्वयंवर विठ्ठलकविकृत' असें म्हटलें होतें. या वहीवर लेखनकाल वगैरे माहिती नव्हती.

परंतु ही वही अव्वल इंग्रजीचे सुमारास केव्हां तरी लिहिली गेली असावी असें कै. भाव्याचें मत आहे.

या दोहोंपैकीं पहिल्या प्रतीवरून कै. भाव्यांनीं हें काव्य छापण्यास प्रारंभ केला, व त्यांचीं आठ पृष्ठें छापून झाल्यानंतर व दुसरीं आठ पृष्ठें छापावयास धाडल्यानंतर, त्यांना दुसरी म्हणजे कै. रा. केळकरांची प्रत मिळाली. तेव्हां पुढें या आठ पृष्ठांत मूळ मजकूर पहिल्या प्रतीवरून छापून दुसऱ्या प्रतीचे पाठभेद त्यांनीं खालीं टिपांत दिले. पुढील सर्व पृष्ठांतील मजकूर या दुसऱ्या प्रतीवरून—पहिल्या प्रतीच्या आधारें तो प्रतिशुद्ध करून—छापला, यांत देण्यासारखे पाठभेद नसल्यामुळें कै. भाव्यांनीं पुढें ते दिले नाहींत.

हस्तलिखितांच्या अभावीं प्रस्तुत आवृत्ति मी 'महाराष्ट्र कवी'तील छापलेल्या प्रकरणावरूनच अर्थाच्या संदर्भानें व कवीची श्लिष्टशब्दयमकपद्धति लक्षांत घेऊन शुद्ध करून छापली आहे. कै. भाव्यांनीं आपल्या प्रतींत छापलेलें पाठभेद मीही तसेंच दिले आहेत. शिवाय काव्यसंग्रहांत छापलेल्या 'चंद्रावळीवर्णनांत व प्रस्तुत 'सीतास्वयंवरांत' जे सर्वसाधारण श्लोक येतात, त्यांतील कै. नारायण चिंतामण केळकर यांनीं दिलेले पाठभेद, मूळ 'सीतास्वयंवरां'त जेथें अर्थ लागत नाहीं तेथें स्वीकारून, 'सीतास्वयंवरा'तील मूळ पाठभेद मी खालीं दिले आहेत, उदाहरणार्थ, श्लोक १९९ मध्यें मूळ 'सीतास्वयंवरां'त 'बाळ' असा पाठ आहे, त्याऐवजीं 'चंद्रावळीवर्णनां'तील 'बेल' असा पाठ स्वीकारून 'बाळ' हा खालीं दिला आहे. तसेंच श्लोक २०३ मध्यें मूळ 'सीतास्वयंवरां'त 'पानेपडा' असा पाठ आहे, त्याऐवजीं 'चंद्रावळीवर्णनां'तील 'पानें पड्या' असा पाठ मी स्वीकारला आहे. तसेंच श्लोक २३५ मध्यें मूळ 'सीतास्वयंवरां'तील 'आलोचते' हा पाठ दिला आहे. त्याऐवजीं 'चंद्रावळीवर्णनां'तील 'आळेंच तें' असा पाठ स्वीकारला आहे

श्लोक २३९ मध्येंही ‘ भामिकेशी ’ या ऐवजीं ‘ भूमिकेशी ’ असा ‘चंद्रावळी ’ वर्णनांतील पाठ घेतला आहे. अशा कांहीं स्थलाशिवाय मूळ शक्य तें अबाधित राखलें असून, अर्थाच्या सुगमतेस्तव मुळांत स्वल्पविराम व अवतरण चिन्हें कमीअधिक दिलीं आहेत. ही आवृत्ति शक्य तो शुद्ध काढण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि मुद्रणदोषांमुळें ज्या चुका राहिल्या त्या शुद्धिपत्रांत दुरुस्त केल्या आहेत.

## टीपा.

नागेशाच्या काव्यविवेचनाचें काम संपलें आहे. पुढें दिलेल्या टीपा शक्य तितक्या उद्बोधक व कठिण अर्थ उकलण्यास उपयोगी व्हाव्या, अशा दिल्या आहेत. अर्थाबद्दल कांहीं ठिकाणीं मतभेद होईल. कांहीं स्थळीं अनवधानानें दोष राहून गेले असल्यास वाचक क्षमा करतील अशी आशा आहे, तुलनेकरितां जागजागीं समानार्थक अवतरणें घातलीं आहेत. अशीं अवतरणें किती म्हणून द्यावी? विस्तारभयास्तव या बाबतींत माझ्या स्मरणशक्तीस मला गवसणी घालावी लागली. जें केलें तें रसिकांपुढें मांडलें आहे. यामुळें वाचकांची काव्यचिकित्सा वाढण्यास मदत झाल्यास माझ्या श्रमाचें सार्थक होईल.

प्रस्तुत ग्रंथ केवळ ‘ महाराष्ट्र ग्रंथ भांडार ’ यांचे चालक रा. शं. वा. कुलकर्णी यांच्या प्रोत्साहनानें व साह्यानेंच प्रसिद्ध होत आहे. त्यांनीं हा प्रकाशित करण्याची तयारी दाखविली नसती तर कदाचित तो फार वेळानें प्रसिद्ध झाला असता. ही जबाबदारी स्वीकारल्याबद्दल त्यांचे शतशः आभार मानले पाहिजेत.

त्याचप्रमाणें श्रीसिद्धेश्वर छापखान्याचे अनुभवी मालक रा. वासुदेव नारायण ठकार यांनीं हें पुस्तक इतकें सुंदर व अल्प काळांत छापून दिल्याबद्दल, मी त्यांचा आभारी आहे.

ग्रंथ तयार होत असतां ज्यांनीं अनेक प्रकारें मदत केली, त्यांत माझे मित्र डॉ. बळवंत नारायण सरलष्कर, एम्. बी. बी. एस्, व शिष्यमित्र विठ्ठल अनंत कुलकर्णी एम्. ए. यांचा अवश्य उल्लेख केला पाहिजे. त्यांच्या मदतीबद्दल व प्रोत्साहनाबद्दल मी त्यांचा आभारी आहे. रा. जयराम विठ्ठल नानिवडेकर व वे. आत्माराम आण्णाजी कशाळकर यांनीं केलेल्या सूचनांबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत.

कोल्हापूर
ता. ५-११-३७.

द. सी. पंगु



# शुद्धिपत्र.

मूळकाव्यांतील अशुद्धें शुद्ध केलीं आहेत. इतर भागांतील अशुद्धें फारशीं नाहींत व तीं महत्वाचींही नाहींत.

| श्लोक | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ११ ओळ १ | त्यजाव | त्यजावे |
| ३७ ओळ १ | वर्णिता | वर्णितां |
| ७५ ओळ १ | कित्यीक | कित्येक |
| ,, ओळ ४ | उत्तम | उत्तर |
| ९० ओळ ४ | कलकौकीळ | कलकोकिळ |
| १०८ | वृत्त–( इंद्रवज्रा ) | वृत्त–( उपजाति ) |
| १६० ओळ ३ | कळशतिं | कळाशतिं |
| १८२ ओळ १ | गासावि | गोसावि |
| २१० ओळ २ | दर्शने | दर्शनें |
| २२८ ओळ ३ | नितंबब्रिबें | नितंबबिंबें |

२३८ या श्लोकावर ‘ वसंततिलका ’ असें वृत्त नाम पाहिजे.

| श्लोक | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| २७६ ओळ २ | भूमि | भूमिं |
| २७६ ओळ ३ | दाखवा | दाखवी. |
| २७८ ओळ १ | शास्त्रस्त्रविद्या | शस्त्रास्त्रविद्या |
| २९३ ओळ ४ | दिव्यमार्गोपर | दिव्यमार्गपर |
| ३३१ ओळ २ | घडी | घडीं |
| ३८० ओळ ३ | कामगार सरोजकेशरमणी | कामागारसरोज–केशरमणी. |
| ४०० ओळ ३ | दशांगुळे, सिका | दशांगुळेसि, का, |

*

# आधारभूत ग्रंथाची यादी.

ज्ञानेश्वरी—( ज्ञानदेवी-रा. वि. माडगांवकर ) इ. स. १९०७.
वच्छहरण—( प्रो. द. सी. पंगु ) १९२७.
रुक्मिणीस्वयंवर—एकनाथ ( मा. कृ. देशमूख ) १९२५.
श्रीमत्‌दासबोध—( आर्यभूषण प्रेस )—१८९६.
वामनकृत कवितासंग्रह भाग १ ( काव्यसंग्रह. )
विठ्ठलकविकृत सीतास्वयंवर ( निर्णयसागर प्रेस ) १९२३.
महाराष्ट्र कवि ( भावे )
सामराजकृत रुक्मिणीहरण ( प्रो. गो. वि. तुळपुळे ) १९२४.
आनंदतनयकृत कवितासंग्रह ( निर्णयसागर ) १८९१.
साहित्यशास्त्र-( ग. स. लेले ) १८७२.
अमृतरायकृत कवितासंग्रह ( काव्यसंग्रह ) १८९६.
अनेककविकृत लघुकाव्यमाला भाग २ (काव्यसंग्रह २३ ) १८९६.
क्षात्रवंशसागर—( पाटणकर व तोरो )
शहाण्णवकुळी उर्फ क्षत्रिय वंशावळी ( जयसिंगराव धारकर ) १८९४.
निरंजनमाधवांचा कवितासंग्रह भाग १ ( पांगारकर ) १९१९.
संगीत संशयकल्लोल ( गो. ब. देवल ) १९१९.
महाराष्ट्र सारस्वत—आवृत्ति ३री, भाग २ ( भावे ) १९२८.
रुक्मिणीहरण निरीक्षण- (प्र. धों. कानिटकर )१९२९.
सामराज- (प्रो. द. सी. पंगु ) १९३०.
रघुनाथपंडित दमयतीस्वयंवर-(अ. का. प्रियोळकर) १९३५.
विविधज्ञानविस्तार-वर्ष ६०.
अलंकारचंद्रिका-( गोरे ) १९२६.
छंदोरचना-(प्रो. माधवराव पठवर्धन.) १९३७.

वृत्तदर्पण–( परशरामपंत तात्या ).
रघुवंश–( सं. नंदर्गीकर ) १८९१.
मेघदूत– ( का. बा. पाठक ) १९१६.
गीतगोविंदकाव्यम्– ( निर्णयसागर ) १९१०
हनूमन्नाटकम्–( बापू सदाशिव शेट्ये हेगिष्टे ) १८८०.
सुभाषितरत्नभांडागारम्–( निणर्यसागर ) १८८६.
काव्यप्रकाश– ( उल्लास १।२ प्रो. वेलणकर, १० जोशी ).
राज्यव्यवहारकोश–( शिवचरित्रप्रदीप ) शके १८४७.
अनंगरंग–( गंगारामशास्त्री जयपूर ).

## कोश.

महाराष्ट्र शब्दकोश–( भाग १–५ ) पुणें.
शब्दरत्नाकर–(वा. गो. आपटे ) १९२२.
प्राचीन ऐतिहासिक कोश ( रघुयाथ भास्कर गोडबोले ) १९२८.
भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश ( सिद्धेश्वरशास्त्री चित्राव ) १९३२.
हंसकोश ( रघुनाथ भास्कर गोडबोले ) शके १७७५
मराठी भाषेचा नवीन कोश–( रघुनाथ भास्कर गोडबोले ) १८७०.
**Marathi & English Dictionary** ( Molesworth & Candy) **1857.**
**Dictionary of Persian & English Languages** ( Maulawi Fazl-I-Ali ) **1885.**
**Sanskrit English Dictionary** ( V. S. Apte ) **1890.**
**20th Century English-Marathi Dictionary** ( N. B. Ranade ).



# नागेशकविकृत

# सीतास्वयंवर



( द्रुतविलंबित )

जरि शिरिं गणराज विराजतो ।
[1]तरिच होय, महाकविराज तो ॥
मतिस दे, जरि हेंच[2] सरस्वति ।
रसवती तरि होय सरस्वती ॥ १ ॥

( उपजाति )

वंदूनियां पाय गजाननाचे ।
दृष्टीपुढें [3]काव्यनिधान नाचे ॥
प्रभाव वर्णी, [4]मति भारतीचे ।
मुखांबुजीं चालति भार तीचे ॥ २ ॥

( स्वागता )

दावितो बहुत भाव रदानें ।
गंडयुग्म [5]गळती वर दानें ॥

---

१ तरिच हा कवि एक विराजतो. २ तेच्च. ३ काव्य शुभाननाचे. ४ मग. ५ गळतो.

देत जो निजजनां वरदानें ।
दीधली मति तया वरदानें ॥ ३ ॥

( उपजाति )

प्रसन्न झाली जरि हे तुकाई ।
मला जनेंसी तरि हेतु काई ॥
पाहील दृष्टी जरि कांसवाची ।
संपत्ति काई तरि वासवाची ॥ ४ ॥
त्यानंतरें वंदिन रेणुकेशीं ।
झाडीन तीचे पदरेणु केशीं ॥
जिणें मनाला बहुलाभ केला ।
तिचे कृपेचा कवि हा भुकेला ॥ ५ ॥
होईल तेथें गुरुलाभ जावें ।
महादरें सद्गुरुला भजावें ॥
तत्संगमें राघवठाव पावें ।
याकारणें या विषयीं रमावें ॥ ६ ॥
गुरु स्वचित्ताप्रति भाविलासे ।
त्याचें प्रसादें प्रतिभा विलासे ॥
मी वंदितों आजि कवींस मानें ।
ज्यांचीं कवित्वें अमृतासमानें ॥ ७ ॥

( इंद्रवज्रा )

वंदीन पादांबुज सज्जनांचे ।
तयांपुढें मी मग सज्ज नाचे ॥
तत्संगतीं गीत रघूत्तमाची ।
बेडी तुटे हे जड धूर्तमाची ॥ ८ ॥
प्रार्थीन आतां निज भारतीला ।
केला असे ग्यां निज भार तीला ॥

त्याच्या गुणें अर्जित मी धनासी ।
तें होतसें साधन बंधनासी ॥ ९ ॥

( उपजाति )

वाग्देवते ! मी श्रम दे तुला हे ।
खळापुढें नाचविलें तुला हे ॥
संकष्टिले पोटदरीं समावे ।
ममापराधा उदरीं समावे ॥ १० ॥
जिव्हे ! तुवां दृश्यरसा त्यजावे ।
श्रीरामनामामृत पीत जावें ॥
अपार संसार तरी तराया ।
त्वरें यमाचे गति सींतराया ॥ ११ ॥

( स्वागता )

प्रार्थितों बहुत मी रसनेला ।
व्यर्थ वर्णनिं तुझा रस नेला ॥
सांडि सर्व विषयां, निज पावें ।
राम राम अयसेंचि जपावें ॥ १२ ॥

( इंद्रवज्रा )

तूं काय रे चिंतिसि गेह, रामा ।
दुःखासि द्यावें मन हेंच रामा ॥
तूं पायरी सांडि मना ! तमाची ।
सेवा करी फार रघूत्तमाची ॥ १३ ॥

( उपजाति )

मना ! तुला हे भुलि कां मदानें ।
नानांगना मागसि कां मदानें ॥
नको मना ! हांव धरूं धनाची ।
हे कारणें साधन बंधनाची ॥ १४ ॥

मना ! त्यजी दुर्जनवासनेला ।
इणें तुझा तो रहिवास नेला ॥
ते चिंतवी तूज अनेक रामा ।
सांडोनियां ते भज एक रामा ॥ १५ ॥
पिसें तुला काय अगा धनाचें ।
त्वां देखिल्यां काय अगाध नाचे ॥
श्रीरामनाणें जरि ये करासी ।
भेदून जाईल विभाकरासी ॥ १६ ॥

( स्वागता )

जाणशील मजला निजला हें ।
धांवशील झणिये निज लाहें ॥
सांगतों तरि खरें तुजला हें ।
मी सदा गुरुकृपें निज लाहें ॥ १७ ॥

( उपजाति )

दृष्टींत आत्मा रमणीय माला ।
कदापि भीना तरि तो यमाला ॥
नेणें क्रिया बंधन आसनाचें ।
संकीर्तनीं दास उदास नाचे ॥ १८ ॥

( इंद्रवज्रा )

जो कीर्तनीं वाजविनाच टाळी ।
जो नाम उच्चारि न, फार टाळी ॥
जो सज्जनांची करितो कुटाळी ।
देतो तयाला यम तो उटाळी ॥ १९ ॥

( स्वागता )

सर्व काळ तप हेंच तपावें ।
राम राम अइसेंचि जपावें ॥

साधुच्या पदरजांत लपावें ।
मोक्षलक्ष्मिणिं सुधारस पावें ॥ २० ॥

( उपजाति )

तपीं फळालागिं अपार खावें ।
श्रीरामनाणें मग पारखावें ॥
करीन मी या हृदयास पेटी ।
ठेवीन रामा मग मी सपेटीं ॥ २१ ॥

( स्वागता )

ज्यास हार मिरवे भुजगाचा ।
तो पिता म्हणवि शंभु जगाचा ॥
राम राम रुचि तो धरिताहे ।
तो ससार जप मी करिताहे ॥ २२ ॥
राम वंशज असे तरणीचा ।
जानकी प्रभव तो धरणीचा ॥
कोण वर्णन करी उभयांचें ।
स्थान मी बहुत होत भयाचें ॥ २३ ॥
कन्यका ललित ते जनकाची ।
ओतली पुतळिका कनकाची ॥
वर्णितां मति तुटे सनकाची ।
काय होइल गति गणकांची ॥ २४ ॥

( उपजाति )

जे मानसीं राघवभाव दावी ।
ते उक्ति माझ्या वदनें वदावी ॥
मला नसे हे मति लाघवाची ।
तेथें बलिष्ठा भिति राघवाची ॥ २५ ॥

( इंद्रवज्रा )

माझा असे राम निधान साहे ।
कर्ता अहंभाव तया न साहे ॥
रामें मनीं जे रिति संचरावे ।
ते ते परीं म्यां तरि आचरावे ॥ २६ ॥
हें काव्य तो रामकथेस वानी ।
त्यामाजिही नागकवीस वानी ॥
वोपा जशी भासत सोनियाची ।
कर्णास भूषा परिसोनि यांची ॥ २७ ॥

( स्वागता )

आयकाल रचना यमकांनीं ।
नायकाल मग तो यम कानीं ॥
भूतळींत कृति एक विराजे ।
जीस मानिति महा कविराजे ॥ २८ ॥

( उपजाति )

स्वयंवराची रचना वदावी ।
श्रीरामचित्तीं निजभाव दावी ॥
नेणो स्वयें स्वैंवरवर्णनेसी ।
वर्णीन मी तूजहि पूर्णनेसी ॥ २९ ॥

( इंद्रवज्रा )

वर्णावया जानकिच्या विवाहा ।
लंबोदरा ! दे मति जेवि वाहा ॥
गमे मनामाजिं बरें बसावें ।
वाग्देवते ! त्वां वदनीं वसावें ॥ ३० ॥

( वसंततिलका )

सीतास्वयंवर बरें अति आदरानें ।
हें वर्णिजे नवरसीं कविसुंदरानें ॥
वाक्‌जाळसिंधु मथिला मतिमंदरानें ।
वाक्यामृतेंसि न गमेचि पुरंधरानें ॥ ३१ ॥

( इंद्रवज्रा )

जो मानितो दुःखसुखा समान ।
ब्रह्मीष्ट जो मान्यजनास मान्य ॥
जो नित्य दानें परिभावि देही ।
वर्तून देहीं म्हणवी विदेही ॥ ३२ ॥

( रथोद्धता )

भूतळीं जनक एक मोहरा ।
जो रणीं फिरवि शत्रुमोहरा ॥
जो अहर्निशिं करी ' नमो हरा ' ।
देत जो बहु बुधांस मोहरा ॥ ३३ ॥

( स्वागता )

भूतळीं जनक एक विराजे ।
ज्या गृहीं वसत एकविरा जे ॥
जो खळास बहुधाक विराजे ।
ज्यास वर्णिति सुधा कविराजे ॥ ३४ ॥
पाहिल्या विभव ते जनकाचे ।
अंतरीं बहुत दुर्जन कांचे ॥
सौख्य फार मग सज्जन लाहे ।
तोष तो मुनिजनां जनलाहे ॥ ३५ ॥

( स्रग्विणी )

ज्याचिया संगतीं संत आसंगती ।
देवही रंगती, दोषही भंगती ॥
ज्ञान, अज्ञानिया सांग जो शीकवी ।
काय वर्णी तया नागजोशी कवी ॥ ३६ ॥

( स्वागता )

वर्णिता यश असें जनकाचें ।
त्यापुढें अमृतभोजन काचें ॥
तद्‌गृहीं अवनिजा नवरीतें ।
कोणता वर निधान वरी तें ? ॥ ३७ ॥

( द्रुतविलंबित )

कवि विशारद नारद चालिला ।
परशराम विभूप्रति बोलिला ॥
'मनिं विचार बरा करि आपुला ।
परि तुझा अवतार समापला ॥ ३८ ॥

( भुजंगप्रयात )

पद गेलिया काय तेथें रहाणें ।
हुदा फीरल्या होय लाजीरवाणे ॥
महीं भार हा राक्षसें फार झाला ।
तदुच्छेदनीं राम जन्मास आला ॥ ३९ ॥
जया नाममात्रें जळे पंकराशी ।
जयाच्या जपें मुक्ति येते करासी ॥

( स्वागता )

शक्ति ते निवसते मजपाशीं ।
काय तूं विसरलास जपाशीं ॥ ४० ॥

( उपजाति )

जीच्चिया निजबळें अवतारा ।
होतसे बहु रणीं नवतारा ॥
जे शक्ति आद्या, अविनाशि माया ।
थोडी मही, रूप जिचें समाया ॥ ४१ ॥

ते शक्ति आली जनकालयाला ।
जे राक्षसाच्या जनली लयाला ॥
स्वयंवरीं शक्ति वरील ज्याला ।
वेगीं वदावे अवतार जाला ॥ ४२ ॥

असत्य हे भासत भासताहे ।
विदेहगेहाप्रति जाय पाहे ॥
जो ख्यात झाला सुत रेणुकेला ।
जेणें रणीं क्षत्रिय रेणु केला ॥ ४३ ॥

विशेष भीतो जन, काल, यातें ।
तो राम आला जनकालयातें ॥
द्वारींच कोदंडधरालयाचे
प्रवेशला मंदिरिं राजयाचे ॥ ४४ ॥

प्रधान विज्ञापि विदेहराजा ।
आला गृहा भार्गव जो सहाजा ॥
त्रिसप्तवेळां धरणी जयानें ।
निक्षत्रिया सांवरिली जयानें ॥ ४५ ॥

सहस्रबाहो वधुनी अज्ञानें ।
जेणें महा गाजविली निशाणें ॥
तो रामु आला तुझिया घरासी ।
हातीं असे पुण्य अमोघराशी ॥ ४६ ॥

ऐकोनि वाचा निजवर्गवाचें ।
तो पाय वंदी मग भार्गवाचे ॥
करोनि पूजा विधिकृत्य राजा ।
म्हणे तुम्हां आगम कोण काजा ॥ ४७ ॥

वदे तदा भार्गव वाक्य वोजा ।
' कन्या तुझी दाखवि राजराजा ' ॥
बाहीर येतां मग थोरकोडें ।
ते कार्मुकालागि करोनि घोडें ॥ ४८ ॥

बैसावया नाचवि त्यास बाळा ।
सीता सखीसंगतिं, खेळ खेळा ॥
देखोनि ते दुर्घटकर्म बोले ।
सविस्मयें भार्गव बोल, ' बाले ! ॥ ४९ ॥

( उपेंद्रवज्रा )

अखर्व तोही मम गर्व गेला ' ।
महाभिमानें उगलाच ठेला ॥ ५० ॥

( मालिनी ? )

सइंवर इचे तें काळ नाहीं गमाया ।
सकळ सुरवरां हे ब्रह्मिंची योगमाया ॥
अमुप गुण यातें वेदवेदा कळेना ।
मनुज *बहुत देवा सर्वथा आकळेना ॥ ५१ ॥

---

* ' महाराष्ट्र कवीं ' त छापलेल्या प्रतींत येथें ' ह्रत ' असा शब्द दिला आहे. पण त्याचा कांहीं अर्थ लागत नसल्यामुळें, व प्रस्तुत ओळींत तीन अक्षरीं शब्दाची अपेक्षा असल्यामुळें, नागेशच्या काव्यांत अनेक वेळां येणारा ' बहुत ' शब्द येथें योजला आहे. ( सं. )

( उपजाति )

स्वयंवराचा पण ऐक मान्य ।
" आरोपिता जो गुण एक मान्य ॥
स्वयें वरी हे नवरी तयाला ।
जो अन्यथा, हे न वरी तयाला ॥ ५२ ॥

( मालिनी )

धनुस चढवि जो तो योग्य ईते वराया ।
परमपुरुष ऐसा जाणिजे भाव राया ॥
निजभुजबळशक्ती कार्मुका आवराया ।
कवण पुरुष ऐसा त्याविणा सांवराया ॥ ५३ ॥
अतितर तुज झाला कन्यके लाभ राया ! ।
त्रिभुवन परि थोडें पुण्य तूझें भराया ॥
अतुल फळ तयाचें देख मी देवराया ।
मग नमन करोनी कन्यका दे वराया " ॥ ५४ ॥

( द्रुतविलंबित )

परशराम वदोनि विसावला ।
त्वरित तो निज आश्रम पावला ॥
जनक मूळ करी क्षितिराजया ।
[1]क्षितितळीं अति कूलिन राजया ॥ ५५ ॥

---

[1] या श्लोकांतील चवथ्या ओळींत पहिला शब्द ' महाराष्ट्र कवी ' त छापलेल्या प्रतींत दिला नसून, त्या ऐवजीं ‿ ‿ ‿ – असें त्या शब्दाचें स्वरूप दर्शविलें आहे. नागेशाची यमकासक्ति व तिसऱ्या ओळीचाच त्याला अनुवाद करावयाचा आहे, हें लक्ष्यांत घेऊन मी येथें ' क्षितितळीं ' असा शब्द योजला आहे. ( सं. )

( उपजाति )

श्रीसूर्यवंशी, नृप सोमवंशी ।
जे जे महाख्यात कुलीनराशी ॥
महाराष्ट्र, सौराष्ट्र, चव्हाण, राणे ।
सीसोदये, क्षात्रिय, बागलाणे ॥ ५६ ॥

( इंद्रवज्रा )

तुंगार, शृंगार कुमार, मोरे ।
गोरे सराईत, अपार तोरे ॥
कांती, अवंती, अति तेज साजे ।
काशीनिवासी, सुरशेन राजे ॥ ५७ ॥

( वसंततिलका )

तैलंग, वंग, नृप अंग, कलिंगदेशी ।
कांभोज, भोज, गुरजार, अनेकवेशी ॥
कर्नाट, लाट, सिरसाट, अचाट मोठे ।
संक्राड, द्राविड, गऊड, अमोड साटे ॥ ५८ ॥

( उपजाति )

आले दिशांपासुनि सर्व राजे ।
पुरंदराची रुचि ज्यांस साजे ॥
विदेह लीहीं, गजपात्रेकेसी ।
स्वयंवरा आदर कौसकासी ॥ ५९ ॥ *

---

* सीतास्वयंवराच्या दुसऱ्या प्रतींत खालील चार श्लोक अधिक आढळतात. हे श्लोक ५९ व्या श्लोकानंतर आहेतः—

स्वस्ति श्रीमत्सकलगुणगणा पूर्णकीर्णस्वभावा,
देवाच्या देवदेवा, अपरिमित निधी, सर्वविद्याप्रभावा, ।
शास्त्रें, शस्त्रें विचित्रें तुजजवळि कला, मंत्रयंत्रादि तंत्रें,
नाना पात्रें पवित्रें निवसतिहि सदां अग्निहोत्रें स्वतंत्रें ॥ १ ॥

( भुजंप्रयात )

“ नमस्कार विज्ञप्ति माझी तुम्हांला ।
तुम्ही सर्वथा येइजे सैंवराला ” ॥
असी पत्रिका दूत घेवोनि आला ।
मुनी वाचितां थोर आनंद झाला ॥ ६० ॥

( उपजाति )

मुनी म्हणे राघवनायकाला ।
“ कल्याण तुम्हां अणि सायकाला ॥
संरक्षिलें सत्य तुम्हीं द्विजाला ।
तेणें गुणें हा मठ पूर्ण झाला ॥ ६१ ॥
रथावरी सारथियें सजावें, ।
दोघीजनीं स्वीयगृहासि जावें ॥

---

* नाना व्याकरणें स्वयेंचि करणें, न्यायांत पंचानना,
वेदांतीं निपुणा सुखैकसदना मीमांसका सद्गुणा ।
सांख्यी ख्याति तुझी, पतंजळ मनीं मानोनि वाखाणिसी,
वेदांच्या परपारगा, पर नवी सृष्टी करूं जाणसी. ॥ २ ॥
नाना नाटकादि रचना, साहित्यसत्यांबुधी,
नाना काव्यकलापकुशलालंकारहीरावधी, ।
आयुर्वेदनिदान, दानचतुरा छंदांचिया आकरा,
ज्योतिःशास्त्रविशारदा, द्विजवरा, संगीतपारावरा. ॥ ३ ॥
महाराज राजश्रिया राजमाना,
अहो कौशिका, वाक्य हें सत्य माना ।
विदेही वसो सर्वथा भृत्यभावें;
इहक्षेम तें स्वामिनें पूर्ण द्यावें. ॥ ४ ॥

स्वयंवराचे रचनेसि पाहों, ।
आम्हीं विदेहाप्रति जात आहो " ॥ ६२ ॥

( प्रमाणिका )

कृती करी नमस्कृती, तदा वदे मुनीप्रती ।
' तुम्हां सर्वेचि यावया, स्वयंवरा पहावया ॥ ६३ ॥
स्वयंवरीं स्वयंवरा, वरील कोण नोवरा, ।
कशी असे सुलोचनी, पडेल येहि लोचनीं. ' ॥ ६४ ॥
मुनी तदा निजांतरीं, पहात तों सिता बरी ।
रघुत्तमासि नोवरी, परा वरासि नो वरी ॥ ६५ ॥
मुनी म्हणे रघोत्तमा, ' नृपाघरीं वसे रमा, ।
असेल जो रमापती, वरील त्यास ते सती.' ॥६६॥
वदे तदा महादरें, ' चला सर्व महा बरें ।
मिळेल थोर भातुकें, पहाल राज्य कौतुकें ' ॥६७॥
बरे मुहूर्त पाहिले, रथीं तयासि वाहिलें, ।
प्रमाणिकावरी त्वरें ढळेति [1]छत्रचामरें ॥ ६८ ॥

( द्रुतविलंबित )

चतुर सारथियें रथ पेलिला,
घडघडां मग तो क्षितिं चालला, ।
मुनिंहि ते बहुमान विराजले,
सकळही शिबिकारुढ [2]साजले ॥ ६९ ॥

( शार्दूलविक्रीडित )

कोणी नूतन सृष्टिचा विरचिता ब्रम्ह्यासवें स्पर्धता
कोणी विष्णुउरावरी झडकरी लत्तेसही हाणिता, ।

---

१ पंच. २ सज्जले.

कोणी येक क्षिरोदरीं लवकरीं विंध्यासही घालिता,
तैसा आचमिता समुद्र पुरता, तो मागुता योजिता ॥७०॥
कोणी चंद्र कलंकिता, सुरवरा कोणी भगें पाडिता,
कोणी वज्रधरासि सर्प करिता, वेदांसही स्थापिता, ।
कोणी येक विदेहभूपतिसभें धेनूस संरोधिता,
कोणी येकही देवदानवपिता, इत्यादि भूदेवता. ॥ ७१ ॥

( वसंततिलका )

आणीकही द्विजसमान कितेक येती,
शिष्योपशिष्य अनुशिष्य सवेंचि घेती, ।
खांद्यावरी बहुत धोपटिया गवाळीं,
झारी करीं, सरस गंध असे कपाळीं ॥ ७२ ॥
माळा गळां करतळांत विशाळ गांठी,
कक्षापुटीं विपुलपुस्तकभार [१]दाटी
टोपी शिरीं, उपरि उंच विशाळ गोंडा,
संभाषणीं प्रिय, विराम नसेंचि तोंडा. ॥ ७३ ॥
येकाक्ष, आणिक खुळे, तिरळे, निराळे,
कुब्जे, कुऱ्हे, पृथुलदोंदिल, वक्रडोळे ।
कित्येक वृद्ध करिताति महात्वरेला,
ते धांवती पडति आफटती धरेला ॥ ७४ ॥
कित्येक अंध अणि पांगुळ मुख्य आले,
स्कंधाधिरूढ किति शिष्य तुरंग जाले ।
आले पहा [२]बहुत घेउनि थोर दर्भा,
कोठून आगमन, उत्तम पूर्णगर्भा ॥ ७५ ॥

---

पाठी. २ बधिर.

( भुजंगप्रयातें )

कटीं हस्त ठेवोनिया फोंक मारी,
भटाचें तट्टू [1]थापटी शिष्य[2] भारी ।
तटें पाडिले भट्ट पावेति[3] कष्टा,
अहो मर्कटाआधिका[4] शिष्यचेष्टा ॥ ७६ ॥

( वसंततिलका )

मूका खिजे बहुत खाजवितातिं नाका,
तो हानतो दगड, मारित फार हाका, ।
मार्गी करीत रळिया परिहास वाचा,
आम्हां तुम्हां बहुत योग दिसे पुखाचा. ॥ ७७ ॥

( उपजाति )

ही यूवती ते जरि तूळ पावे,
आम्हा मिमिक्षे तरि फार फावे; ।
युवा नवा प्राप्त करील पाही,
हा भेद कांहीं मकरासि नाहीं. ॥ ७८ ॥
भटो तुम्हीं धोपटि काय केली ?
ते बोलती आत्मगृहींच ठेली, ।
तूझे घरीं तें शुभकृत्य आहे,
तो बोलतो मंगळवार आहे. ॥ ७९ ॥
परस्परें हास्यविनोद झाले,
भागीरथीतीरसमीप आले, ।
तों कौशिकानें प्रणिपात केला,
करास जोडोनि स्तवी तियेला. ॥ ८० ॥

---

१ तापटी. २ सीश. ३ सत्वभावें तळष्टा. ४ आयिका.

( प्रमाणिका )

अहो त्रिलोकतारिणी, गिरीशमौलिधारिणी ।
भवैकदुःखहारिणी, [1]सुखानुबंधकारिणी ॥ ८१ ॥
तुझ्या जळीं निमज्जती, शिवादि देव सज्जती ।
शरीरभाव वर्जती, महानुभाव गर्जती ॥ ८२ ॥
मदीय दंभ वर्जला, अहं वदो विवर्जला ।
प्रमाणिके नमो तुला, नमोऽस्तु माय वो तुला ॥८३॥
असी स्तुती करी मनी, स्वदेहभाव सोडुनी ।
पडेल तो धरेवरी, म्हणोनि राम सांवरी. ॥ ८४ ॥

( इंद्रवज्रा )

श्रीराम पृच्छेसि करूं निघाला
' हे वंद्य कोणेपरि हो तुम्हांला ? ' ।
ऐकोनि वाचा मग राघवाची,
सांगीतली ख्याति भगीरथाची. ॥ ८५ ॥

( उपजाति )

'भगीरथें पूर्वज उद्धराया
हे आणिली सर्वजनांत राया ! ।
परंतु पादोदक होय तुम्हां
याकारणें वंद्य निधान आम्हां.' ॥ ८६ ॥'

( भुजंगप्रयात )

करूनी तदा स्नानसंध्यादिकर्मा
ऋषी सर्वही चालती नित्यधर्मा, ।
असे सर्व तेथोनि मार्गीं निघाले
ऋषी गौतमस्थानकालागिं आले. ॥ ८७ ॥

---

१ तदा जनोपकारिणी.

( इंद्रवज्रा )

तो देखिला आश्रम गौतमाचा,
जो देखिल्या नाश गमे तमाचा. ।
येका मनुष्याविण सर्व सिद्धि
आहेत तेथें अनुपम्य नीधी. ॥ ८८ ॥

( स्वागता )

शोभतात चमरी चमरांनीं,
गुंजतात भ्रमरी भ्रमरांनीं, ।
क्रीडतात अमरी अमरांनीं,
[1]पांथ होति विगतश्रम रानीं. ॥ ८९ ॥

( द्रुतविलंबित )

अति रसाळ रसाळ विराजती,
विततमाल तमालहि साजती, ।
मलयमारुत शीतळ वाजती,
कलरवीं [2]कलकोकिळ [3]गाजती. ॥ ९० ॥
विकसितें कसि तें [4]अव-नीरजें
अति सुगंधित हे अवनी रजें ।
कनककेळि फळां सम दाविती.
रघुविरा निजवैभव दाविती ॥ ९१ ॥
हळुहळू मलयानिल वाजती,
भ्रमरही मधुरध्वनि योजिती, ।
विचरताति वधूसह सारसें,
स्वर मयूर करी सहसा रसें. ॥ ९२ ॥

---

१ पाय. २ किणि. ३ कुंजती. ४ वारि.

खळखळा जळसारणि वाहती,
श्रमित त्याचि जना बहु बाहती, ।
जळ पहा अमृतास समानसें,
सुख करी बहुधा रस मानसें. ॥ ९३ ॥
फुलभरीं बहु सारस माजती,
अतिसुगंध तरू बहु साजतीं ।
अतिसुगंधित येत सदागती,
वसति[1] तेथ तयांसि सदा गती ॥ ९४ ॥
नारंग रंग अति पिंग, कालिंग, केळें,
जंबूफळें सुविमलें, मृदु सोनकेळें, ।
आलीं कशीं बहु रसाळ फळें रसाळें,
सप्ताळसें, अननसें, फणसें विशाळें ॥ ९५ ॥

( वसंततिलका. )

जंबीर, अंजिर, तुरंज, करंज, बोरें,
द्राक्षें सुलक्षणिक, दाडिम, नारिकेळें, ।
खर्जूरिका, कमरखें, हरिखें भजावीं,
सीताफळें, खिरणिसें, उपमें त्यजावीं. ॥ ९६ ॥

( इंद्रवज्रा )

तर्बूज, खर्बूज, लता उदंडा.
कांडोपकांडीं रस इक्षुदंडा. ।
आक्रोड, बादाम अपार पेरू,
मेवा नवा काय नसेल मेरू. ॥ ९७ ॥

( द्रुतविलंबित )

तिलक, चंपक, केतक, मालती,
बकुल, यूथि, अशोकहि, शेवती, ।

---

१ असति.

कुरबकें, सह बंधुक, मोगरे,
बहु कदंबकही फुलले बरे. ॥ ९८ ॥

( उपजाति )

श्रीराम येईल भजोनि येथें,
म्हणोनि साहीऋतुवास येथें, ।
याकारणें मिश्रित वर्णनांनीं
ने देइजें दूषण पंडितांनीं. ॥ ९९ ॥

( वसंततिलका )

देखोनियां परमसुंदर आश्रमातें
ते सांडिती सकळही गमनश्रमातें. ।
प्रश्नासि राम करि ' कां उगले बसा गा
हें स्थान उध्वस तरी निजभाव सांगा.' ॥ १०० ॥

( शार्दूलविक्रीडित )

विश्वामित्र म्हणे ' रघोत्तमवरा ! जाणोनिया नेणता
होसी तूं, तरी आइकें बहुबरा वृत्तांत हा तत्त्वता, ।
ब्रम्ह्याची तनया विशेषविनया नामें अहिल्या [१]बरी
जाणोनी विधिनें स्वयंवर तिचें, आरंभिलें [२]सत्वरी. ॥१०१॥
आले सर्व सुरासुरादिक मुनी गंधर्व ते दिक्पती,
तद्रूपें परि मोहिले मग [३] म्हणे ब्रम्हा तया भारती ।
'जो एका दिवसांत शीघ्र [४] पुरती पृथ्वीस सव्यें करी
आधी येइल, त्यासि देइन महाधन्या स्वकन्या बरी.' ॥१०२॥

( उपजाति )

हळूंच हा इंद्र वदे सुरांला,
' ऐरावताला तरि रोग आला. ' ।

---

१ वरा. २ सैंवरा. ३ परिवदे. ४ प्रदक्षिण ती पृथ्वीस सर्ते करी.

वदे तदा वाक्यहि वन्हि कानीं,
‘ नेलें पहा मेंढरु त्या वृकांनीं ’ ॥ १०३ ॥
यम स्वयें बोलत दिक्पतीतें,
‘ म्हैसा कसा तो पडला रुतीतें.’ ।
नैऋत्यनाथ स्थिति बोलताहे,
‘ उलूक पाहे दिवसा न साहे.’ ॥ १०४ ॥
बोले जळस्वामि पहा तमासा,
‘ पळोनि गेला उदकांत मासा. ’ ।
लावी महामारुत लोक झासा
‘ गुंतोनि गेला मृगकाय फासां. ’ ॥ १०५ ॥
कुबेर बोले ‘ नरवाह मेले,
विमान तें काय फुटोनि गेलें. ’ ।
ईशान तोही वदतो सुरांला,
‘ हा बैल पाहा बरगें निमाला. ’ ॥ १०६ ॥
गणेश बोले मग आदरानें,
‘ नेला असे उंदिर मांजरानें, ।
आम्हीं असो दोंदिल फार पाहे
हें कार्य तों दुर्घट फार आहे. ’ ॥ १०७ ॥

( इंद्रवज्रा )

देखोनि धेनू प्रसवोन्मुखी ते,
दोहींकडे वक्त्र दिसें तयेते ।
धावोनिया गौतम आदरेसीं
प्रदक्षिणासप्तक मेदिनीसी ॥ १०८ ॥

( उपजाति )

प्रदक्षिणासप्तक मेदिनीतें
तें पुण्य आलें मग त्या मुनीतें. ।

तों गौतमालागुनिया विधीनें
त्या कन्यकेतें दिधलें विधीनें. ॥ १०९ ॥

( द्रुतविलंबित )

युवति घेउनि गौतम चालिला;
बहुसुखें निज आश्रम पावला. ।
मग सकोपक वासव बोलिला,
‘ कपटकामुक भोगिन मी तुला. ’ ॥ ११० ॥
उभयतां वसती मग दंपती,
रतिसुखें जशि शंकरपार्वती, ।
बहुतपोनिधि तो परमव्रती,
पतिपरायण तेहि महासती. ॥ १११ ॥

( शार्दूलविक्रीडित )

कोणी एकदिनीं सती बसवुनी स्नानासि गेला मुनी,
तों इंद्रें त्यजुनी स्ववेश, सदनीं प्रत्यक्ष जाला मुनी, ।
कामें पीडित होवुनी, सुवसनीं ओढी तियेलागुनी,
बोले तैं मृगलोचनी स्ववचनीं, ‘हें काय आलें मनीं?’॥११२॥

( स्वागता )

‘ सुंदरे ! परतुनी मज पाहे ’
आदरें पदर वोढित आहे. ।
संचली दचकली मग बाळी
‘ आजि काय दिवसाचि [1]टवाळी ? ॥ ११३ ॥

( उपजाति )

ह्मणीं तपालागुनि काम नासी.
हें काय आलें तुमच्या मनासी ? ।

---

१ दिवाळी.

झाला नसे काळहि यावयाचा,
रात्रीस घ्यावा रस या वयाचा. ॥ ११४ ॥
सोडा तुम्ही हे तरि आतिताई,
दिवा नवा हा रतिरंग[1] काई ?
देवार्चना सांडुनिया रतीची
हे काय पूजा सुरतीं रतीची ? ॥ ११५ ॥
हा मार मारी, शरघात[2] पाहे,
त्यामाजि हा आग्रह होत[3] आहे।
मनोविलापें परि होत जावें,
कीं आपुलें जीवित म्यां त्यजावें ?' ॥ ११६ ॥

( मालिनी )

' मदनदहनजाळें जाळिलें आजि पाळी,
मदनसदन तूझें ध्यातसें अंतराळीं. ।
पतिवचन न पाळी बोलती ते अधर्मा,
म्हणवुनि न म्हणावी ते कुलस्त्री स्वधर्मा.' ॥ ११७ ॥

( उपजाति )

दोघाजणांचा रतिरंग[4] साजे,
मंजीर-भूषारवकार वाजे. ।
कांची, विपंची, झणकार तीचा
पहा महाशब्दहि हुंकृतीचा.[5] ॥ ११८ ॥

( द्रुतविलंबित )

खळखळा करकंकण वाजती,
झणझणा कळकिंकिणी गाजती, ।

१ संगमोई २ शरधार ३ फार. ३ फार ५ यूवतीन्चा.

मुनिहि बाहिर येउनि आयके,
मग सरोष वदे निजनायके. ॥ ११९ ॥

( उपजाति )

' हें कोण चांडाळिणि ! कर्म हो तें
पतिव्रता लागुनि जें न होतें ' ।
ऐकोनि तीन्हें चरणेकघातें,
संताडिला तो मघवा निघातें. ॥ १२० ॥

( द्रुतविलंबित )

दर पुरंदर तो मग पावला,
मुनिवरें निकुरें रहि शापिला. ।
' विहरसी सहसा भगहेतुला
तरि पडोत सहस्र भगें तुला.' ॥ १२१ ॥
चळचळा मग कांपतसे सती,
वदत शाप तियेस महामती ।
' पतिस टाकुनि रातासि तूं खळा
उपवनांतिल होशिल गे शिळा. ' ॥ १२२ ॥

( उपजाति )

' धरूनि रूपा तुमच्या छळानें
प्रचारिलेसें मजला खळानें, ' ।
अन्याय नाहीं मज हा पहातां
उच्छाप द्यावा मज हा पहाता. ॥ १२३ ॥

( प्रमाणिका )

सदाम राम येऊनी, रसें बसेल ये वनीं, ।
तदीय पाय लागतां, स्वरूप पाव तत्वतां. ॥ १२४ ॥
असा प्रशाप देउनी, चळे स्थळींहुनीं मुनी,
शिळा असे हि ये वनीं, पुढें दिसे स्वलोचनीं. ॥ १२५ ॥

तुझीच वाट पाहते, जडत्व भार साहते, ।
पदासि लावि राघवा ! करी स्वकीय लाघवा. ॥१२६॥
बरी[1] करी नमस्क्रिया, शिळेसि राम सक्रिया ।
करासि जोडुनी स्तुती, करीत थोर सन्नती. ॥ १२७ ॥
‘ पतिव्रता महासती, कसी करूं पदाहती ? ।
स्वकीय देह कांपती, परंतु हे निरोपिती.’ ॥ १२८ ॥

( द्रुतविलंबित )

हळुहळूं पदपंकज लाविलें,
तंव शिळांतर थोर तडाडिलें; ।
चमकते चपला जशि अंबरीं,
तशि दिसे अबला स्वशिळांतरीं. ॥ १२९ ॥
नमन ते करिते अमरोत्तमा,
दिधलिसे युवती मम गौतमा; ।
उभययोग तुवां जडिला जसा,
रघुविरा ! तुहि पावसिरे असा. ॥ १३० ॥
उभयतां मग दंपति साजती,
उपरि त्या सुरदुंदुभि वाजती, ।
कुसुमवृष्टिहि होत विमानिच्या,
द्विज कथा कथिती अभिमानिच्या. ॥ १३१ ॥

( उपजाति )

अदृष्टयोगें रघुराज आला,
आतां स्त्रियांलागिं सुकाळ जाला, ।
चाळा शिळा सर्वहि पर्वतींच्या,
होतील रूपें सम सर्व तीच्या ॥ १३२ ॥

---

१ हरी करी मज स्त्रिया.

माझे घरीं बाइल पाहिली ते, ।
तें पायली अन्न, उभ्याच खाते; ॥
निर्लज्ज मोठी, गळताति कक्षा; ।
मला असे सुंदरीची अपेक्षा. ॥ १३३ ॥
एकाक्ष, कार्यास अदक्षता ही; ।
नाकास पाहों तरि ठाव नाहीं; ॥
प्रत्युत्तरें दे, वचना न साहे; ।
याकारणें अन्य वधूस पाहें. ॥ १३४ ॥
वाचाट ते चाट महा अचाटी, ।
ते बोरकांटी, तरटी, तिवाटी, ॥
गाटी, [1]गदूटी, जगथोंट मोठी, ।
[2]करीन मी आणिक याचसाठीं. ॥ १३५ ॥
अनेकखोडी, बहुसाल रोडी; ।
संभोगगोडीप्रिय, हौंटतोडी; ॥
मुढी, कुढी, हेकुडि, दंतदाढा; ।
माझें कपाळींहुनि हीस काढा. ॥ १३६ ॥
अदंत माझे घरिंचीच पाहे, ।
नांवें मृगाक्षी, परि अंध आहे. ॥
हातीं खुळी, लंगित फार चाले; ।
ऐसे वधूनें मज काय चाले? ॥ १३७ ॥
माझे घरीं बाइल फार काळी, ।
उठोनि खाते तरि ते सकाळीं. ॥
घरीं तुपाची तरि वाण नाहीं; ।
याकारणें सुंदर नार पाहीं. ॥ १३८ ॥

---

१ गटाटी २ इच्या विचारें पडती कचाटीं.

सुलोचना नामक, वक्र डोळे, ।
देखोनियां अंतर फार पोळे, ॥
असे महावोस तयेस वक्षीं ।
करीन मी आणिक पंकजाक्षी. ॥ १३९ ॥
लंबस्तनी ते मजला न साजे, ।
सदा मुखें भेरि मृदंग वाजे. ॥
घरोंघरीं ते फिरते रिकामी, ।
विवाह कां मी न करीन कामी. ॥ १४० ॥
घोरे घरारा वरपे फरारा, ।
पादे परारा, मुतते झरारा, ॥
खाते करारा; वपुही खरारा, ।
ते धांगडीचा बहु पैं दरारा. ॥ १४१ ॥

( चंपकमाला )

मांजरडोळी, नाकिंहि लोळी, ।
वक्षिहि झोळी, अंतर पोळी, ॥
ग्रामहि चाळी, दे बहु गाळी, ।
ते मज जाळी स्त्री अनबाळी. ॥ १४२ ॥
घालित डोळे, दावित गोळे, ।
तोडित लोळे, पाडित खोळे, ॥
आणिन शीळा, होइल बाळा, ।
घालिल कंठीं चंपकमाळा. ॥ १४३ ॥
मृदुरव साहे । हलुहलु बाहे, ।
चपळित पाहे, शशिवदना हे. ॥ १४४ ॥

( स्रग्विणी )

दे मला भाकरी, घेतसे चाकरी; ।
मी करीना जरी, लात मारी तरी. ॥

कोण आहे घरीं दाद माझी करी ? ।
स्रग्विणी नोवरी आजि कां नो वरी ? ॥ १४५ ॥
( शार्दूलविक्रीडित )
अंगीं खबडता, पदास पृथुता, वक्त्रीं वसे प्रेतता, ॥
कंठीं घर्घरता, कटीस पृथुता, वक्षस्थळीं शून्यता, ॥
नाकीं उद्वसता, वदे कठिणता, चित्तांत निःशंकता, ॥
हस्तीं तस्करता, असे गुण जिचे, ते नावडे तत्त्वता ॥१४६॥
अंगीं कोमलता, करीं कमलता, वाणीस पीयूषता, ॥
पायीं पद्मयुता, महाचतुरता, वक्षस्थलीं पूर्णता, ॥
नाकीं सुंदरता, मुखीं विमलता, नेत्रांस आकर्णता, ॥
चित्तीं निर्मलता, असे गुण जिचे, ते आवडे तत्त्वता ॥१४७॥
( उपजाति )
तों ब्रम्हचारी बहु हांक मारी, ।
येकेक तुम्हांस असेल नारी, ॥
तारूं तुम्हीं सर्व लुटोनि न्यावें, ।
उगें असावे, मग काय घ्यावें ? ॥ १४८ ॥
ते बोलती सर्वहि त्यासि, पाहीं, ।
शिळांस कांहीं तरि वाणि नाहीं. ॥
येका अनेका धरि रामपायीं, ।
तूं ब्रम्हचारी न पडे अपायीं. ॥ १४९ ॥
टाकूनि द्यावी घरची कुजाती, ।
त्वरें वरावी नवरी सुजाती. ॥
आम्हांपुढें आणिक कोण जाती, ।
याकारणें धांवति ते द्विजाती. ॥ १५० ॥
( भुजंगप्रयात )
बळानें शिळा मस्तकीं थोर घेती, ।
महा धीट ते राघवा नीट येती. ॥

तदा राम बोले गुरू न्यायवाचा ।
' यदर्थीं कसा काय, अन्याय यांचा ? ॥ १५१ ॥

( वसंततिलका )

यांचे शिरीं दगड कां दिधले विचारा, ।
हें आमुच्या तरि न येइ कदां विचारा. ' ॥
बोले तदा गुरु ' शिळा श्रमताल यांची,— ।
रामा ! असे स्थिति मनोजमता तयांची. ॥१५२॥

( द्रुतविलंबित )

दिसति हे मदमस्त समागती, ।
तव पदांबुजधूळिस मागती. ॥
पदसरोरुहसंगवशें किती, ।
द्विज शिळा अबला करूं इच्छिती. ॥ १५३ ॥

( वसंततिलका )

आम्हां घरीं वसति त्या कुमती कुऱ्हाडी, ।
याकारणें मति असे दुसरे वऱ्हाडीं ॥
तारुण्यपूर्ण, मदगर्वित, सुंदरीचा ।
नोहे, तदा करिन वास महादरीचा. ॥ १५४ ॥

( उपजाति )

टाकून द्यावें घरबांदरी तें, ।
त्वरें वरावें मग सुंदरीतें. ॥
नाहीं तरी, हें मन आदरी तें ।
सेवून राहीन, गिरीदरीतें ॥ १५५ ॥

( द्रुतविलंबित )

रघुपती वदलो द्विजनायका, ।
' बहुत सुंदर होतिल नायका. ॥

वचन सादर हें जरि नायका, ।
तरि शिरीं जडती जडनायका. ' ॥ १५६ ॥
धडधडां दगडां मग टाकिती, ।
निजगृहा द्विज धांवति ते किती. ॥
सदनिंच्या वनिता अवलोकिती, ।
सुरवधूंसहि त्या परिशंकिती. ॥ १५७ ॥
सकलही मग तेथुन चालले, ।
मिथिलभूपतिचें पुर पावले. ॥
वदत राम ऋषीप्रति माधुरी, ।
ऋषि म्हणे दिसते मिथिलापुरी. ॥ १५८ ॥
सरळ ताल, तमाल, उभे किती, ।
रघुविरासचि ते अवलोकिती. ॥
फलित पुष्पित वृक्षलतालती, ।
उपवनीं पवनीं बहु हालती. ॥ १५९ ॥
उमटती निज बाहु लताकृती ।
करिति काय, जणोंच नमस्कृती, ॥
शुकपिकादि कळशतिं बाहती, ।
निजबळें कुसुमें बहु वाहती. ॥ १६० ॥

( उपजाति )

मयूर मंदध्वनि गर्जताहे, ।
श्रुतीसही शब्दद होत आहे. ॥
*नद्यानद्याही अमृतास घेती, ।
सेवोसि त्या काय पुढेंचि येती. ॥ १६१ ॥

---

* येथें पहिला शब्द 'महाराष्ट्र कवीं' त छापलेल्या प्रतींत संपादकांना लागलेला दिसत नाहीं. त्या ठिकाणीं त्यांनीं ᵕ – ᵕ – – असें त्या

तळीं जळीं पूर्ण, येवोन पाहा, ।
नदीनदीनां अनघ प्रवाहा. ॥
वापी महाकूप पवित्र पाहें, ।
आकारिती टाकुनि यंत्र पाहे. ॥ १६२ ॥

( द्रुतविलंबित )

विसरसी सरसी क्षणिं, राघवा ! ।
म्हणुनि हंस करी बहु लाघवा. ॥
बहुत सारस सारस सांगती, ।
अमृतसार जसा रस मागती. ॥ १६३ ॥
कमलिनी मलिनी अलिनीव्रजीं, ।
म्हणति कीं, अवनीश ! क्षणीं व्रजीं. ॥
परिचरी लहरी परि लाविती, ।
कमलचंचल तन्मुख दाविती. ॥ १६४ ॥
जनक सन्मुख तो मग येतसे, ।
मुनिवरास बहूत नमीतसे. ॥
बहु बरी नगरी, अति साजिरी, ।
तिज सरी न करी अमरीपुरी. ॥ १६५ ॥

( इंद्रवज्रा )

प्राकार शोभे तिजला विशेषें, ।
संवेष्टिली भासत जेंवि शेषें. ॥
शोभेति त्या फार चऱ्यास फेरा, ।
नाहीं तियेलागिं कदापि घेरा. ॥ १६६ ॥

---

शब्दाचें स्वरूप दर्शविलें आहे. नागेशाची एकाच कल्पनेचा अनुवाद करण्याची पद्धति लक्षांत घेतां १६२ श्लोकाच्या अनुरोधानें मी ‘ नद्या-नद्यांना ’ हा शब्द सुचविला आहे. ( सं. )

( रथोद्धता )

शोभती बहु चहूंकडे हुडे, ।
पर्वतासि तुटले जसे कडे. ॥
खंदका बहु अगाधता असे, ।
प्राप्तसिंधुवर बद्धसा वसे. ॥ १६७ ॥

( उपजाति )

प्रभाव हा कोण दमामयाचा, ।
नभस्थळीं शब्द तमाम याचा. ॥
कर्णे नफेऱ्या बहु वाजतातीं, ।
नादें दिशा सर्वहि गाजताती. ॥ १६८ ॥
प्रभाव तो थोर नगारियाचा, ।
वर्णीतसे नाद नगारि याचा. ॥
वाजेति ते थोर महा तुतारे, ।
ज्यांच्या स्वने सांडति शत्रु तारे. ॥ १६९ ॥

( स्वागता )

वाजतां अति कठोर नगारा, ।
भेदिती कठिणहि नव गारा. ॥
गर्जती नृपतिचे बहु बांके, ।
घालणें तरी उरीं परिपाकें. ॥ १७० ॥
लाविलीं बहुत फार निशाणें, ।
सर्वही तगट सारुनि शाणे. ॥
शोभती परम ते बहु माने, ।
देखतां पर गळे अभिमानें. ॥ १७१ ॥
अंबरीं बहु विराजत मा हे. ।
सैन्यकास सुषमा परमा हे. ॥

काय येत नभिं निर्मळ मासा ? ।
पाहती बहुत लोक तमासा. ॥ १७२ ॥

( द्रुतविलंबित )

घडघडां जय मागध बोलती, ।
नृपति फार तयांप्रति बोलती. ॥
बहु तुरीं अपरीं बहिरावलें, ।
रथरजीं तरणीस दुरावलें. ॥ १७३ ॥

( स्वागता )

शोभतां बहुत ते दरवाजे, ।
नौबती बहुत सुंदर वाजे. ॥
लोक येउनि विलोकिति रामा, ।
बाल, वृद्ध, तरुणी, किति रामा. ॥ १७४ ॥

( द्रुतविलंबित )

सकल धावति राम पहावया, ।
सगुण सुंदर मूर्ति पहावया. ॥
निपजला तरि हा उदरीं जिच्या, ।
नमन, पां, करिजे चरणा तिच्या. ॥ १७५ ॥

( वसंततिलका )

ऐसेपरी सकळही नगरांत आले, ।
सत्कार थोर उपचार समस्त झाले. ॥
बोले विदेह, जरि कीं पण तो न होता, ।
देतों वरा रघुविरा नवरास, सीता. ॥ १७६ ॥

( तोटक )

बसली विभवें वरराजसभा. ॥
अति शोभित सैंवरराजसभा. ॥

रघुवीर, मुनीवर, राजसभा. ।
इपुढें न तुळे सुरराजसभा. ॥ १७७ ॥

( रथोद्धता )

शोभतो बहुत रामकेसरी, ।
कोण आणिक करूं शके सरी ? ॥
भासमान बहु तेज आगळें, ।
त्यापुढें सकळही अजागळें. ॥ १७८ ॥

( वसंततिलका )

सिंहासनावरि विराजति सर्व राजे; ।
त्यांमाजि राघव सलक्ष्मण तो विराजे. ॥
नानाकलाकुशल गायक गाति गाणें, ।
पहावया कुतुक, येति नभीं विमानें. ॥ १७९ ॥

( शार्दूलविक्रीडित )

आले कौतुकदर्शना सकळही ज्ञानी, मुनी, जे ऋषी, ।
मौनी आणिक वैद्य, गायक, कवी, पौराणिक, ज्योतिषी, ॥
वेदांचे पढते, दिगंबरपती, जे ब्रह्मचारी, वशी,
जोगी, जंगम, आगमी, निरशनी, निःसंग जे तापसी. ॥१८०॥
विप्र, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, जन जे आणीकही जातिचे, ।
नानामागधइंद्रजाळकनटे प्रख्यात जे पंथिंचे, ॥
नावावेशविशेषधारक कसे आश्चर्यकारी, पहा, ।
आले सर्व कलाकलापनिधि जे, जे हास्यकारीमहा.॥१८१॥

( उपजाति )

गोंसावि पाहा सहबाळरंडा- ।
सुवासिनीही तलगा उदंडा. ॥
एकांतिं नेती उपदेश देती, ।
दोघें जणें ब्रह्मरसासि घेती. ॥ १८२ ॥

बाळा तयाचे मग पाय सेवी, ।
तो आदरें मस्तकिं हात ठेवी. ।
स्वरूप पाहे, झणिं भेद भावी, ।
दोघेंजणें येकपणेंचि दावी. ॥ १८३ ॥
उघाटि तो, सादर गर्ब्हडोळ्यां, ।
हं ब्रह्म दावी, मग चर्म गोळा.॥
हें सौख्य देखें तुमच्यानि संगें, ।
उगी असे, हें कवणा न सांगें. ॥ १८४ ॥
चर्मास चर्मीं जरि संग होतो,
ब्रह्मीं तरी काय विरोध येतो ? ॥
स्वरूप पाहें, रस कोण वाहे ! ।
दोघां जणां हाचि अभेद आहे. ॥ १८५ ॥
आणीकही कामिनि ज्या प्रचंडा, ।
ऐसें करोनी भुलवीति रंडा. ॥
अनेक जाती, उपदेश देती, ।
शिश्नोदरीं तत्पर फार होती. ॥ १८५ ॥
जो सज्जनांतें बहुसा खटाळी, ।
घरोघरीं तो तुकडे गटाळी. ॥
जो कर्मधर्मा करितो सटाळी, ।
गोंसावि तो हा विधवा फटाळी. ॥ १८७ ॥
हा तों स्वयंपाक करी स्वहस्तें, ।
दे फोडणी, हिंग जिरें प्रशस्तें. ॥
देवार्चनें मांडुनि नेत्र लावी, ।
अनेक कार्यें हृदयांत भावी. ॥ १८८ ॥
पक्का सवाशेर कणीक, रोट्या ।
चक्रापरी दोन विशाल मोठ्या.॥

त्या वेगळीं पांच फळें विशाळे, ।
वरान्न रांधी मग तें निराळें. ॥ १८९ ॥
शाका अनेकी, वरि निंबु चोळी, ।
कडेस ठेवीत अहारपोळी. ॥
भातास तो आग्रह फार झाला, ।
कैलास, नेणों दुसराच आला. ॥ १९० ॥
कढी, घृताचे तरि चार डोणे, ।
आले पहा ते उपमेस डोणे. ॥
तें सर्वही अन्न उडोनि गेलें, ।
चित्राहुती पात्र सशेष ठेलें. ॥ १९१ ॥

( द्रुतविलंबित )

सकल राजसभा घनदाटली, ।
गुणिजनीं स्थिति ते मग थाटली. ॥
कारिति नृत्य बहू बहुभर्तृका, ।
मुनिजनांसि मनोभवकर्तृका. ॥ १९२ ॥

( भुजंगप्रयात )

जया मुख्य सर्वा सख्या शीघ्र येती, ।
गृहामाजि शृंगार सीतेसि देती. ॥
महावाद्यनादें नभोवर्म धालें, ।
बरें आदरें मंगलस्नान केलें. ॥ १९३ ॥

( इंद्रवज्रा )

सोडोनि देती मग मोहबंदी, ।
चित्तासि त्या योजिति तोहबंदी. ॥
आरक्तवस्त्रीं अतिलालसेला, ।
याकारणें सज्जिति लाल सेला. ॥ १९४ ॥

( स्वागता )

तोहबंद अति सुंदर भासे, ।
त्यावरी अरुणवस्त्र विकासे. ॥
आदरें करुनियां मग बाळी, ।
लेतसे बहुत सुंदर चोळी. ॥ १९५ ॥
घातली सखिजनीं मग वेणी, ।
लेइली अति मनोहर लेणीं. ॥
काय वर्णन करूं? बहु शोभे, ।
[1]देखतां स्वपतिचें मन लोभे. ॥ १९६ ॥

( इंद्रवज्रा )

वेणी त्रिवेणीसम भासताहे. ।
याकारणें ते त्रिगुणात्म, पाहें, ॥
आधीं [2]फरा केतकिपत्र साजे, ।
त्यानंतरें राखडि ते विराजे. ॥ १९७ ॥

( स्वागता )

मूद, ताइत विराजित भारी, ।
नागबंद धरि ती मग नारी. ॥
भोंकरें सहितकासव, मासा, ।
मोर बोर, कुहिरीसह कैसा? ॥ १९८ ॥
दाळिमावरि विराजित रांवा, ।
[3]बेल सालफळ ते मज दावा. ॥
आंवळ्यासहित पुष्प विराजे, ।
आरसीउपरि चंपक साजे. ॥ १९९ ॥

---

१ देखतांच मुनिचें मन लोभे. २. करा. ३. बाल सालफळ तें मग दावा.

आंवळे, मग झबीसह गोंडे, ।
[1]वर्णितां धिषणही परिकोंडे. ॥
घातले उपरि रंगित नाडे, ।
[2]वर्णनें बहुत होति पवाडे. ॥ २०० ॥

( इंद्रवज्रा )

गंगावनीं गुंफित फार लेणीं, ।
श्रोणीतटीं लंबित [3] रम्य वेणी, ॥
भासे जशी श्यामल सर्पिणी ते, ।
दंशावया राममनास येते. ॥ २०१ ॥
शीर्षी सिता सीसफुलांस ल्याली, ।
त्यांच्याच खाले हंसळीस घाली, ॥
पानें पख्या सार्जात भाळदेशीं, ।
पत्रीयमोतीं लवती विशेषीं. ॥ २०२ ॥
मुक्ताफळांचा सर, भांगरेखें, ।
त्याच्यापुढें भांगटिळा सुरेखें, ॥
त्याखालिं लावी मग चंद्र, हंसा, ।
भ्रूअंतरीं सिंदुरबिंदु कैसा[4]. ॥ २०३ ॥

( उपजाति )

फुली, तथा, बेसर मोर, होतीं ।
चित्तास ये ना; मग लेत मोतीं. ॥
नाकास मोतीं अति रम्य भावें, ।
दाणा तयाचा अति मोल पावे. ॥ २०४ ॥

---

१. देखतां मुनि मनिं मुरकुंडे. २. पाहतां यति तयासहि नाडे.
३. चुंबित. ४. केशा.

( इंद्रवज्रा )

कर्णीं फुलें, भोंवरिया अभंगा, ।
पंखे, लवंगा, बुगड्या सुरंगा, ॥
कोथिंबिरी आणिक खुंटबाळ्या, ।
घोंसांचिया त्या जडिता निराळ्या. ॥ २०५ ॥

( उपजाति )

सर्वांवरी शोभति तोंगलें हीं, ।
जडीत कापां उपमाच नाहीं. ॥
नागोत्तरें कुंडलकर्ण झालीं, ।
यालागिं बाळा मग तेंच घाली. ॥ २०६ ॥

( मालिनी )

टिकमणि, गरसोळीं, तेज मोठें सरीचें, ।
सर सरळ गळींचे शोभती, मोतियांचे, ॥
तदुपरि दुलडी ही, सांखळी ताइतेसीं, ।
पदक जडित, शोभा एक दाण्यास कैशी ! ॥२०७॥

( उपजाति )

एकावळी अंबरसा विराजे, ।
पेटी महामाणिकमोल[1] साजे. ॥
चिंताकही चिंचपटी विशाळा,।
घाली गळां मोहनमाळ बाळा. ॥ २०८ ॥

( मालिनी )

धुकधुकि, बहु शोभा कारल्यालागिं आली, ।
हयकुल, [2]अहिदोरा, हार, हंबेल[3], ल्याली, ॥

---

१. माळ. २. हयदोरा. ३. हंमेर.

दृढतर पुतळ्यांची माळ, निंबोळियांची, ।
सरळ मरुज माळा चारु चांफेकळ्यांची. ॥ २०९ ॥
जडित कनकमाळा मोतियांचीच जाळी ।
[1]भजनपर जनांचें दर्शने पाप जाळी, ॥
तदुपरि कडदोरा शोभतो मध्यदेशीं, ।
जर कमर झणाणी, नांदतो किंकिणीसीं. ॥ २१० ॥

( इंद्रवज्रा )

बाहू बहू साजति बाजुबंदीं, ।
त्या तोळबंद्या अति रम्य रुंदी. ।
वांकी, चुडे, कांकणियांस घाली, ।
[2]ते आंवळ्याचे सर थोर त्याली. ॥ २११ ॥

( उपजाति )

सत्कंकणें, पाटलिया, सुवाळे, ।
दोरे, जवे, हातसरे निराळे, ॥
कांचांचिया बांगडिया सुरंगा, ।
स्थळीं स्थळीं शोभति त्या दुरंगा. ॥ २१२ ॥

( स्वागता )

पोंह्ची जडित, नेटका सिका, ।
अंगुलीस नवरत्नमुद्रिका. ॥
आरसीस अति तेज आगळें, ।
जेहगीर वरती दशांगुळें. ॥ २१३ ॥

( इंद्रवज्रा )

[3]पायीं कडी पैंजण रम्य, पाहे, ।
त्या घायऱ्यांचा ध्वनि गर्जताहे. ॥

---

१. तरुणजनमनातें देखतां फार जाळी. २. त्या. ३. पायांकडे.

वांकी तथा सांखळिया विशाळा।
[1]त्यांखालत्या घागरिया रसाळा. ॥ २१४ ॥
वाळे निराळे, गुजऱ्यांस पाहें।
सर्वांवरी जेहर लेत आहे. ॥
नादें विनोदें नभ पूर्ण झालें,।
कंदर्पदर्पा अति तेज आलें. ॥ २१५ ॥

( मालिनी )

अनवट बहु भारी, जोडवीं फार मानें,।
खुळखुळ रव कैसा होत पोल्हारियानें. ॥
[2]बहुनकाशि विरोल्या, शोभती रम्य बोटें,।
अरुणकिरणशोभा [3]पाउलीं पूर्ण दाटे. ॥ २१६ ॥

( उपजाति )

ल्याली कशीं आणिक रम्यभूषा,।
तांबूलशोभा वदनीं विशेषा. ॥
करीं धरोनी मुकुरास लक्षीं,।
ते लेतसे अंजन, [4]सारसाक्षी. ॥ २१७ ॥

( मालिनी )

बहुवस करपायां बुंथि घेऊनि, बाळी,।
धरुनि मुकुर हातीं, रूप पाहे, [5]सुशाळी. ॥
अमलकमलनेत्रा मानसीं बोलताहे,।
" सकल विमल शोभा [6]राघवायोग्य आहे." ॥ २१८ ॥

---

१. त्या वेगळ्या गुंजपट्या निराळया. २. बहु नकासि विरोड्या वाजती रम्य घाटें. ३. यावकें. ४. खंजनाक्षी. ५. सुशीला. ६. ईश्वरायोग्य.

( इंद्रवज्रा )

सीता, पहातां, जगदेकमाता, ।
तद्वर्णनीं कोण समर्थ आतां ? ॥
जेथें गुरूची अति मंद वाणी, ।
मी काय तीला मतिमंद वानी ? ॥ २१९ ॥

( द्रुतविलंबित )

मृदुल उच्च नखीं उपमा नसे, ।
सकल माणिकरंग फिका दिसे. ॥
नखर अंगुलियांवर शोभती, ।
उरगपंचफणामणि शोभती. ॥ २२० ॥

( इंद्रवज्रा )

पादांगुळीं पोंवळवल्लि, जाणा, ।
आरक्त पुष्पेंच नखें समाना, ॥
किंवा प्रवाळें तरुचीं नवीनें, ।
त्यां अग्रभागीं सुरगोप जाणें, ॥ २२१ ॥

( उपजाति )

किंवा, गमे पंचशरें जगातें ।
जिंकोनियां, ठेवियलें शरातें, ॥
कीं, पादपद्मींहुनि पंचगंगा ।
निघालिया, भासति त्या [1]दुरंगा. ॥ २२२ ॥

( द्रुतविलंबित )

सरळ अंगुलि देखत लाजतें ।
कमलनाल, चळाचळ कांपतें; ॥

---

१. सुरंगा.

अरुण पाउलराग विलोकिला, ।
अरुणही [1]बघतां मग खंजला. ॥ २२३ ॥
पदयुगीं सरसीरुह जिंकिलें, ।
म्हणउनी कमळीं जळ सेविलें; ॥
चरणिंची मृदु टांच कशी दिसे, ।
अरुण भाव जया[2] कुसुमीं नसे. ॥ २२४ ॥

( उपजाति )

घोंटे तिचे वर्तुळ रम्य भारी, ।
स्थिरावले कीं पुरुषार्थ चारी. ॥
निर्लोमिका पोटरिया, सुरेखा, ।
सुवर्णवर्णा, कमनीय, देखा. ॥ २२५ ॥

( द्रुतविलंवित )

अतुळ[3] वर्तुळ जानु विराजला, ।
कनकदंड तशा उरु चांगल्या; ॥
कदलि आणि करीकर टाकिले, ।
बहुल शीतळ, कर्कश, देखिले. ॥ २२६ ॥

( उपजाति )

भयें मुनीच्या अति नम्र झाला, ।
तो विंध्य भूमीधर काय आला, ॥
नितंबबिंबीं वसतीस केलें, ।
स्थूलत्व तेणें मग त्यांस आलें. ॥ २२७ ॥
मध्यास तीच्या बहु सिंह भ्याला, ।
नेणों दरीच्या विवरीं लपाला. ॥

---

२. पळतां. २. तया. ३. विमळ.

नितंबदु:खें, प्रभुच्या भयानें[1] ।
संकीर्ण तो मध्यमदेश, जाणें. ॥ २२८ ॥
कांची, महाथोर भुजंगमान, ।
संवेष्टिला मध्यमदेश, जाण. ॥
महाभयें क्षीण विशेष झाला, ।
स्वगौरवालागिं भुलोनि गेला. ॥ २२९ ॥
शिशुत्वसौराज्य बुडोनि गेलें, ।
मध्यांगदेशांतरिं दैन्य आलें. ॥
किंवा, कुचांनीं परचक्र केलें, ।
गुरुत्वसौराज्य[2] लुटोनि नेलें. ॥ २३० ॥

( मालिनी )

विधिकरुनि विधीनें, सर्वदा[3] थोर कष्टीं, ।
मज गमत, इयेची निर्मिली अंगयष्टी. ॥
मुठिस धरुनि मध्यें पाहिली, पूर्ण दृष्टीं. ।
जनकनृपवराला प्राप्त पीयूषवृष्टी. ॥ २३१ ॥
घन जघन तियेचे साजिरे फार आहे, ।
तदुपरि रमणीचा नाभि, गंभीर पाहे, ॥
जनकदुहितृगंगेमाजि आवर्त भावो, ।
भजननमनमात्रें सांडिजे देहभावो. ॥ २३२ ॥

( स्वागता )

रोमराजि करवाळ कसाचा, ।
नाभि मुष्टि, गमतो मज साचा. ॥
शस्त्र हें विरचिलें मदनानें, ।
जिंकिलें सकळही जग जेणें. ॥ २३३ ॥

---

१. नितंबबिंबप्रभुच्या भयानें. २. मध्येंच. ३ सर्वथा.

( उपजाति )

उरोजपक्षिद्वययुद्धकाळीं, ।
मुखाहुनी नीट भुजंगबाळी ॥
जाते भयें नाभिबिळांतराळीं, ।
रोमावळी तेचि दिसे निराळी. ॥ २३४ ॥

( इंद्रवज्रा )

[1]आळेंच तें, नाभि नव्हेच जाणा, ।
[2]निर्लोमराजी लतिकाच माना. ॥
कीं, काममातंगकटद्वयाची ।
धाराच ते चालतसे, मदाची ॥ २३५ ॥

( उपजाति )

सुरंगता शोभत चिद्घनाची, ।
कीं, यौवनश्री नयनांजनाची, ॥
किंवा, स्मराचा शर तोचि, पाहें, ।
वरी त्रिलोकीवरि चाललाहे. ॥ २३६ ॥

( इंद्रवज्रा )

किंवा, नवीन स्तनगुच्छ आले, ।
त्याकारणें हे भ्रमरालि चाले; ॥
किंवा, त्रिरेखा त्रिनदीच माना, ।
रोमावळी सेतुनिबंध[3] जाणा. ॥ २३७ ॥
किंवा, पयोधरकटाहुनि ते निघाली[4] ।
भृंगालि, नाभिकमलावरि नीट आली; ॥
किंवा, गमे मदनकुंजरशुंडिका ते, ।
गंभीरनाभिसरसीं सलिलास जाते. ॥ २३८ ॥

---

१. आलोच तें. २. न रोमराजी लतिकाचि जाणा ३ निबद्ध. ४. उडाली.

( वसंततिलका )

उत्तुंग, पीनहि पयोधर हंसमानें, ।
कंदर्पभूमिपतिमल्ल, असेंच जाणें. ॥
अत्यंत सुंदर हृदस्थळ भूमिकेशीं ।
आले, जणों अति मदें झगडावयासी. ॥ २३९ ॥
उत्तुंग, पीन, कुच ते नव्हतील, जाणा, ।
तारुण्यकुंजरकठोरकटा समाना. ॥
तारुण्यसूर्यरुचिशैशवतोय आटे, ।
नेणों उरोज, उघडीं पडतात बेटें. ॥ २४० ॥

( उपजाति )

सीता म्हणों ते जरि रुद्रवीणा, ।
उरोज तुंबीफळयुग्म जाणा ॥
स्मरांग ते सद्गुण भासताहे, ।
याकारणें सुस्वर तीस आहे. ॥ २४१ ॥

( भुजंगप्रयात )

अहो, जानकी ते असे हेमवल्ली, ।
तिचे हस्त ते पल्लवीयुक्त जाळी. ।
तथा, अंगुली ते प्रवाळें नवीनें, ।
नखें तींचि आरक्त पुष्पें, प्रमाणें. ॥ २४२ ॥

( मालिनी )

कर रुचिर तियेचे शोभती फार कैसे, ।
कनकजनित[1]केळी कोवळे गर्भ जैसे. ॥
करतळतळियांची[2] निस्तुळा जाण पाळी, ।
सरळ विमळ तेथें अंगुली [3]बाळकेळी. ॥ २४३ ॥

---

१. जडित. २. तळ्याची. ३. जाण.

( इंद्रवज्रा )

आरक्तरेखांकित पादपद्में, ।
चक्रें [1]दहा शोभति जेंवि सद्में. ।
त्याची फळप्राप्ति अशीच भावे, ।
जे राघवालागिं वरास पावे. ॥ २४४ ॥

( उपजाति )

रेखात्रयें कंठ विशेष साजे, ।
देखोनि त्यातें मग शंख लाजे. ॥
ऐकोनि तीचा स्वर पूर्ण कानीं,।
मयूरहंसस्वर कोण वानी ? ॥ २४५ ॥

( द्रुतविलंबित )

हनुवटी अति सुंदर देखिली, ।
कनक वोतुनियां जशि निर्मिली. ॥
उपरि गोंदित बिंदु, कळाधिका ।
सुमुख सुस्थित काय पिपीलिका. ! ॥ २४६ ॥

( इंद्रवज्रा )

दृग्दोष होईल म्हणोनि, नेणें, ।
तो लाविला अंजनबिंदु तीणें. ॥
कीं, नासिकीं मौक्तिकचंद्र आहे, ।
रोडेजला राहु दुरून पाहे. ॥ २४७ ॥

( भुजंगप्रयात )

तिचें ओष्ठलावण्य देखोनि भारी, ।
प्रवाळें कशीं शुष्क होती शरीरीं. ॥

---

१ हतीं शोभति भाग्यसद्में.

नव्हे वोष्ठ, वक्त्रांत पीयूषवल्ली, ।
तयेचीं प्रवाळेंचि बाहेर आलीं. ॥ २४८ ॥

( इंद्रवज्रा )

दंतांसि तीच्या अति तेज साचें, ।
तैसें पहा कुंदकळ्यास कैचें ? ॥
तांबूल घे ती वदनें प्रयत्नें, ।
तेव्हां तिचीं भासति दंतरत्नें. ॥ २४९ ॥

( वसंततिलका )

दाडिंबबीज जरि सोज्वल फार होतें, ।
दंतोपमेस तरि तें बरवेंचि येतें. ।
चीऱ्याविराजित तिचे समदंत कैसे, ।
हीरे सुनीळमणिकर्दमबंद जैसे. ॥ २५० ॥

( उपजाति )

बत्तीस ठायीं विधु कर्वतूनी ।
केले तिचे दंत, असोंचि मानीं. ॥
कलंक तैसाचि वसे निराळा, ।
त्याच्याचि केल्या चिरिया सुनीळा. ॥२५१ ॥

( इंद्रवज्रा )

सोळा कळा कीं, चिरिल्या समाना, ।
हे युक्ति तीच्या रदनांस माना. ॥
पूर्वी कळांनीं तम खादिलेंसे, ।
तें कापितां काय चिऱ्यांत बैसे ! ॥ २५२ ॥

( उपजाति )

हांसें तियेच्या वदनास यावें, ।
चंद्रोदयें काय तदा करावें ? ॥

ते नोबले कीं वचनासि जेव्हां, ।
तमिस्त्ररूपी जन होय तेव्हां. ॥ २५३ ॥

( भुजंगप्रयात )

महादीप्ति मोठी कपोलद्वयासी, ।
जशी दीधली वोप ते कांचनासी. ॥
कपोलद्वयीं बिंबतें रूप साचें, ।
जणों ठेविले आरसे कांचनाचे. ॥ २५४ ॥

( इंद्रवज्रा )

नासा शुकाची जरि नीट होती, ।
नाकास तीच्या उपमेस येती. ॥
नासा तियेची अति उच्च मानें, ।
पुष्पें तिळांचीं गळती भयानें. ॥ २५५ ॥

( उपजाति )

सौंदर्य तीच्या नयनांस पाहे ।
तद्वर्णनीं कोण समर्थ आहे ? ॥
देखोनि तीच्या नयनांस कांती, ।
पळोनि जाती हरिणी वनांतीं. ॥ २५६ ॥

( भुजंगप्रयात )

इचें नेत्रलावण्य आम्हांस नाहीं, ।
चकोरें कशीं भाक्षिती वन्हि, पाहीं. ॥
बरे [1]साजती चांगले नेत्र कैसे, ।
जळामाजि हो ! [2]पाहतां मीन जैसे. ॥ २५७ ॥

( स्वागता )

नेत्र धांवतचि सत्वर आले, ।
कर्णकूपकुहरा मग भ्याले. ॥

---

१. साजिरे. २. पोहती.

अन्यथा बहुत लांबत जाते, ।
स्थान आश्रवण यास्तव त्यांतें. ॥ २५८ ॥

( भुजंगप्रयात )

अहो, नेत्र शोभेति मोठ्यां विलासें, ।
जणों, खेळती मन्मथाचेच फांसे. ॥
ललाटीं प्रभा साजिरी पूर्ण देखा, ।
जशी अष्टमीमाजि शुभ्रा सुरेखा ॥ २५९ ॥

( उपजाति )

धिःकारिला चंद्र तदाननानें, ।
तो अंतरीं दाह महाऽपमानें. ॥
मध्यें विधू यास्तव नीळ झाला, ।
कलंक ऐसें म्हणती तयाला. ॥ २६० ॥

( भुजंगप्रयात )

तिचे केश देखोनियां चामरातें, ।
जगामाजि तात्काळ धिःकार येतें. ॥
तथा देखिल्या सुंदरा केशपाशा, ।
मयूरें कशी सांडिती पिच्छ आशा. ॥ २६१ ॥
नसे वेणिका, ते असे भृंगरेखा; ।
मुखा जातसे पाठिशीं येत देखा, ॥
तिची पाठि, मोठ्या विलासे विराजे, ।
जसें हेमकेळीदळीं तेज साजे. ॥ २६२ ॥

( इंद्रवज्रा )

धम्मिल्लराहूदरभेद झाला, ।
त्या[1] आंत कीं तो मुखचंद्र आला. ॥

---

१. त्यांतूनि तो कीं मुखचंद्र आला ?

तो [1]धाक अद्यापि तसाच आहे, ।
यालागिं कीं बोलति भांग, पाहें. ॥ २६३ ॥

( उपजाति )

केशावली, कीं, सम हेमलेखा, ।
विद्युल्लतां कीं मुदिरांत, देखा. ॥
मंदाकिनी कीं, गगनीं विराजे, ।
अधोमुखें वेणि कटीस साजे. ॥ २६४ ॥

( भुजंगप्रयात )

नखारभ्य हो केशपर्यंत, पाहा, ।
तियेचें असे अंगसौंदर्य माहा. ॥
प्रभेनें तिचे लोक हा दीप्त झाला, ।
नभामाजि तो सूर्य लोपोनि गेला. ॥ २६५ ॥

( उपजाति )

त्यानंतरें सुंदर माडियेसी, ।
आली सखीवेष्टित ती सुकेशी. ॥
उच्चासनीं बैसत पंकजाक्षी, ।
महादरें सर्व सभा निरीक्षी. ॥ २६६ ॥

( भुजंगप्रयात )

झरोक्यावरी बैसली राजबाळा, ।
पुढें ठेविली चांगली पुष्पमाळा. ॥
वधू पाहते ज्यां नृपांलागि, दृष्टीं ।
तयां होतसे, काय पीयूषवृष्टी. ॥ २६७ ॥

---

१. घाव. २. कृशोपलीं. पण येथें 'केशोपली' असाही पाठ सुचवावासा वाटतो. ( सं. )

( उपजाति )

जे कीं महा आप्त, न पारखी ते, ।
जे सर्वही लक्षण पारखीते. ॥
नामें जया, दूरुनि जानकीतें ।
सभासदां दाखविते सखी ते. ॥ २६८ ॥

( स्वागता )

“ कोंकणस्थ नृप हा जळधीचा, ।
स्वामि तो चतुर निर्मळधीचा; ॥
घालिशील जरि माळ करानें, ।
देखसी तरि तमालकरानें. ॥ २६९ ॥
ज्या घरीं बहुत हे शतवाजी, ।
ज्यासमोर रिपु हे शतवाजी; ।
तो नृपाळवर माळवराजा, ।
यास देइं वरमाळ वरा, जा. ॥ २७० ॥
दाक्षणांत बहु दक्ष पहा हा, ।
जो सुलक्षण विचक्षण माहा; ॥
शोभतें करिं शरासन एका, ।
हा तुझ्या तरि मनास नये का ? ॥ २७१ ॥

( उपजाति )

ज्याची अभंगा परि भा विराजे, ।
जो कीं स्वतेजें परिभावि राजे; ।
काशीनिवासी अनुभवराशी, ।
वरीसि ना तूं तरि या वरासी ? ॥ २७२ ॥

( इंद्रवज्रा )

कोणी पहा थोर मिशांसि तावी, ।
आकर्ण कोणी रदनांसि दावी, ॥

कोणी तसा आंगहि मोडिताहे, ।
कोणी विलासें अति वक्र पाहे. ॥ २७३ ॥
कोणी महा मस्तकिं हात ठेवी, ।
तांबूल कोणी सविलास सेवी, ॥
कोणी करां चोळित फार देखा, ।
कोणी महीं वोढिति वक्र रेखा. ॥ २७४ ॥

( उपजाति )

स्वांगास कोणी तरि खाजवीतो, ।
कोणी स्वयें वस्त्रहि पालवीतो, ॥
अधोमुखें आणिक बैसताहे, ।
आणीक कोणी कर चोळिताहे. ॥ २७५ ॥

( स्वागता )

हे समस्त नृपपुत्र देखिले, ।
काय चित्रपट'भूमि रेखिले ! ॥
दाखवा सखि पाहिन राजसा, ।
सर्वरत्ननिचयीं हिरा जसा. ॥ २७६ ॥

( उपजाति )

सर्वांत तो हा सिरताज पाहा, ।
श्रीराम पायीं निरता, जपा हा. ॥
वंशावळी आइक राजयाची, ।
नसेल संख्याच जया जयाची. ॥ २७७ ॥
वैवस्वताचा मनु वंशधर्ता, ।
दिलीप नव्याण्णव यज्ञ कर्ता; ॥
जो नंदिनी धेनु पुजूं निघाला, ।
तेणे गुणें तो रघु पुत्र झाला. ॥ २७८ ॥

शास्त्रास्त्रविद्या बहुसाल ज्यातें, ।
युद्धांत जो मानवि वासवातें. ॥
करूनियां विश्वजिती दिगंतीं, ।
भूपात्रसेवा, वरिली विभूती. ॥ २७९ ॥

तो कुत्स आला शुभलक्षणेंसी, ।
नृपास मागे गुरुदक्षणेसी. ॥
विशेष संतोष तयास पोटीं, ।
द्रव्यासि मागे मनुसंख्य कोटी. ॥ २८० ॥

नभींहुनी द्रव्य पडे पवाडें, ।
पावोनियां विप्र वदे पवाडे; ॥
सुपुत्र आशीर्वदला तयाला, ।
त्याच्या प्रसादें अज पुत्र झाला. ॥ २८१ ॥

वरूनियां इंदुमती अजानें, ।
केलीं समस्तें समरीं अजानें. ॥
जो सर्वदां सर्व घटीं समान, ।
आले पहा आत्मगृहा समान. ॥ २८२ ॥

( मालिनी )

दशरथ सुत कैसा ख्यात झाला अजाला; ।
सुलभ कलभ कैसा होतसे दिग्गजाला. ॥
समरिं विजित शुक्राचार्य जेणें नृपानें, ।
सकल सुरवरांचीं घेतलीं प्रीतिपानें. ॥ २८३ ॥

( उपजाति )

पुत्रेष्टि केली बहुतां विचारीं, ।
तयासि झाले मग पुत्र चारी. ॥

त्यांमाजि हा मुख्य महावतारी, ।
श्रीराम, नामें सकलांस तारी. ॥ २८४ ॥

विचार माझा हृदयीं धरावा, ।
सीते! तुवां हा हृदयीं वरावा. ॥
याचेपुढें भासति सर्व तैशीं, ।
सिंहापुढें कीं मृगजाति जैशी. ॥ २८५ ॥

खद्योत जैसे द्युमणीस येतां, ।
चंद्रोदयीं कीं, नलिनी पहातां; ॥
मूर्खें जशीं पंडित भावि लोकें, ।
दिवा जशीं कीं, दिसती उलूकें. ॥ २८६ ॥

भूपाळवृंदें अति तेजमंदें ।
झालीं पहा, राममुखारविंदें. ॥
वरा वराया स्वमनींच पाहे, ।
रामापुढें आणिक कोण आहे ? ॥ २८७ ॥

( स्वागता )

काय भासत विभा वदनाची ! ।
कोण दीप्ति झळके रदनांची ! ॥
देवता त्रिजगतीसदनाची, ।
काय, मूर्ति.मिरवे मदनाची ! ॥ २८८ ॥

( इंद्रवज्रा )

तोरा महासा गरजो जयाचा, ।
तो राम हा सागर जो जयाचा. ॥
पाहा वयाचा भवभाव लाहे ।
पाहावयाचा भवभावला हे ॥ २८९ ॥

( माल्यभारा )

उपमा न दिसे शरासनातें, ।
मग तें वैरिउरा शरास नातें. ॥
नृप घे तुरगीं बसोनि भाला, ।
मग ये बहु कंप तया नभाला. ॥ २९० ॥

( भुजंगप्रयात )

महा थोर उत्कर्ष याणें जयाचा, ।
टिका घेतलासे जयानें जयाचा. ॥
नभस्पर्शनातें महामान लाहे, ।
म्हणोनी नृपांलागिं हा मानलाहे. ॥२९१॥

( स्वागता )

बागदार, समशेर, पुराणी, ।
देखतांचि, पळतो रिपु रानीं. ॥
चीरली अति विभाकरबाडें, ।
जीपुढें रिपुंकुळें करबाडें. ॥ २९२ ॥
थोर तेज मिरवे तरवारें, ।
जीसमोर रिपुचें दळ वारे, ॥
संगरीं झळकतां परजाला, ।
दिव्यमार्गांपर तो पर जाला.॥ २९३ ॥
तेज फार दिसतें जमदाडें, ।
क्रूर फार अति तीक्ष्ण गाढें; ॥
देखतांचि परजीभ वळेना, ।
लागतां करील काय कळेना. ॥ २९४ ॥
चामरीं अति सुशोभित वाजी, ।
ज्यासमोर रिपुचे शत वाजी. ॥

साजताति पर ते हुमियांचे, ।
देखतां बळ गळे भुमिं यांचें. ॥ २९५ ॥

( भुजंगप्रयात )

महा साजिरा अश्व तो राजयाचा, ।
जगन्मंडळीं थोर, थोरा जयाचा. ॥
कसे नेत्र संतोषती सज्जनांचे, ।
असा अश्व तो हा, क्षितीं सज्ज नाचे. ॥२९६॥

अरब्बी, बदक्षान, ताजी, तुरकी, ।
रुमी, पर्वती, घुट्ट, कच्छी, इराखी, ॥
फिरंगी, तथा येंबिये दक्ष माहा, ।
असे राघवाचे घरीं अश्व पाहा. ॥२९७॥

( उपजाति )

सुरंग सारंग, सुभेद, नीळे, ।
जे पंजकल्याण, विशेष काळे,
जर्दे, बनोजी, अबलख्ख, तेजी, ।
नृपा घरीं ते बहुवेग वाजी. ॥२९८॥

( इंद्रवज्रा )

हस्ती पहा वर्षति फार दानीं, ।
जे चित्रिले चित्रविशारदांनीं, ॥
शोभा दिसे त्यांस बरी रदांनीं, ।
नेणों, मही व्यापित नीरदांनीं. ॥ २९९ ॥

( माल्यभारा )

तुळना न जरा सुखासना ही, ।
तरि याच्याच जरा सुखास नाहीं. ॥

वसते अभिराम वासनाही, ।
नृप देशांतक हीमवासनाहीं. ॥ ३०० ॥

( इंद्रवज्रा )

सर्वांत तो हा वर मानलाहे, ।
याकारणें हा वरमान लाहे. ॥
आणीक याची उपमा न लाहे, ।
आनंदशेजे सुख मान लाहे." ॥ ३०१ ॥
जयामुखें वर्णन पूर्ण झालें, ।
सभें विदेहें मग काय केलें ? ॥
बोलावुनी सेवकमल्ल वाडें, ।
कोदंड तें आणविलें निवाडें. ॥ ३०२ ॥

( उपजाति )

गळे जयांची बहुवस्त मस्ती, ।
लावोनि ऐसे. मदमस्त हस्ती; ॥
विदेह बोलोनि अलोभ वाचें ।
कोदंड ते आणविलें, भवाचें. ॥ ३०३ ॥
"स्वयंवराचा पण एकमानें, ।
आरोपितां जो गुण ये कमाने; ॥
स्वयंवरीं हे नवरी तयाला, ।
जो अन्यथा, हे न वरी तयाला. ॥

( स्वागता )

कार्मुका लवकरी उचलावे, ।
काय, येथुनि उठोनि चलावें. ॥
माळ घेउनि करीं नवरी ते, ।
जो पराङ्मुख, तया न वरीते " ॥ ३०४ ॥

स्थापिला पण असा जनकानें, ।
आयके मग सभाजन कानें; ॥
बोलती सभय सद्गद वाचा, ।
लागला ज्वलन कंप दवाचा. ॥ ३०५ ॥

( उपजाति )

सभेपुढें पर्वत काय आला ? ।
कीं, सर्प हा पर्वतकाय झाला. ॥
कीं, ही सभा शुद्ध सुधा, सुरा हे, ।
याचेपुढें जीवित काय राहे. ॥ ३०६ ॥
धनुष्यरूपें पृथु काळदंड ।
हा येइंजे काय महा प्रचंड ? ॥
कोंदडरूपें वरविघ्न आलें, ।
स्वयंवरीं अर्गळरूप झालें. ॥ ३०७ ॥

( इंद्रवज्रा )

कीं, आमुचें थोर अभाग्य, हो, तें; ।
सीते वराया मग आड होतें. ॥
कीं, हा महामृत्यु असेल साचा ।
याचेंपुढें सर्वहि काय वांचा ? ॥ ३०८ ॥

( उपजाति )

सीता म्हणे ते विजयेस, " पाहीं,
" रामा वराया मज आस नाहीं. ॥
अदृष्ट हें कोण असें उदलें ? ।
धनुष्य सर्पाकृति आड ठेलें. ॥ ३०९ ॥

( स्वागता )

गोष्टि फार मजशीं न करा, हो ! ।
प्राप्त आजि मज कार्मुक राहो. ॥

आठवा धनुबृहस्पति आला, ।
वक्र केतुधनु तो मज झाला. ॥३१०॥

( इंद्रवज्रा )

मातें, सये, कार्मुकमंगळानें, ।
वेडाविलें फार, अमंगळानें. ॥
किंवा, असे हा शनि काय भोगी, ।
कोंदडरूपे वरविघ्नयोगी. ॥३११॥

( उपजाति )

कोंदंड केतुग्रहमान लाहे, ।
पीडा करी तो ग्रहणा मला हे. ॥
विचित्रता साच धनुग्रहाची, ।
नको मती सैंवर आग्रहाची. ॥ ३१२ ॥

( इंद्रवज्रा )

हा भार कैसा सकुमार साहे ! ।
याहो महादेव ! कुमार ! साहे. ॥
पावेल माझी जननी रसा हे, ।
कां होय कन्याजन नीरसा हे ? ॥ ३१३ ॥

( उपजाति )

लंबोदरा ! पूजिन सिंदुरानें, ।
लाडू तुला वाहिन आदरानें. ॥
विघ्नासी लावोनि अनेक रानें, ।
धनुष्य याला उचलो करानें. ॥ ३१४॥
तूं सर्व लोकां जनके, तुकाई, ।
द्वारीं उदेला धनुकेतु काई ! ॥

यावें तुवां सत्वर सैंवरासी, ।
धनुष्य होवो हलु या वरासी. ॥३१५॥

( स्वागता )

शंकरा नवसिते नवसातें, ।
मेहुणें करिन मी नव सातें.
प्रार्थिते स्वजननी जगतीला, ।
वंदिती सकळही जग तीला. ॥ ३१६ ॥

( इंद्रवज्रा )

धांवोनि पावा मज, आसरां हो, ।
माझे वराची झणिं आस राहो. ॥
दुर्गे! मला दुर्गम फार वाटे, ।
लावीं धनुष्या हलुवार वाटे. ॥ ३१७ ॥

( उपजाति )

घ्यावा तुह्मीं सर्वहि भार याचा, ।
रामासि द्यावा सह सारयाचा. ॥
कोदंड उत्तुंग, अभंग, भंगो, ।
सुरंग हा सैंवररंग रंगो. ॥ ३१८ ॥

( द्रुतविलंबित )

वर वरी जरि हा मजला भला, ।
सुकृतराशिं पहा मज लाभला. ॥
धनुस हा चढवि तरि जीन मी, ।
न चढवि, तरि जीव त्यजीन मी. ॥ ३१९ ॥
कमठपृष्ठकठोर धनुर्महा, ।
मदनसुंदर तो रघुराम हा. ॥

लघु कसा धनु लाविल, पां, गुणीं. ।
अहह्हा! पण दारुण, साजणी!" ॥ ३२० ॥

"लघुहि केसरि तो करि मारितो, ।
लघुहि वन्हि महावन जाळितो; ॥
लघु अगस्तिहि नीरधि आचमी, ।
लघुहि वामन सर्वजगा क्रमी. ॥

लघुहि चित्त चमत्कृति दाखवी, ।
लघुहि दीप तमासहि घालवी, ।
लघुहि कामदुघा स्वसुखी करी, ।
लघुहि राम तसा धनु सांवरी. ॥ ३२२ ॥

( उपजाति )

सोडोनि देई धडका भयाचा, ।
सीते ! तुला होईल लाभ याचा. ॥
सुवर्णमुद्रेवरि नीळ जोडा, ।
साजेल तैसा उभयांस जोडा." ॥ ३२३ ॥

त्यानंतरें रावण उग्रवेशी, ।
आला धडाडा समयीं सभेसी.
देखोनि त्याला सकलां जनांला, ।
महाभयें कंप विशेष जाला. ॥ ३२४ ॥

( द्रुतविलंबित )

थरथरां नृपती किति कांपती, ।
खटखटां मग दंतहि वाजती. ॥
म्हणती पूर्वभयें फुटलों उरीं, ।
सबळ हे तंव धोंडि बसे शिरीं. ॥ ३२५ ॥

( उपजाति )

कोणी वदे, सत्य म्हणे तिजा, रे, ।
" आह्मासि येतें बहुसाल शारें, ॥
त्याची असे आजिच झाकपाळी; " ।
म्हणोनि बांधे पटका कपाळीं. ॥ ३२६ ॥

( इंद्रवज्रा )

कोणा मनीं विंशतिनेत्रशंका, ।
वस्त्रांत येते मग मूत्रशंका. ॥
" आह्मांसि पाहा अति शैत्य झालें, ।
याकारणें वस्त्र भिजोनि गेलें. " ॥ ३२७ ॥

" दोघी स्त्रियांच्या बहुसाळ संगें, ।
मी फार कामी रतिरंग रंगें. ॥
याकारणें हें दुरुनीच पाहे, ।
नाहीं तरी हें धनु काय आहे ! ॥ ३२८ ॥

( उपजाति )

धनुष्य आर्धीं धरितां मरावें, ।
सीतेसि कोणें, मग, हो वरावें ? ॥
पोटांत झाला बहु शूळ, पाहा, ।
धांवोनियां साधक वैद्य बाहा. ॥ ३२९ ॥

( इंद्रवज्रा )

हा घेतलासे तरि पंचभूतीं, ।
पंचाक्षरी कोण करी विभूती ? ॥
ह्मैसासुराचा अनुभाव लक्षा, ।
याला करावी तरि रामरक्षा. " ॥ ३३० ॥

( शार्दूलविक्रीडित )

“ बिंदूचे परि सिंधु मानित असें, पृथ्वीस बांधों पुडीं, ।
मेरू सर्षपतुल्य भासत असे, आभास घालीं घडी, ॥
दिक्‌चक्रें घटिकेंत आक्रमितसे, वायूस मुष्टीं धरीं, ।
कैलासापुरि कंदुकापरि करीं, देवांसि बांधीं घरीं. ॥३३१॥

पुष्पें आणित इंद्र, चंद्ररविला दीपप्रचर्या घडे, ।
ब्रह्मा वेद पढे, जळाधिप जळें आणोनि घाली सडे, ॥
वारा झाडितसे स्वयें, पचन तें वैश्वानराला पडे, ।
द्वारा पाळित काळ, रांडसटवी ते बंदखानीं रडे. ॥३३२॥

विघ्नें वारितसें गणेश, नगरीं विष्णू, समुद्रांतरीं, ।
शेषाचा मणि मंडपास निरुता, ईशान वेत्रा धरी, ॥
इंद्राणीप्रमुखा करीति सदनीं, योषांस वेणीफणी, ।
हें तों कांबिट केवढें मजपुढें, कैसें चढेना गुणीं ? ॥

आकाशास महीतळीं धरिन मी, पृथ्वी नभोमंडळीं, ॥
मृत्यूची मुरडीन थोर नरडी, घालीन पायांतळीं; ॥
कूर्माचे कवठीस काढुनि, दिवा लावीन त्या भीतरीं. ।
तारांमौक्तिक वोढुनी, मग तुरा खोवीन वेगें शिरीं. ॥३३४॥

ब्रह्मांडासि करीन दोन शकलें, भेदोनियां मी नखीं; ।
काढीं दिग्गजकातडीं उचटुनी, लावीन त्यांचे मुखीं; ॥
काळाचे भुजदंड ते कुडपुनी, वाजे दमामा झणीं; ।
आतां कांबिट रोकडें धडफुडें, मोडीन येक्या क्षणीं.” ॥३३५॥

( इंद्रवज्रा )

तों लक्ष्मणाला अति कोप आला, ।
म्हणे, “ पहा, हा बरळों निघाला; ॥

वेगीं, प्रचंडें निज बाहुदंडें, ।
फोडीन याची दश मुख्य तुंडें; ॥ ३३६ ॥

( उपजाति )

संदेह येथें मजला न वाटे, ।
यालागिं आले भुलवीन वाटे. " ॥
मुनी म्हणे त्यासि, " उगाच राहें ।
होणार तें यास पुढेंच आहे. " ॥ ३३७ ॥

( इंद्रवज्रा )

कोदंड, पाहा, मग रावणानें, ।
जावोनि हेळें धरिलें करानें. ॥
प्रचंड कोदंड तया न तोले, ।
सीता सखीलागुनि काय बोले. ॥ ३६८ ॥
" होईल माझी जननी धरा हे, ।
ईचे मनीं पूर्विल बोध राहे; ॥
शरासना योजिल भंगकाळा, ।
कोदंड याला नुचलो खळाला. ॥ ३३९ ॥

( उपजाति )

कृपा करावी मज शंकरानें, ।
कोदंड याला नुचलो करानें. ॥
दाहा शिरें वीस भुजा विपारें, ।
कोणे, ग, वेगें फळ भावि पारे. " ॥ ३४० ॥

( इंद्रवज्रा )

तों रावणें सज्जित देह ठेलें, ।
कोदंड झेली मग तें हटेलें. ॥

दोर्दंड चोळी, निज केश सोडी; ।
आचाट मांडीवरि ठोक फोडी. ॥ ३४१ ॥
मांडी खुटी येउनि तोलिताहे, ।
तथा न तोले, उर योजिताहे; ॥
तों कर्करा वाजति दंतदाढा, ।
कुंथोनिया तो उभवीत मेढा. ॥ ३४२ ॥

( द्रुतविलंबित )

उलथला पृथु मेरु जसा दिसे, ।
उपरि तो परतोन उरीं बसे. ॥
अवनि राक्षसपाठिसि घांसते, ।
अधर भोंकर भोंकहि वासतें. ॥ ३४३ ॥
गरगरा नयना फिरवीतसे, ।
करकरा रदनासहि खातसे, ॥
भडभडां मुखिं रक्तहि वाहतें, ।
विफळ तें फळ, तें तरि लाहते. ॥ ३४४ ॥

( मालिनी )

सुरवर बहु तूंवा दंडिले ब्रह्म-अंडीं, ।
वदासि बहुत तुंडीं, वीरुदें लक्षखंडी, ॥
अवचित मुरकुंडी, घातली भूमिखंडीं ।
पडसि उघडगंडी, फट्ट नामर्द लंडी. ॥ ३४५ ॥

( मदिरा )

देव न मानित, वानित आपण, हा बहु बोलहि बोलत होता, ।
फार सफेरत कुक्करु जे परि, पिंजरियांतिल सुंदर तोता; ॥
धांवत येत तयासि बसे नरडीस, जसे परि मांजर बोका, ।
धोंड तयावरि आलि उरावरि, या अधमा भलतें तरि हो का. ॥३४६॥

कस्त करी बहु, हस्तक चोळित, मस्तक डोलित हें पडलेसें, ।
रक्त मुखीं बहु वाहत, पाहत कार्मुक, तें हृदयीं जडलेसें; ॥
पादत, पादत, कुंथत कुंथत काढितसे, परि तेंचि निघेना, ।
हस्ति जसा अंति मस्तमदें, तरि काय महाबळि कार्मुक घेना ? ॥३४७॥

( वसंततिलका )

जें खादलें सरस फार हरामसंगें, ।
तें आजि हें निचरतें धनुषप्रसंगें; ॥
जो सर्व लोक पर दुःखि करीत आला, ।
त्याचाच हा तरि पहा परिपाक झाला. ॥ ३४८ ॥

( स्वागता )

ग्लांति तो करित मानवलोका, ।
हे व्यवस्थित तुह्मीं अवलोका. ॥
जो धनुष्य उचलील उरींचें, ।
राज्य तो करिल हेमपुरीचें. ॥ ३४९ ॥
पाहतां बहुत काय तमासा, ।
पीडितो बहु जसा धृतमासा. ॥
नेणतां उचलिलें चपळानें, ।
प्राण घे धनुष हेंच पळानें. ॥ ३५० ॥
थोर यासि बहु मारिग पाहा, ।
मारितो बहुत फार गपा हा. ॥
भार हा उरिंहुनी उचलावा, ।
दुष्ट हा तरिं करीं कुचलावा. ॥ ३५१ ॥

( वसंततिलका )

" भारेंकरोनि मरतो परतोनि पाहा, ।
झाला मदीय वदनें रुधिरोक दाहा. ॥

आली पहाल वसनीं मजलागिं शंका, ।
राखा चुडे सदनिंचे, निजधर्म शंका. ॥ ३५२ ॥

( द्रुतविलंबित )

सकळही दळभार मिळोनियां, ।
बसतसां उगलेच कळोनियां. ॥
हळुहळू सुढळा धनु येकदां, ।
शफत हा सदनासि नये कदां. ॥ ३५३ ॥

( स्वागता )

लावुनी सकळही नृप हातां, ।
प्राण जात तरि काय पाहतां ?॥
येकदां तरि तुम्हीं यश घ्यावें, ।
प्राणदान मजलागुनि द्यावें. ॥ ३५४ ॥
मीं करी बहुत आरव धांवा, ।
पुण्य फार, बहुभार वधावा. ॥
सर्वही मिळुनि मानव धांवा, ।
कां उगा द्विज सुजाति वधावा ? ॥ ३५५ ॥
कोणिही निज बळासि करावें, ।
यास तोलुनि वधूस वरावें. ॥
भाषितें कितिक सार वदावीं, ।
मी कदा परि मुखासि न दावी. " ॥ ३५६ ॥

( उपजाति )

विदेह पाही मग राजरेखे, ।
परंतु कोणी उठतां न देखें. ॥
बोले उभारून करांस राजा, ।
उठोनि मार्गेच सरा सरा जा. ॥ ३५७ ॥

( इंद्रवज्रा )

विदेह राजा मग काय बोले, ।
' कोदंड हें तों कवणा न तोले, ॥
सर्वांसही साच कुनाम आलें, ।
निर्वीरमुर्वीतल काय झाले ?' ॥ ३५८ ॥

( उपजाति )

ऐसी नृपांला नृप देत आज्ञा, ।
रामाकडे तों मुनिनेत्रसंज्ञा ॥
होतांच, तो उठे स्वभावें, ।
गजावरि सिंह जसा विभावे. ॥ ३५९ ॥

( मालिनी )

सकल अवनिदेवां वंदिलें सुंदरानें, ।
तदनु शिवाशिवेतें चिंतिलें आदरानें, ॥
दशशतकिरणाला नम्र झाला तथा कीं, ।
निजचरणनखानें कार्मुका दूर टाकी. ॥ ३६० ॥
मग नमुनि तयातें आदरें राघवानें, ।
उचलुनि चढवीलें, चित्तिच्या लाघवानें, ॥
श्रवण--अवधि हस्तें काढिल्या तीन बोढी, ।
कडकडकड मोडी, ती स्थळीं ख्याति गाढी ॥३६१॥

( स्रग्धरा )

त्या शब्दें भूमि फाटे, गगन तटतटें, सिंधुचें तोय आटे, ।
वैराटा कंप वाटे, सुरकरटि वटे, देव देती कपाटें, ॥
ब्रह्मांडीं कीर्ति थाटे, कमठपुट फुटे, येति शेषासि कांटे, ।
सीतेला सौख्य वाटे, दशमुख निसटे, रामसाम्राज्य थाटे.॥३६२॥

( उपजाति )

विदेह बोले मग भारतीतें, ।
'घेऊनि यावें गज आरतीतें'॥
द्वारास येती मग राजदारा, ।
अतिक्यसा होय वरा उदारा. ॥ ३६३ ॥

( स्वागता )

येतसे मग पहा बरवंटी, ।
शोभते अति पहा परवंटी, ॥
फार चारुतर कंबुककंठी, ।
माळ घालित रघूत्तमकंठीं. ॥ ३६४ ॥

( उपजाति )

सामर्थ्य याच्या बळवैभवाचें, ।
कोदंड येणें शमिलें भवाचें; ॥
अदृष्ट मोठें, यश यावयाचें, ।
शूरत्व पाहा पण या वयाचें. ॥ ३६५ ॥

( मकरकशीर्षा )

जयजयरामा, जगदभिरामा, ।
दुरितविरामा, पणजितरामा, ॥
सुफलितनामा, मुनिकृतकामा, ।
हनहतलामा, अगणितधामा; ॥ ३६६ ॥
अविदितसारा, गळगतहारा, ।
क्षितिहृतभारा, नृपअवतारा, ॥
सुलिलतगात्रा, विमलितनेत्रा, ।
दशरथपुत्रा, कुसुमविचित्रा; ॥ ३६७ ॥

सुललितचरणा, जगदघहरणा, ।
मुनिजनशरणा, जनसुखकरणा, ॥
झळकतरदना, मिरवितवदना, ।
निजसुखसदना, कृतरिपुकदना; ॥ ३६७ ॥
दुर्जनकाळा, सज्जनपाळा, ।
भूपतिबाळा, बहुवेल्हाळा, ॥
निश्चललीळा, भाविकशीळा, ।
वारिदनीळा, नवभूपाळा; ॥३६९॥
वारिजनेत्रा, सुंदरगात्रा, ।
वैभवचित्रा, सुरसत्पात्रा, ॥
भूपतिपुत्रा, नित्यपवित्रा, ।
आगमसूत्रा, भवसन्मित्रा. ॥ ३७० ॥

( द्रुतविलंबित )

दशरथा लिहितो नृप पत्रिका, ।
' करि धरा मजलागिं, करा कृपा, ॥
सपरिवारक सर्व सवें नृपा, ॥
अति सुशोभित मंगळ मंडपा. ' ॥ ३७१ ॥

( मालिनी )

दशरथ मग आला तो पहा राजभारीं, ।
मिळति सुत तयाचे, सर्वही कारभारी, ॥
करिति परम शोभा आयती आयतीला, ।
घडवित बहु सोनें भूषणें राय तीला. ॥ ३७२ ॥

( शार्दूलविक्रीडित )

विघ्नाधीश गणेश पूजुनि, करी भूपाळ वाङ्निश्चया, ।
मन्त्र युक्तवधूस वाहत असे, वस्त्रें, नग, स्वश्रिया; ॥

रामाला विभवें, विदेह जनकें, शेला मुदी वाहिली, ।
त्याची मूर्ति बरी धरोनि हृदयीं, सर्वांतरीं पाहिली. ॥ ३७३॥
जोशी पंचकशुद्धलग्नविषयीं केली असे पत्रिका, ।
देती त्यास समानमान वसनें, सद्भूषणें, मुद्रिका; ॥
वाद्यें होत, वधूवरांस समईं लागे हरिद्रा पहा, ।
नाना मंडपवेदिका, करिति ते देवप्रतिष्ठा महा. ॥ ३७४ ॥
देशाचार, कुलप्रचार, नगराचारास ते मानिती, ।
नानाशास्त्रविचारपारग सदाचारासही जाणती; ॥
लग्ना ही रविमंडळार्धसमयीं, वेळा बरी साधिली, ।
पात्रीं निर्मळ नीर तें भरुनियां, जोशीं घडी घातली. ॥३७५॥
आधीं लक्षणदक्ष लक्ष्मण वराधावा बरा येतसे, ।
पूजा चंदनवस्त्रभूषणगणीं, माहा बरी होतसे. ॥
मूळीं मूळसवें महारुखवतें आलीं, वराकारणें, ।
सर्वांच्या नयनांस देखत पदें, होतें बरें पारणें. ॥ ३७६ ॥
पूर्वी पूर्वपुरोहितासि पुजिलें, त्यानंतरें त्या वरा, ।
वस्त्रें, भूषणपुष्पहाररचना केली असे सत्वरा; ॥
बैसोनी शिबिकें तया रघुपती, वाद्यें पुढें वाजती, ।
मागें अक्षत टाकिती, गजगती त्या कामिनी साजती. ॥३७७॥
वाद्यें वाजति, साजती नर, तथा नारी महासुंदरी, ।
भारी त्या विदरी करीत, अमरीं, नागांगना, किन्नरी; ॥
कोणी त्या गजगामिनी, सुजघनी आणीक कुंभस्तनी, ।
कोणी त्या मृगलोचनी, सुवदनी कोणी मरालस्वनी. ॥ ३७८ ॥
कोणी चारुतराधरामृतधरा कोणीं उरूपीवरा, ।
कोणी रम्यकरा, स्वभावचतुरा आणीक सूक्ष्मोदरा; ॥
कोणी पद्मिनि, रम्यचंद्रवदनी, कोणी असे चित्रिणी, ।
कोणी आणिक शंखिणी, निजगुणीं, कोणी असे हस्तिणी. ॥३७९॥

जे अंगीं अतिकोमला, कृशतनू, हंसस्वरा सुंदरी, ।
जीचें वीर्य सुगंध, हंसगति जे, जे देवपूजा करी, ॥
कामागार सरोजकेशरमणी, जे श्रोणि पीनस्तनी, ।
सुग्रीवा, मृगलोचनी, सुवदनी, ते जाणिजे पद्मिनी. ॥ ३८० ॥
जीचे श्यामल केश कोमल पहा, जे कंबुकंठी असे, ।
संभोगी रुचि अल्प जीस, बहुशी भोगोपभोगीं नसे, ॥
कामागार सलोम वर्तुळ, सदा बोले सुवृत्तस्तनी, ।
पीतांगी, मृदु जे सुवृत्तनयनी, ते जाणिजे चित्रिणी. ॥ ३८१ ॥
संभोगीं करजक्षतें करितसे, जे क्षारगंधी द्रवे, ।
आरक्ता वसनासि वांछित असे, संभोग इच्छी नवे, ॥
मध्यस्थूळ, करांघ्रि आयत, दया नाहीं, महा कोपिनी, ।
पाहे वक्र, वदे कठोर वचनीं, ते जाणिजे शंखिणी. ॥ ३८२ ॥
ओष्ठीं स्थूल असे, मदें द्रवतसे, अम्लें बहू खातसे, ।
चित्तीं भूतदया नसे, ढळतसे, पिंगत्व केशीं वसे, ॥
बोले सद्गदसे, रतीं म्हणतसे हे स्वल्प वाटे मनीं, ।
ग्रीवाखर्व, कुवृत्त, मंदगमनी ते जाणिजे हस्तिनी. ॥ ३८३ ॥
ऐशावीधि, पथीं महोत्सव गती, ऐकोनि वाद्यश्रुती, ।
पाहाया नवरा, त्वरें नगरिच्या त्या कामिनी धांवती. ॥
कोणी एक घरांत भुक्तिकरितां तैशीच ते जातसे, ।
तीतें देखुनि सर्व लोक म्हणती उष्टी, पहा येतसे. ॥ ३८४ ॥
वेणी घालित घालितांचि तरुणी पाहावया धांवल्या, ।
दोघी त्या उठतां भुलोनि बुचड्यां येकेस्थळीं बांधिल्या, ॥
अभ्यंगाकरितां त्वरीत मग पैं तैशीच ते धांवते, ।
घेऊनी लुगडें, निजांग उघडे, तैशीच गुंडाळिते. ॥ ३८५ ॥
संभोगाकरितां प्रियास म्हणते, 'वेगीं उठा वाजतें, ।
जाते दूरि,' तियेप्रति प्रिय म्हणे, 'गेलें नसे दूरि तें.' ॥

तों तीनें ढकलोनि त्यास दिधले, धांवें करीं सोवळें, ।
तीमागें पति धांवतो म्हणतसे, 'वेडें कसें लागलें.' ॥ ३८६ ॥
नेत्रीं अंजन घालितां सळइनें, कानीं सळे घातली, ।
हस्तानें मग तो धरोनि नवरा देखोनि, भांबावली. ॥
कोणी एक विड्यांस घेत असतां, नाकीं विडी घातली, ।
गेले दूरि म्हणोनियां, स्वनयनीं पाहावया धांवली. ॥ ३८७ ॥
कोणी येकिस धांवतां, लगबगे नीरी पुढें फीटली, ।
हस्तानें लुगडे धरोनि पुढती, तैशीच ते धांवली. ॥
वाद्यें वाजत लेंकुरास भुलली, श्वाना कडे घेतसे, ।
केकेतें उगला, म्हणोनि वनिता स्तन्यासही देतसे. ॥ ३८८ ॥
बाळाला स्तनपान देत असतां, तैशीच ते धांवते, ।
पान्हा फार पयोधरीं, पयभरें मार्गास ते सिंचते. ॥
भाळीं कुंकम रेखितां, गलबला ऐकोनि भांबावली, ।
नाकीं घासित कुंकुमा, लगबगें वेगें वधू धांवली. ॥ ३८९ ॥
ऐशा धांवुनि पाहती रघुविरा, येवोनि त्या बोलती, ।
जोडा येक वधूवरास दिसतो, हे ईश्वराची गती. ॥
जेथें रूप वरास भासत असे, तेथें वधूला नसे, ।
जेथें सुंदर कामिनी, नर पहा तेथें कुरूपी वसे. ॥ ३९० ॥
ऐसें फार महोत्सवें वर नृपद्वारास तो पावला, ।
वेगें घे दहिभात राजवनितां, येवोनि ओवाळिला. ॥
आले सर्वहि वाडियांत नृपती, स्थानीं यथा बैसती, ।
पानें पुष्पफळा, विशेष विमला, आणूनियां ठेविती. ॥ ३९१ ॥
नारेळे, फणसे, बिही, अननसे, पूगीफळें सुंदरें, ।
केळें, आम्रफळें रसाळ बहुळे ते, खारिका, खोबरें, ॥
जंबीरें, बदरें, तुरंज, मधुरें द्राक्षें, तथा जांभळें, ।
तूतें, नाबद शर्करा, कमरखें, सीताफळें निर्मळें. ॥ ३९२ ॥

अंजीरें, बहुबुध्धुरें, सुमधुरें कालिंगडे, फालसे, ।
नारंगें अतिरंगिते, खिरणिया संपूर्ण झाल्या रसें. ॥
दाळिंबें पिकलीं बरीं, खिसमिसें, पेरू, कसीं सेउपें, ।
बादामें, बहुखर्बुजें लसलसी, ते आणियेलीं नृपें. ॥ ३९३ ॥
कैसें केतकपत्र सुंदर फरा, शोभा मुदे, राखडी, ।
मासा, कासव, मोर, बोर, कुहिरी जे त्रिस्थळीं वांकुडी. ॥
रावा, ताइत, नागबंद, विलसे पुष्पावरी आरसी, ।
पाहा दाळिम, आवळा परि, नटे चांपेकळी फारशी ॥३९४॥
शोभे भोंकर, फार सालफळ तें, गोंडे, झबी, आवळे, ।
नाडे रंगीत फारसे विलसती, वेणी जिहीं आवळे. ॥
शीर्षीचें फुल, हांसळ्या झळकती, पानें, पट्या त्या पहा, ।
शोभे भांगटिळा, नसे मग तुळा, त्या चंद्रहंसा पहा. ॥३९५॥
नाकीं बेसर, आणि मौक्तिक, फुली, मोती, नथें चांगलें, ।
कर्णीचे नग आयका, बुगडिया, पंखे, फुलें, तोंगलें, ॥
ताटंके, जडिते, सकाप घडितें, नागोत्तरें, बाळिका, ।
पानाच्यासह घोंस, मौक्तिक कृता कोथिंबिऱ्या आणिका.॥३९६॥
थोरा भोवरिया, घडूनि जडितें ते कुंडलें शोभती, ।
कंठीचें नग आयका वदतसें, जे बायकां साजती. ॥
आधीं टीकमणी सवें, गळसरी, येकावळी साजिरी, ।
नाहीं जीस सरी, सरी मुरडिवा, साधी सरी दूसरी. ॥ ३९७ ॥
मोत्यांचे सर थोर थोर दुलडी, चित्ताक शोभे महा, ।
पेटी, ताईत साखळी, धुकधुकी, ते एकदाणे महा, ।
मोठी मोहनमाळ, माळ पुतळी, निंबोळियांची असे, ।
माळा आणिक रम्य रत्नरचिता, चांपेकळ्यांची वसे. ॥ ३९८ ॥
कैसा अंबरसा, पहा हयकला, त्या चीचपेट्या, टिका, ।
शोभे सुंदर काररयास, पदकीं हीरा झळाळे निका; ॥

मुक्ताजाळ विशाळ शोभत असे, तो हार, हंबीरही, ।
कैसें तें कटिसूत्र, किंकिणिगणीं अत्यंत गर्जेतही; ॥३९९॥
बाजूबंदही रुंद सुंदर, कशा त्या तोळबंद्या पहा, ।
वाकी, कंकण, आवळे, सरचुडे, वाळे निराळे महा; ॥
दोरे, पाटलिया, जवे, अतितेज त्या कंकण्या, पोहची, ॥
हीरे, जेहेगीर, दशांगुळे, सिका, त्या मुद्रिकाला रुचि. ॥
शोभे फारसी आरसी, घडविले नानाप्रकारीं सळे, ॥४००॥
पायाचे नग आयका, दशरथें सीतेसि जे आणिले. ॥
वाकी, पैंजण, घागऱ्या, घुळघुळा, जोडी, कडी, साजती, ।
साजे जेहर, सुंदरा गुजरिया, वाळे पहा वाजती ॥ ४०१ ॥
रत्नें जोडविली महा, अनवटी, ते जोडवी साजिरी, ।
पोल्हारेहि, इरोलिया, दिसतसे घोट्यास शोभा बरी. ॥
नाना वस्त्र जरी, विशाळ घडिया साड्या अनेकांपरी, ।
नाना कंचुकिका, अचाट तगटी, त्या चादराही जरी, ॥ ४०२ ॥
गृहांतोन पुरोहितें निजहतें, सीते पहा आणिलें. ।
चौरंगावरी बैसवोन तिजशीं पूजेस आरंभिलें; ॥
तों तेथें द्विज फार भांडति अती, आधीं गणेश स्थिती ।
कोणी ते म्हणती महा कळस जो, आधी तयाची गती. ॥४०३॥
एकामेक अती सरोष नयनें गालिप्रदानें किती, ।
श्वासें उश्वसती, परस्पर महा वर्मेंही उच्चारिती, ॥
मूर्खांमाजि परस्परा लघुतरा गाधा हिच्या गाढवा ! ।
कोठें तू पढलास सांग मजला, शास्त्रार्थ हा तो नवा. ॥ ४०४ ॥
बोले आणिक बोल तेहि न कळे, तूं का उगा भुंकसी, ।
ओनामाहि न जाणसी तरि कसा एकाक्षरी बोधसी. ॥
खोटें हें अवघें, कसा वदसि तूं स्थूळास कां पाहसी, ।
मूर्खांमाजि कुजाति तूंच असती, मिथ्या नव्हे मानसी. ॥४०५॥

मूळाधार गणेश देव वरदा, आधार सर्वास हा, ।
यातें सांडुन थोर, पोर कळसा मांडीतसे हा पहा. ॥
पूर्वी पूज्य गणेश, होय कळसा पूजा तदा नंतरें, ।
* राजा तो क्षितिरक्षिता क्षितिसुरा दे दक्षिणा सत्वरें ॥४०६॥
श्रीरामा मधुपर्क आधि, जनकें पूजा तशी स्थापली, ।
आतां सावध चित्त लग्नघटिका जोशाप्रती स्थापली, ॥
आधि स्थापन बोहल्यावरि करी श्रीराम मंत्रोत्तरीं, ।
सीताराम उभी करी द्विज मधें त्या अंत्रपाटा धरी. ॥ ४०७ ॥
आली लग्नघडी तुम्ही हलपला सोडा, महा गल्बला, ।
जोशी मंगल बोलतो, निजघडीपाशीं असे येकला, ॥
चित्तीं एकच सावधान बसला, कैसा पहा निश्चळ. ।
साधो लग्नघडी तशी बहुबळें, कुर्यात्सदा मंगळं. ॥ ४०८ ॥
विघ्ना वारितसे, सुखी करितसे, विद्या सदा देतसे, ।
शुंडादंड विशेष चाळवितसे, जो दाखवी भावसे, ॥
शेंदूरानन तुंड ज्यास विलसे, मोरेश्वरीं जो वसे, ।
श्रीमन्मंगळमूर्ति तो बहुबळें, कुर्यात् सदा मंगळं. ॥ ४०९ ॥
सृष्टीचा रचिता, श्रुती पढियता, चारी मुखें बोलता, ।
ब्रह्मांडा जनिता, चराचर विता, सत्ता अशी स्थापिता, ॥
सर्वांही वरता, धरी अमरता, तो चिंतिजे तत्वता, ।
सावित्रीसहवर्तमान विधि तो, कुर्यात् सदा मंगळं. ॥ ४१० ॥

---

* येथें ' राजा तो ' या शब्दांपुढील शब्द ' महाराष्ट्र कवीं'त छापलेल्या प्रतींत संपादकांना लागलेला दिसत नाहीं. त्या ठिकाणीं त्यांनीं ‿‿‿‿ — असें त्या शब्दाचें स्वरूप दर्शविलें आहे. नागेशाचीं अनुप्रासाची आवड लक्षांत घेऊन मी येथें ' क्षितिरक्षिता ' असा शब्द सुचविला आहे. ( सं. )

भक्तालागिं कृपा करी नरहरी, जो दानवा संहरी ।
भारी वेश धरी, नृपालन करी, वेदास जो उद्धरी, ॥
ज्यासी कोण करी सरी, अमर तो भूभार जो आंवरी, ।
तो लक्ष्मीसहवर्तमान, सकळं कुर्यात् सदा मंगळं. ॥ ४११ ॥
कैलासीं वसतो, विभूति धारितो, दुष्टास संहारितो, ।
भोळा तो असुरासुरास स्फुरतो, जे मागती देत तो, ॥
रामाला स्मरतो, सदा रसिक तो, चित्तांत तो बैसतो, ।
तो गौरीसहवर्तमान, सकळं कुर्यात् सदा मंगळं. ॥ ४१२ ॥
लक्ष्मीमाधव चिंतिजे, परिसिजे चित्तैक्य कां होइजे, ।
वाजंत्री बहुसावधान, सुहृढा अंतर्पटा साधिजे. ॥
देवांला स्मरिजे, करा-कलश जो आधीं करीं घेइजे, ।
आतां सावध, सावधान इति ओं, कर्यात्सदा मंगळं. ॥ ४१३ ॥
पृथ्वीदानसमान पुण्य म्हणती, तें आजि होतें पहा, ।
कन्यादान करी विदेह विभवें, दे दक्षिणेतें महा. ॥
आव्याला पुजिलें, द्विजासि नमिलें, अग्नीस संतोषिलें, ।
नागेशें रचिलें, स्वयंवर भलें, विद्वज्जनां मानलें. ॥ ४१४ ॥

( भुजंगप्रयात )

गणेशासि आधीं नमस्कार केला ।
तया नंतरें प्रार्थिलें शारदेला, ॥
करा जोडुनी वंदितो सद्गुरूसी, ।
कवित्वास विस्तार व्हावा त्वरेसी. ॥ ४१५ ॥



# नागेशकविकृत

# सीतास्वयंवर

## टीपा.

**श्लोक १–३.** गजाननसरस्वतीस्तवन व वर्णन. सर्व विघ्नांचा परिहार होऊन ग्रंथरचना सिद्धीस जावी यासाठीं, इष्ट देवतेची स्तुति, करण्याचा कवींचा परिपाठ आहे. त्यांस अनुसरून नागेशानेंही विघ्नहर्त्या गजाननाचें स्तवन केलें आहे. पहिल्या श्लोकाच्या द्वितीयार्धात सरस्वतीचाही उल्लेख आहे.

### श्लोक १

**रसवती**—नवरसयुक्त, **सरस्वती**—वाणी.

### श्लोक २

**निधान**—भांडार, ठेवा. पहा–श्लोक २६, ३७. **नाचे**–हा शब्द यमकासाठीं कवीनें अनेकदा योजला आहे. पहा, श्लोक ८, १६, १८, २९६. **भारतीचे**—वाणीचे. पहा–'भारती बहुत यास्तव नाचे'–सामराज –रुक्मिणीहरण ४।११३. **मुखांबुजी**–अर्थात् कवीच्या मुखकमलांतून. **भार**–समूह.

### श्लोक ३

**रदानें**—दंतानें. गणपतीस एक दांत असल्यानें, एकाच दांताचा उल्लेख आहे. पहा–'एकदंताय विद्महे'। **दानें**–हत्तीच्या गंडस्थळांतून वाह-

णाऱ्या मदानें. **ओळ** ३. **वरदानें**—प्रसन्न होऊन दिलेल्या देणग्या. **ओळ** ४. **वरदानें**—वर देणाऱ्यानें.

### श्लोक ४

यांत तुकाईमाहात्म्य वर्णिलें आहे. **तुकाई**—देवी, पार्वती, तुळजापुरची अंबाबाई. (श्लोक ३१५.) पहा—'पुजिति जरि सुमनफळ जळसह तुकायी। निरंजनमाधव कवितासंग्रह, भाग १, भवान्यष्टक—श्लोक ४. **पाहील दृष्टीं जरि कासवाचीः**—कासवाची दृष्टि, ही दयादृष्टीची किंवा कृपादृष्टीची, निदर्शक आहे. कासवी आपल्या अपत्यांना केवळ आपल्या प्रेमदृष्टीनें वाढविते. त्यावरून कासवाच्या दृष्टीनें, पाहणें म्हणजे अत्यंत कृपादृष्टीनें पाहणें असा संकेत रूढ झाला, व तो मराठी कवींनीं अनेकदा आपल्या काव्यांत योजला आहे. पहाः—'सकलहि कुलदेवी येकदां ईस राखा। प्रतिदिन इस दृष्टीं कासवाचेच देखा॥'—सामराज, रुक्मिणीहरण २।८४. 'पाहे भक्तजना कृपार्द्रनयनें कूर्मी जसी बाळका'—निरंजनमाधव, सांबशिवस्तुतिध्यान श्लोक २०.

### श्लोक ५

रेणुकावंदन. **रेणुका**—जमदग्नी ऋषीची पत्नी, व परशुरामाची माता. या काव्यांत पुढें परशुरामावताराचा उल्लेख यावयाचा आहे, म्हणून कवीनें त्याच्या आईला वंदन करून, तशी आगाऊ सूचना देऊन ठेविली आहे. **ओळ** ३—परशुरामाला जन्म देऊन रेणुकेनें लोकांवर महदुपकार केला, असा अर्थ.

### श्लोक ६

सहा व सात या या श्लोकांत सद्गुरुवंदन केलें आहे. सातव्या श्लोकाच्या उत्तरार्धांत नागेशानें पूर्वकवींनाही वंदन केलें आहे. **ओळी** ३।४. सत्संगानें राघवाचा लाभ होतो, म्हणून त्यासाठीं संसारसेवन फार तर करावें.

## श्लोक ७

**भाविलासे**:—( भाविला + असें ) भावणें = चिंतणें.

## श्लोक ८

सज्जनांना वंदन. **सज्ज**–( सं. सज्जित ) सिद्ध, तयार. यमक साधण्यासाठीं, कवीचा हाही एक नित्याचा आवडता शब्द आहे. पहा, श्लोक ८१, २९६. **धूर्तमाची**–( येथें चुकीचा संधि केला आहे. ) अज्ञानाचें जोखड. **बेडी**–बंधन.

## श्लोक ९

कवी आतां स्ववाणीला वंदन करतो. **ओळ** ४. कवित्वावर धन मिळतें, पण तेंच संसारबंधनास कारण होतें. कवीची अध्यात्मिक वृत्ति येथें दृग्गोचर होते.

## श्लोक १०

धनार्जनासाठीं, आपल्या वाणीस आपण शिणविली, दुष्टांपुढें तिला नाचविली, याबद्दल कवीस खेद होतो. **संकष्टिलें**–श्रम दिले. **समावे**–समावेश कर, अंतर्भाव कर.

## श्लोक ११

११।१२ हे श्लोक जिव्हेला अनुलक्षून दिले आहेत. **दृश्यरस**–सर्व रसनिष्ट वस्तु. यांत चवीच्या षड्रसांचा, किंवा भावनेच्या नवरसांचा, समावेश होतो. **सींतराया**–( प्रा. ) झकविण्यासाठीं, फसविण्यासाठीं, यमलोक चुकविण्यासाठीं असा अर्थ. हा शब्द प्राचीन वाङ्मयांत पुष्कळ वेळां आला आहे. पहाः–'स्वप्न कां गा जिया परी । जागतयाते न सिंतरी' –ज्ञानदेवी अ. १४।३४२. 'दुर्वासा ऐसा जाण । त्यासि क्षणक्षणा सिंतरी मन'–एकनाथी भागवत ११।९८९. 'पूर्वजासि सिंतरिले। पक्ष श्राद्ध नाहीं केलें'–दासबोध द. ३ स. ३ ओ. ९.

## श्लोक १२

**तुझ्या**—तुझा. **निज पावें**—आत्मस्वरूप पाव. 'निज' हा शब्द १७व्या श्लोकांत आला आहे. **अयसेंची** ऐसेंची. पहा—श्लोक २०.

## श्लोक १३

१३–१६ हे श्लोक मनाला उद्देशून आहेत. **ओळ १. रामा**—सुंदर स्त्री. **ओळ २.** 'हेंच रामा मन दुःखासि द्यावें' असा अन्वय. हीच सुंदर स्त्री मन दुःखी करते, असा अर्थ. किंवा 'हें रामा ! हेंच. मन दुःखासि द्यावें.' मनानें दुख सहन करावें. **तमाची**—अज्ञानाची.

## श्लोक १४

**भुलि**—भूल. 'तुला मदानें भूल पडली आहे.' **ओळी** ३।४. धन हें संसारबंधनकारक आहे, तस्मात् धनाची हांव धरूं नको, असें कवि मनास संबोधितो.

## श्लोक १५

**तो रहिवास**—ती वसती. वासनेमुळें मनांतील रामाची वसती उठली, असा भाव.

## श्लोक १६

**पिसें**—वेड. **ओळ २.** अन्वय—'त्वां ( धन ) देखिल्या ( तुझा ) काय अगाध नाचें. अर्थ—तुला धनाचे असें वेड आहे कीं, धनाला पहातांच तुझें शरीर बेसुमार नाचूं लागतें. **ओळ ३।४.** येथील नाणें येथेंच चालेल, पण श्रीराम नाणें विभाकराला—सूर्यमंडलाला भेदून जाईल. रामनाम-जपानें अंतीं अर्चिरादि मार्ग प्राप्त होईल असा भाव.

## श्लोक १७

**ओळी** १।२. मी अगदीं पडलों आहे, हें जाणून तूं लवकर स्वछेनें धांवशील ( धांव). **निज**—आत्मस्वरूप. मागें श्लोक १२ पहा.

## श्लोक १८

**माला**—मावला. ज्याच्या दृष्टींत आत्मा सामावला आहे, ज्याची दृष्टि ब्रम्हमय झाली आहे, तो यमाला कधींही, भीत नाहीं. यमाच्या फेऱ्यांत किंवा चौऱ्यांशीच्या फेऱ्यांत न सांपडण्याबद्दल, कवीचा विशेष कटाक्ष आहे. पहा, श्लोक ११, १९, २८. **ओळ.** ३।४. ब्रम्हैक्य पावलेला मनुष्य कर्मांचें किंवा हठयोगांतील आसनांचें बंधन जाणत नसतो. तो निष्काम बुद्धीनें, ब्रह्मसंकीर्तनांत किंवा रामसंकीर्तनांत दंग असतो. येथें कवीनें निर्गुण व सगुणोपासनांची सांगड घातली आहे.

## श्लोक १९

नामसंकीर्तनांत टाळाटाळ करणाऱ्यास फळ काय तर यमलोक. **उटाळी**–तरफ, धक्का. यम त्याला तरफ देऊन उचलून टाकतो. पहा–'पद्यपंक्तिची तरफ आमुच्या करीं विधीनें दिली असे',—केशवसुत.

## श्लोक २०

**अइसेंचि**—ऐसेंचि. पहा श्लोक १२. **मोक्ष**—जन्ममरणाच्या फेऱ्यांतून आत्म्याची सुटका. पुरुषार्थांपैकीं चौथा.

## श्लोक २१

**ओळ** ३।४—हृदयाच्या पेटींत रामनाणें ठेवीन. हृदयांत सारखें रामाचें चिंतन करीन. **सपेटी**—पेटींत. मागील 'स' हें अक्षर पादपूरणार्थ किंवा यमकार्थ असावें.

## श्लोक २२

शंकर देखील रामाचा जप करतात. असा रामाचा महिमा! त्याच रामाचा जप कवि करीत आहे. **ओळ** ३–निशिदिन शितिकंठा हा जपाचाच धंदा,'–सामराज–रुक्मिणीहरण ३।७९ **ससार**–सत्वयुक्त, बलशाली.

## श्लोक २३

राम व सीता यांच्या वंशांचा उल्लेख करून, कवि विषयप्रवेश करीत

आहे. **तरणी**—सूर्य. **ओळ २.** जानकीचा जन्म भूमीपासून. पहा—' यज्ञासाठीं भूमी नांगरिली धन्या । सांपडली कन्या सीतादेवी ॥ '—सीतागीत, मोरोपंत. **ओळ ४.** अशा मोठ्या कुळांतील दंपतीचें वर्णन करतांना कवीला आपल्या हांतून तें कसें वठेल, अशी भीति वाटणें साहजिक आहे.

## श्लोक २४

**ओळ ३।४**—ज्या सीतेचें वर्णन करतांना जनकासारख्याची मति खुंटते, तेथें आपल्यासारख्या साध्या जोशाचा काय पाड, असा कवीचा आशय. कवि थोडा विनयी दिसतो. **सनक**—ब्रह्मदेवाच्या मानस पुत्रांपैकीं एक. सनक, सनंदन, सनत्सुजात व सनत्कुमार, असे ब्रम्हदेवाचे चौघे मानसपुत्र होत. **गणक**—ज्योतिषी—जोशी. नागेश वृत्तीनें जोशी होता, म्हणून त्यानें आपला तसा उल्लेख केला आहे.

## श्लोक २५

आतां सर्व कवित्व स्वतःचें नसून रामाच्या प्रेरणनें झालें आहे, असें कवि सांगत आहे. **लाघवाची मति**—सूक्ष्मबुद्धि. **ओळ ३**—कवीचें विनयशालित्व.

## श्लोक २६

**ओळ १. साहे**—साह्य. **ओळ २**—मी कर्ता, असा अहंभाव दाखविलेला, रामाला सहन होत नाहीं. म्हणून कवी अहंभाव टाकून, राम जशी प्रेरणा देईल, तसें वागत आहे. **ओळीं ३।४.** २५ व्या श्लोकाच्या प्रथमार्धाचाच अनुवाद येथें पुनः केला आहे.

## श्लोक २७

**हें काव्य**—प्रस्तुत सीतास्वयंवर काव्य. **वानी**—वर्णी. या काव्यांत रामकथेचेंच वर्णन असून, त्यांतही नागकवीचीच कीर्ति होणार आहे. **ओळी ३।४.** ( ही कथा ) सुवर्णाप्रमाणें तेजयुक्त असून, तिचें श्रवण कानांना भूषणप्रद आहे. **वोपा**—तेज. या पुढील श्लोकांत कवीचा आत्मविश्वास प्रगट झाला आहे.

## श्लोक २८

**यमकांनीं**—आपल्या यमकानुप्रासात्मक रचनेची कवीला मोठी महति वाटते, असें दिसतें. **ओळी. ३।४.** "आपली काव्यकृति सर्व पृथ्वीतळांवर एकटीच शोभायमान होणारी असून, महाकविश्रेष्ठ देखील तिला मानतात" असें कवि म्हणतो. हा कवीचा आत्मविश्वास कीं अहंभाव? पण रामाला अहंभाव सहन होत नाहीं, म्हणून कवीनें तो सोडला असावा.

## श्लोक २९

'स्वयंवरवर्णन करावें' अशी श्रीरामानेंच (कवीच्या) माझ्या मनांत स्वतःची इच्छा प्रकट केली. मला स्वतःला स्वयंवरवर्णन माहित नाहीं. मी फक्त तुला (रामाला) पूर्णपणें वर्णीन.

## श्लोक ३०

विवाहवर्णन करण्यास गणेश व सरस्वतीजवळ, पुनः बुद्धीची याचना कवीनें केली आहे. **वाहा**—वाह = गति, प्रवाह. **ओळी १।२.** जानकीच्या विवाहाचें वर्णन करण्यास हे लंबोदरा! ज्याप्रमाणें मति द्यावीस तद्वतच तिला गतीही द्यावीस.

## श्लोक ३१

**कविसुंदरानें**—नागेश आपणास कविसुंदर म्हणवीत आहे. **नवरसीं**—तसेंच आपल्या काव्यांत नवरस आले आहेत असा कवीचा अभिनिवेश दिसतो. पहाः—"शृंगारवीरकरुणरौद्रहास्यभयानकाः। बीभत्साद्भुतशांताश्च नव नाट्ये रसाः स्मृताः॥" **ओळी ३।४**—येथें परंपरितरूपक साधलें आहे. वाग्जाळरूपी समुद्राचे, बुद्धिरूपी मंदरानें मंथन करून जें वाक्यरूपी अमृत निघालें, तें इंद्रालाही दुर्लभ होय, अशी आपल्या काव्याची महती कवीनें गाइली आहे. कवीनें येथें अमृतमंथनाचें रूपक साधून योजकता व कल्पकता दाखविली आहे.

## श्लोक ३२

यापुढील सहा श्लोकांत, जनकराजाचें गुणवर्णन केलें आहे. **ब्रम्हीष्ठ** ब्रह्मनिष्ठ. **परिभावि**—लाजवी. **देही**—मनुष्य (याचक.) **देहीं वर्तून विदेही**—जीवन्मुक्त. ' मिथिलायां प्रदीप्तायां न मे किंचन दह्यते ' असें म्हणण्याइतकी, या राजाच्या मनाची तयारी होती.

## श्लोक ३३

**मोहरा**—मणि. **शत्रुमोहरा**—शत्रूच्या सैन्याची आघाडी. **ओळ ४. मोहरा**—सोन्याची नाणीं. ' मोहरा ' यावर श्लेष व यमक साधलें आहे.

## श्लोक ३४

**एकविरा**—रेणुकानामक देवी. ( हंसकोश ) पण ही महालक्ष्मी असावी. **ओळ** ४. कविश्रेष्ठ देखील ज्याचें वर्णन करतात.

## श्लोक ३५

**विभव**—वैभव. **कांचे**-काचणें = भिणें. पहा—' परि झाले हरिवारि करिवर जातां जेविं तेविं भट काचें ।'—मोरोपंत, कर्णपर्व ४३।६६.

**जनलाहे**—( जनला + आहे ) उत्पन्न झाला आहे. जनणें. ( जन्मणें ) पहा—श्लोक ४२.

## श्लोक ३६

**आसंगती**—(सं. आसंग) आसक्त होतात. पहा—' सशैवलासंगमपि प्रकाशते'--कुमारसंभव ५।९. 'त्यक्त्वा कर्मफलासंगम्'—गीता, ४।२०. **सांग**—अंगासहित. अंग = वैदिक वाङ्मयापैकीं, विशिष्ट ग्रंथसमूहास संज्ञा. उदा० शिक्षा, ज्योतिष, निरुक्त इ० **ओळ** ४. येथेंही कवीचें थोडें विनयदर्शन आहेच. एकंदरींत थोडा विनय थोडी बढाई, असा या कवीचा मामला आहे.

## श्लोक ३७

**कांचे**—कच्चें, अतएव हीन. **अवनिजा**—भूमीपासून जन्मलेली सीता, तिला.

## श्लोक ३८.

या श्लोकापासून पुढील सात श्लोकांत, नारद परशुरामाकडे जाऊन रामावताराची बातमी देतो, असें वर्णन आलें आहे. नारदाच्या नित्याच्या कळलाव्या स्वभावास, हें अनुसरूनच आहे. **परशराम विभू**—बलाढ्य परशुराम. **अवतार समापला**—राम जन्मताच तत्पूर्वींच्या परशरामाच्या अवताराचें कार्य संपलें. पण कोणत्याही गोष्टीचा शेवट झाला किंवा प्रस्थ कमी झालें, म्हणजे ‘ त्याचा अवतार संपला ’ अशी म्हण मराठींत रूढ आहे. नारदानें त्याच खोंचदार अर्थानें परशरामास ही गोष्ट कळविली आहे.

## श्लोक ३९

**ओळी १।२**—ज्या जागेवर किंवा हुद्द्यावर एकाद्याची नेमणूक झालेली असते, ती जागा किंवा हुद्दा गेल्यावर, तेथें रहाणें मोठें लाजिरवाणें होतें. आतां रामावतार झाल्यानें, परशरामाचें कार्य संपून त्याची उचल-बांगडी झाली. त्यानें शहाणपणानें आतां आपला गाशा गुंडाळावा, असा नारदाच्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे. **हुद्दा**—अधिकार.

## श्लोक ४०

**जया**—ज्या. **पंकराशी**—पापांचा ढीग. **ओळी १।२**—ज्या रामाच्या नामानें पापाचे डोंगर जळून खाक होतात, व ज्या रामाच्या जपानें मुक्ति सहजासहजीं हातास येते, तो राम ही एक प्रचंड शक्ति असून, ती मजजवळ आहे, असें नारद परशरामास सांगतो.

## श्लोक ४१

त्याच रामरूपीं शक्तीचें, पुढें वर्णन. **ओळी १।२**—ज्या शक्तीच्या अंगच्या बळानें अवतार होऊन, रणांगणांत बहु ( पुष्कळ लोक ) नवतार

( नवतर ) नवीन, ताजेतवाने होतात. किंवा 'बहु' हें विशेषण मानल्यास, नवतारा=नवीन आवेश असा अर्थ घ्यावा. 'रणांत पुष्कळ आवेश दृष्टीस पडतो,' असा दुसऱ्या ओळीचा अर्थ होईल. पहा— 'ज्यांच्या स्वनें सांडति शत्रु तारें' श्लोक १६९.

**शक्ति आद्या**—आदिशक्ति = माया. ( वेदांत. ) जिच्या योगानें हें असत्य जग सत्य भासतें, व जी परब्रह्माहून निराळी आहे. हिलाच सांख्यशास्त्रांत 'प्रकृति' म्हणतात. **ओळ** ४—या मायेचें स्वरूप एवढें मोठें आहे कीं, तें मावण्यास सर्व पृथ्वी अगदीं थोडी किंवा लहान वाटेल. परब्रह्म आपल्या मायेनें जगांत अवतार घेतें. रामाचा अवतार तसाच होय, म्हणून त्यास शक्ति म्हटलें आहे.

## श्लोक ४२

**जनकालयाला**—जनकराजाच्या घरीं. **जनली**—जन्मली. रामाचा अवतार राक्षसांच्या नाशार्थ होता. **ओळ** ३. **शक्ति**—देवी ( सीता ). सीता ज्याला स्वयंवरांत वरील, तो अवतारी पुरुषच असला पाहिजे, व त्याच वेळीं रामावतार झाल्याचें प्रथमतः जाहीर होईल.

## श्लोक ४३

'आपलें बोलणें खोटें वाटत, असल्यास जनकगृहीं जाऊन पहा' असें नारद परशरामास सांगतो. **भासत**—भाषित = बोलणें. **ओळी** ३।४—परशरामवर्णन. जो रेणुकेचा प्रख्यात पुत्र असून, ज्यानें रणांगणांत क्षत्रियांचा धुरळा उडविला.

## श्लोक ४४

**तो राम**—परशुराम. ज्याला सर्व जग, व प्रत्यक्ष कालही थरथर कांपतो. **कोदंडधरालयाचें**–जेथें कोदंड आहे अशा घराच्या दारीं परशुराम शिरला. अर्थात् हें हरकोदंड जनकाच्या घरीं असल्यामुळें, तेथें परशुराम गेला.

### श्लोक ४५

परशुराम आल्याची, प्रधान वर्दी देतो. **भार्गव**–परशुराम. **सहाजा**–सहज. **सांवरली**–पूर्वस्थितीवर आणली. २१ वेळां निःक्षत्रिय पृथ्वी करून, ती ज्यानें पूर्वस्थितीवर आणली.

### श्लोक ४६

परशुरामाचा पराक्रम, प्रधानानें आणखी वर्णन केला आहे. असा पराक्रमी परशराम आपल्या घरीं आला आहे, असें आपल्या मालकास सांगण्याचा प्रधानाचा उद्देश. **सहस्रबाहो**–सहस्रार्जुन. परशरामानें सहस्रार्जुनाचा वध केला होता. **निशाणें**–रणभेरी, डंका. (प्रा. निःसाण) पहा–" भेरी निसाण मांदळ। शंख काहाळा भोंगळ।"–ज्ञानदेवी १ १३२. " मेघडंबरें छत्रें चामरें। सूर्यपानें निशाणें अपारें।' दासबोध ४। ७।७. ' घाव घातला निशाणीं – रुक्मिणीस्वयंवर–एकनाथ ५।१९. **रामु**–परशराम. **अमोघ**–गुणदायी, फलदायक.

### श्लोक ४७

जनकाकडून परशरामाचें स्वागत. **वर्गवाचे**–आपल्या सेवक वर्गाच्या तोंडून. **विधिकृत्य**–यथाविधि. **आगम**–आगमन.

### श्लोक ४८

**वोजा**–सहज. **ओळी** ३।४. सीता जी कौतुकानें घरांतून बाहेर आली, ती शिवधनुष्याचा ' घोडा घोडा ' करीतच आली.

### श्लोक ४९

**दुर्घट**–सीतेचें कृत्य परशरामाला दुर्घट वाटलें, व आपला गर्व गळाल्याची त्यानें कबूली दिली.

### श्लोक ५०

**अखर्व**–मोठा. ' अखर्वेण गर्वेण विराजमानः ' या दशकुमारचारितांतल्या ओळीचा, तर आमचा कवि अनुवाद करीत नसेल ना ! **उगलाच**

## श्लोक ५१

—उगाच. पहा. ‘तथापि वोढी उगला निरी हा’—सामराज, रुक्मि. १।६८.

परशुराम सीतेची महती जनकास सांगतो. **ओळ ३**—इचे गुण इतके आहेत कीं, ते वेदांनाही कळत नाहींत. किंवा ‘वेदवेद्या’ असें घेतल्यास वेदविदांनाहीं हिचे गुण कळत नाहींत असा अर्थ होईल.

## श्लोक ५२

परशुरामच स्वयंवराचा पण, राजाला सुचवितो. **ओळ २.** जो मान्य पुरुष, धनुष्याची दोरी धनुष्याला चढवील, त्याला सीता सहज माळ घालील. जो तसें करणार नाहीं, त्याला सीता वरणार नाहीं. हाच पण. हा श्लोक पुनः ३०३ श्लोकानंतर आला आहे.

## श्लोक ५३

येथें परशुराम अप्रत्यक्षपणें, रामाचा उल्लेख करतो. ‘जो धनुष्याला दोरी चढवील तो परमपुरुष असें मान’. **त्याविणा**—त्या परमपुरुषाविना. ( रामाविना ).

## श्लोक ५४

परशुराम जनकाचें अभिनंदन करतो. **ओळ ३**—‘तुझ्या पुण्याचें फळ जो देवराय ( राम ) तो मी देखें. अशास ( रामाला ) नमन करून तूं कन्यका वरण्यास दे’ असा परशुरामाचा म्हणण्याचा भाव.

## श्लोक ५५

**मूळ करी**—आमंत्रण करी. पहा—‘त्वरित मुळचिठ्या त्या सोयऱ्यांला लिहील्या,’—सामराज,—रुक्मिणीहरण, ३।३३.

## श्लोक ५६

५६—५८ या श्लोकांत ज्या निरनिराळ्या, कुळांतल्या व देशाच्या क्षत्रिय राजांना आमंत्रणें पाठविलीं, त्यांची यादी दिली आहे. **कुलीनराशी**—कुलीन-

वंशी. **सौराष्ट्र**—काठेवाडचे. **चव्हाण**—सोमवंशी राजा चवाण, नगर मेवाड अवंतीपुरी, यांचे वंशज. **राणे** -सूर्यवंशी राजा सुधन्वा, नगर उदेपूर, या कुळांतले राजे. **सीसोदये**—तक्त गादी उदेपूर, भगवें सिंहासन, भगवें छत्र, भगवें निशाण, कुलदैवत महादेव या घराण्यांतील. भोसाजीपासूनच या कुळाला भोंसले हें नांव पडलें. **बागलाणे**—बागलाणदेशचे.

### श्लोक ५७

**तुंगार**—ब्रह्मवंशांतला सहावा जो धर्मराज नामक पुत्र, गोत्र अंगिरा, कुलदेवता महादेव, याच्या जातिभेदापैकीं एक कुळ. ( पहा क्षात्रवंश सागर पृ.५१) **शृंगार**—सेंगार रजपूत लोकांचे मुख्य वंश, म्हणजे ३६ जातकुळी ज्या आडनांवावरून चालतात त्यापैकीं एक. या लोकांविषयीं फारशी माहिती नाहीं. यमुनातीरीं जगमोहनपूर येथें हे राज्य करीत आहेत. ( क्षात्रवंश सागर पृ. १९ व ४१) **कुमार**—कुंवर, सूर्यवंशी राजा निकम, नगर कर्नाटक, हिरवें सिंहासन, हिरवें, छत्र, हिरवें निशाण, कुलदैवत जोगेश्वरी याच्या कुळांतील. ( मराठ्यांच्या ९६ कुळी पान १२. ) **मोरे**—चंद्रवंशांतील सोमशर्मा राजाचे पुत्र ६. त्यांतील दुसरा पुत्र मोरे, कुलदेवता गणपती, देश अवंती, नगर कांचन, हिरवें व लाल आभरण वस्त्र; घोडा निशाण, या कुळांतील राजे. मोरे हे प्रसिद्ध राजा चंद्रगुप्त व चितोडचे राणे याच शाखेंतले होत. शिवशाहींत चंद्रराव मोरे तर प्रसिद्धच आहेत. 'मौर्य' याचा हा अपभ्रंश आहे. **गोरे**—सूर्यवंशांतील सुमित्र नामक राजाचे जे सहा पुत्र, त्यांतील चवथा जो काळमुखी, त्याच्या वंशांतील राजे. यांचें गोत्र काश्यप व कुळदेवता प्रभाकर. **सराईत**—पटाईत. **तोरे**—अलीकडील मराठे मंडळींची प्रचारांत असलेलीं जीं आडनावें आहेत, त्यांत हें नांव दिलें आहे. ( पहा—क्षात्रवंशसागर—पृ. ६५. ) **कांती**—कांचीपुरी. **सुरशेन**—सोमवंशी राजा धामपाळ, नगर कल्याण, कुळदैवत जोतिबा, याच्यापैकीं एक राजकुल. ( पहा—शहाणव कुळी पृ. ८ ).

### श्लोक ५८

**भोज**—सोमवंशी राजा सोमशर्मा, याच्या सहा पुत्रांपैकीं सहावा जो अनंग, त्याच्या कुळांतील जो भोजक तोच हा असावा. **गुरजार**—गुजर ऊर्फ पवार, हे मराठ्यांच्या ९६ कुळांत आहेत. चंद्रवंशांतील सोमशर्मा राजा याचे पुत्र सहा. त्यांतील ३ रा पुत्र पवार, कुलदेवता हनुमंत किंवा भैरव. याच कुळांत ‘ गुजर ’ येतात. **सिरसाट**—ब्रह्मवंशांतील दुसरा पुत्र दारिक, गोत्र कौशिक कुलस्वामी महादेव याच्या कुळापैकीं एक जात. **संक्राड** मराठ्यांच्या प्रचलित आडनांवांत ‘शंकर’ म्हणून आंडनाव दिलें आहे. त्या आडनांवाचे हे राजे असावे. ‘शंकराढ्य’ याचा अपभ्रंश. **गऊड**—गौड. **अमोड**—मोड करून न घेणारे. **साटे**—हे संकपाळ कुळापैकीं असून, यांचें तक्त गादी मालखेड, कुल-दैवत जोगेश्वरी. ब्रम्हवंशांतील सहावा धर्मराज नामक पुत्र, गोत्र अंगिरा, कुलदेवता महादेव, याच्या कुळांतही ‘साटे’ यांचा अंतर्भाव केला आहे. ( पहा–क्षात्रवंशसागर पृ. ५० ). नागेशानें येथें, आपल्या काळीं प्रसिद्ध असलेल्या मराठा सरदारांचीं नांवें, सीतास्वयंवरकालीन राजांत घालून कालविपर्यास केला आहे. अशीच, राजांची यादी, विठ्ठल बीडकरानें आपल्या सीतास्वयंवरांत दिली आहे. पहा विठ्ठल–सीतास्वयंवर ४।१६।१८. मुक्तेश्वरानेंही आपल्या सभापर्वांत द्रौपदीस्वयंवरप्रसंगीं, आलेल्या राजांचीं नांवें, आपल्या कालचीं देऊन, कालविपर्यासाचा दोष केला आहे. सामराजानेंही, असेंच वर्णन केलें आहे. पहा–रुक्मिणीहरण ६।१०, ११.

### श्लोक ५९

**रुचि**—शोभा. **गजपत्रिका**—स्वयंवराची मोठी आमंत्रणपत्रिका. **कौसकासी**—विश्वामित्रास.

### श्लोक ६०

जनकाची विश्वामित्रास आमंत्रणपत्रिका, व येण्याबद्दल विनंति.

## श्लोक ६१

जनकाची पत्रिका आली, त्यावेळीं विश्वामित्राच्या यज्ञसंरक्षणार्थ राम–लक्ष्मण त्याच्याच आश्रमांत होते. यज्ञांत राक्षसांपासून रामानें द्विजांचें रक्षण केल्याबद्दल, विश्वामित्रानें समाधान व्यक्त केलें आहे.

## श्लोक ६२

विश्वामित्र स्वयंवरास जातांना, रामलक्ष्मणास स्वगृहास जाण्यास सांगतो. पण राम, त्याच्याबरोबर स्वयंवर पाहण्यास जाण्याची इच्छा दर्शवितात.

## श्लोक ६३

**कृती**–कृतकृत्य, आज्ञाधारक.

## श्लोक ६४

विश्वामित्रानें अंतर्ज्ञानानें पाहिलें, तों रामालाच सीता योग्य असून, ती दुसऱ्या वरास वरणार नाहीं, असें त्यास समजलें.

## श्लोक ६५

मुनि रामास म्हणतो, ' हे रघूत्तमा ! जनकाच्या घरीं लक्ष्मीनें जन्म घेतला आहे. जो लक्ष्मीपती असेल त्यालाच ती वरील. अर्थात् तूं रमापति असल्यानें, ती तुलाच वरील. ' खुबीदारपणानें गोष्ट सूचित करण्याची मुनीची पद्धति पहा.

## श्लोक ६७

**भातुकें**–खाद्य. पहा. ' ध्रुवासी ध्रुवपद भातुकें '–अमृत० ध्रुवचरित्र १६.

## श्लोक ६८

**प्रमाणिक**—अधिकारी पुरुष. ( विश्वामित्र ).

## श्लोक ६९

विश्वामित्र व राम लक्ष्मण रथांतूत, तर इतर ऋषि पालख्यांतून गेले.

**पेलिला**—लोटला, हांकला. पहा–' तेथें न देखे शारंगधर । रथ सत्वर पेलिला ॥ '–एकनाथ—रुक्मिणीस्वयंवर १२।८४.

## श्लोक ७०

कोणकोणते ऋषि स्वयंवरास गेले, हें त्यांच्या प्रभावावरून सूचित केलें आहे. **ओळ १**—विश्वामित्र. त्यानेंच प्रतिसृष्टि निर्माण केली होती. **ओळ २**—भृगु. ब्रम्हा, विष्णु, महेश, या तीन देवांपैकीं, श्रेष्ठ कोण याची परीक्षा पाहण्यासाठीं, सर्व ऋषींनीं भृगूस पाठविलें. भृगु ब्रम्हदेवाकडे गेला. तेथें त्यानें ब्रम्हदेवास नमन केलें नाहीं, म्हणून ब्रम्हा रागावला, पुढें तो शंकराकडे गेला, तेथेहीं तसेंच घडलें. भृगु, नंतर विष्णूकडे गेला. त्यावेळीं तो निजलेला पाहून त्यानें त्याच्या हृदयावर लाथ मारली. विष्णु जागा झाला, व रागावला तर नाहींच, उलट भृगूच्याच पायाला लागलें काय, म्हणून त्यानें पृच्छा केली, व भृगूचा पाय तो चोळूं लागला. ही शांतवृत्ति पाहतांच विष्णु हाच श्रेष्ठ देव, अशी त्याची खात्री झाली. ही कथा येथें अनुलक्षिली आहे. **ओळी ३।४**—हें अगस्ति ऋषींचें वर्णन व प्रभाव आहे. अगस्त्य हा विंध्याचा गुरु होता. अगस्त्य दक्षिणेकडे निघाला असतां विंध्यानें याला नमस्कार केला. तेव्हां त्यानें विंध्याला सांगितलें कीं, मी परत येईपर्यंत तूं असाच पडून रहा. त्याप्रमाणें विंध्य नम्र राहिला, व दक्षिणेचें उत्तरेचें दळणवळण सुरू झालें. समुद्रानें अपमान केला म्हणून व समुद्रांत दडलेल्या कालेय नावांच्या राक्षसांना बाहेर काढून, इंद्रादि देवांना सहाय्य करण्यासाठीं, यानें सर्व समुद्र पिऊन टाकला, व पुनः बाहेर सोडला, म्हणून याला 'पीताब्धि' अशीही संज्ञा आहे. पहा—
"विंध्यस्य संस्तंभयिता महाद्रेर्निःशेषपीतोज्झितसिंधुराजः। प्रीत्याश्वमेधावभृथार्द्रमूर्तेः सौस्नातिको यस्य भवत्यगस्त्यः॥—रघुवंश ६।६१.

## श्लोक ७१

**कोणी चंद्र इ०**:—हा बृहस्पतीचा उल्लेख आहे. चंद्र बलिष्ट होऊन त्यानें राजसूय करून त्रैलोक्य जिंकलें, व जबरीनें बृहस्पतीची तारा नांवाची स्त्री पळविली. तिच्याकरितां मोठें तारकामय युद्ध झालें. ब्रह्मदेव मध्यें

पडला, तेव्हां चंद्रानें तारा परत केली. पण ती गर्भार होती. गर्भाचा त्याग करण्यास बृहस्पतीनें सांगितल्यावरून, तारेनें तो एका मोळ्याच्या झाडावर टाकला. तो गर्भ तेजस्वी पाहून चंद्र व बृहस्पति भांडूं लागले. तारेनें गर्भ चंद्राचा असें सांगितल्यावरून, तो चंद्राला देण्यांत आला. तोच बुध होय. तेथून चंद्रवंश सुरू झाला. या प्रकरणांत चंद्राला बृहस्पतीकडून कलंक लागला. पहा—" ग्रह आला चंद्रासी । स्पर्श केला गुरुपत्नीशीं । कलंक लागला चंद्रासी । ऐसे झालें जाण पां ॥"—शनि-माहात्म्य ३३९. **सुरवरा कोणी** इ० —गौतम. गौतमपत्नी अहिल्या इच्याशीं, इंद्र कपटानें रममाण झाला, हें पाहून गौतमानें " तुझ्या शरीरास हजार भोकें पडतील " असा शाप दिला. पुढें इंद्रानें उःशाप मागितल्यावर गौतमानें ' हजार भगांचे, डोळे होतील ' असा उःशाप दिला. त्यामुळें इंद्राला ' सहस्राक्ष ' असें नांव पडलें. **ओळ २—कोणी वज्रधरासि** इ०:—इंद्रानें त्रिशिराला मारल्यामुळें, त्याच्या हातून ब्रह्महत्येचें पातक घडलें. त्या पापामुळें तो वेडा होऊन लोकवस्ती सोडून हिंडूं लागला, व इंद्रपद रिकामें पडलें. तेव्हां सर्व देव व ऋषि यांनीं नहुषराजास इंद्रपदीं बसविलें. कांहीं दिवस यानें धर्मराज्य केलें. पण पुढें आपण देवेंद्र असें समजून हा विषयलंपट बनला. एके दिवशीं इंद्राणी त्याच्या दृष्टीस पडली, व तिला पाहतांच हा कामोत्सुक झाला. इंद्राणी पळून बृहस्पतीकडे गेली, व त्यानें तिचें रक्षण करण्याचें, अभिवचन दिलें. नंतर सर्व देवांच्या सांगण्यावरून ती नहुषाकडे जाऊन म्हणाली, ' मला कांहीं अवधि द्यावा, तितक्यांत मी इंद्राचा तपास करतें ' राजानें ही अट मान्य केली व तिन इंद्राला भेटून सर्व वृत्त सांगितलें. तेव्हां इंद्र म्हणाला, तूं नहुषाकडे जाऊन सांग कीं, ' तुम्हीं जर पालखींत बसून पालखीला सप्तर्षि वाहनाकरितां लावलेत, तर मी तुम्हांला वरीन. ' इंद्राणीनें नहुषाला ही अट सांगितली. त्यानें सप्तर्षींस वाहनास लावून आपण पालखींत बसून तिच्या भेटीकरितां जाऊं लागला. मार्गांत त्यानें अगस्त्य

ऋषीच्या डोक्याला पाय लावून ‘ सर्प सर्प ’ म्हणजे लवकर चला, असें म्हटलें. तेव्हां अगस्त्य ऋषीनें ‘ तूंच पृथ्वीवर दहा हजार वर्षें सर्प होऊन पड ’ असा नहुषास शाप दिला. तेव्हां तात्काल हा सर्परूपानें पालखींतून पडूं लागला. या कथेवरून कांही काल इंद्र झालेल्या नहुषास, सर्प करण्याचा प्रभाव अगस्तीनें दाखविला म्हणून त्याचाच येथें पुनः उल्लेख आहे. **वेदांसही इ०**—वेदांची व्यवस्था लावणारा व्यास, कृष्णद्वैपायन. यावरूनच यास ‘वेदव्यास’ अशी संज्ञा मिळाली. **ओळ १—कोणी येक विदेह इ०**—देवराति जनकानें अश्वमेध यज्ञ आरंभिला व त्या निमित्तानें शेंकडो ऋषि बोलावले, व यज्ञांत सर्व एकत्र झाल्यावर हजार गाई, पुष्कळ संपत्ति पुढें ठेवून, जो कोणी श्रेष्ठ असेल त्यानें तें सर्व न्यावें असें जाहीर केलें. कोणीच उठेना हें पाहून ब्रह्मवाहसुत याज्ञवल्क्य, पुढें आला व आपल्या शिष्याला म्हणाला, “ ही संपत्ति उचल. कारण माझ्या इतका वेदवेत्ता येथें कोणीही नाहीं. ज्याला माझा मोठेपणा पटत नसेल त्याला माझें आव्हान आहे. ” या कथेंत याज्ञवल्क्य ऋषि व त्यानें नेलेल्या गाई यांचा उल्लेख आला आहे. **संरोधिता**—बळकावणरा. **ओळ ४—देवदानवपिता**—कश्यप ऋषि. यानें दक्षाच्या अदिति व इतर १२ मुलींशीं लग्न करून, १२ आदित्य निर्माण केले. यानें दुसऱ्या १२ पत्नींच्या ठिकाणीं, सर्प, पक्षी, राक्षस, गंधर्व अशी विविध प्रकारची प्रजा निर्माण केली. यामुळें हा, देव दानव, गंधर्व, मनुष्य पशु, पक्षी, व सर्प या सर्वांचा जनक झाला. म्हणूनच त्याला ‘ प्रजापति ’ म्हणतात. सीतास्वयंवराला वर सांगितल्याप्रमाणें, विश्वामित्र, भृगु, अगस्ति, बृहस्पती, गौतम व्यास, याज्ञवल्क्य, काश्यप, अशी ऋषिमंडळी किंवा ब्राह्मणमंडळी ( भूदेवता ) गेली, असें नागेश येथें वर्णन करतो.

## श्लोक ७२

श्लोक ७२—७९ या श्लोकांत ऋषींबरोबर स्वयंवरास निघालेल्या त्यांच्या शिष्योपशिष्यांचें व त्यांच्या थट्टाविनोदाचें नागेशानें मोठें हास्यकारी

वर्णन केलें आहे. असेंच वर्णन सामराजकृत रुक्मिणीहरणांत सर्ग, ६, श्लोक ४०–६० येथें आलें आहे. तें तुलनार्थ पाहिल्यास नागेश व सामराज यांचें वर्णनसाम्य दृष्टीस पडल्यावांचून रहात नाहीं. **द्विजसमाज**–ब्राह्मणसमूह. **उपशिष्य**–शिष्याचा शिष्य. पहा ' शिष्योपशिष्यैरुपगीयमानमवेहि तन्मंडनमिश्रधाम । " –उद्भट. **अनुशिष्य**–शिष्याबरोबर असणारे इतर. **धोपटिया**–धोपट्या–धोकटी=पिशवी. **गवाळी**–सोंवळ्याचीं वासनें. पहा.–' हातीं घेती तीर्थगिंड्या, गवाळीं, –सामराज रुक्मिणीहरण, ६।४८. **झारी**–' हातीं जयांच्या झळकेंत झाऱ्या '–सामराज रुक्मिणीहरण ६।५१.

## श्लोक ७३

**गांठी**–माळ. पहा 'कित्येक माळा धरिती जपांच्या'–साम. रुक्मि.६।४६. **कक्षापुटीं**–काखेंत. **ओळ ३**. पहा–' माथा ज्यांच्या शोभती उंच टोप्या –साम. रुक्मि. ६।४८. **ओळ ४. विराम इ०**–तोंडाची बडबड सारखी चाललेली. पहा–' हातीं पायीं फूटती ज्यास जीभा । जेव्हां तेव्हां बोलतां वाद ऊभा '–साम. रुक्मि. ६।५९.

## श्लोक ७४

**तिरळे**–तिरवा. **कुब्हें**–कुबडें. **पृथुल**–स्थूळ. **दोंदिल**–मोठ्या पोटाचे. पहा–' येती महादोंदिल मोठपोटे '–साम रुक्मि. ६।५७. **ओळी ३।४**. वृद्धब्राह्मणांची फजिती.

## श्लोक ७५

**ओळ १**.–पहा. –आक्रंदती अंध, अनाथ मूकीं.–साम. रुक्मि ६।५४. नागेशानें आपल्या चंद्रावळीवर्णनांत, गोपांचीं नांवें व स्वभावलक्षणें अशींच दिलीं आहेत. पहा–चंद्रावळीवर्णन २०८–२१३; **ओळ २**. गुरुजींना कित्येक शिष्यांनीं खांद्यावर घेतल्यामुळें, ते त्यांचे घोडेच झाले. **ओळ ४**. आपलें कोठून आगमन? या प्रश्नास 'आम्हीं सर्व दिवस

भरल्यावर गर्भांतूनच आलों' असें खवचट उत्तर देणारे ब्राम्हण. हेतु हा कीं, सांगण्यासारखें स्वतःचें ठिकाण किंवा घर नाहीं.

### श्लोक ७६

तट्टाला फोंक मारणाऱ्या शिष्याचें शब्दचित्र सुंदर दिलें आहे. **फोंक**—सरळ ओली खांदी. **थापटी**—चापट मारी.

### श्लोक ७७

शिष्यांच्या माकडचेष्टा दिल्या आहेत. **ओळ** १. मुक्यापुढें नाक खाजवून त्याला चिडवीत होते. **हानतो**–हाणतो. **रळिया**–रळी = विनोद. पहा. 'रळिया रापदळिया करीतु'—वच्छहरण. २१६. ज्ञानेश्वरी. ११।५४४. 'भीमक्या भली केली रळी'—एकनाथ.—रुक्मिणीस्वयंवर **पुखाचा**—पुख्याचा–यथेच्छ जेवणाचा.

### श्लोक ७८

नागेश ज्योतिषी असल्यामुळें येथें तो ज्योतिषाची परिभाषा योजीत आहे. शिवाय शब्दांवर कोटी करण्याकडेही त्याचा कल आहे. **तूळ**—ही एक १२ राशींपैकीं एक राशि आहे. या युवतीस (सीतेस) जर तूळ लग्न विवाहकालीं लाभेल किंवा या युवतीस जर तुल्य वर मिळेल, तर आम्हांलाही 'घृतं मिमिक्षे' हा मंत्र म्हणावयाची संधि मिळून, घृतकुल्या मधुकुल्या मिळतील. **ओळ** ४. तूळ लग्न हें तुल्य वर मिळवून देणारें आहे, तसें मकरलग्न नाहीं, असा भाव. 'तूळ' यावर येथें कोटी साधली आहे.

### श्लोक ७९

या श्लोकांत दोन भटांची विनोदी प्रश्नोत्तरें अनुक्रमें १।२ व ३।४ या ओळींत दिलीं आहे. **ओळ** ३. तुमचे घरीं शुभकृत्य आहे म्हणत होता ना? **ओळ** ४. वरील प्रश्नास उत्तर असें कीं, आज तर मंगळवार आहे. मंगळवारीं मंगलकृत्य असावयाचेंच. 'मंगळवार' व 'शुभ' या शब्दांवर कोटी आहे.

### श्लोक ८०

सर्वजण भागीरथी तीराला आल्यावर, विश्वामित्रानें भागीरथीला वंदन करून तिचें स्तवन केलें.

### श्लोक ८१

**भवैकदुःखहारिणी**—संसारदुःखाचें हरण करणारी. **सुखानुबंधकारिणी**—सुखसंबंध घडवून आणणारी.

### श्लोक ८२

**शरीरभाव**—अहंभाव, मीपणा.

### श्लोक ८३

विश्वामित्राचाही गर्व जाऊन त्याचा अहंभाव नष्ट झाला. **प्रमाणिके**-अधिकारिणी. येथेंही 'प्रमाणिकावृत्त' असल्यामुळें भागीरथीला तसें संबोधलें आहे.

### श्लोक ८४

विश्वामित्राचें देहभान नष्ट झालें, इतका तो भागीरथीलीन झाला. रामानें त्याला सांवरून धरलें. नाहीं तर तो पडायचाच.

### श्लोक ८५

**करूं निघाला**—करूं लागला. असा वाक्यप्रयोग सामराजही योजतो. पहा–'तदुपरि नृपपत्नी फार भेऊं निघाली'—रुक्मि. २–९२. **हे**—भागीरथी. **ओळ ४.** भगीरथानें गंगा आणल्याचें वृत्त सांगितलें.

### श्लोक ८६

**पादोदक**—गंगा ही विष्णूच्या पायापासून उत्पन्न झाली, व राम हा विष्णूचा अवतार. म्हणून 'गंगा ही तुमचें पादोदक' असें विश्वामित्र म्हणतो.

### श्लोक ८७

सर्व गौतमाश्रमाला येतात. **स्थानक**—ठिकाण.

### श्लोक ८८

**ओळ ३.** तेथें मनुष्याशिवाय सर्व सिद्धि होत्या. तो आश्रम निर्मानुष होता. **अनुपम्य**—अनुपम.

### श्लोक ८९

८९–९८ या श्लोकांत गौतमाश्रमाचें वर्णन केलें आहे. **चमरी**—वनगाई. **ओळ २.** भ्रमरी भ्रमरांसह गुंजारव करतात.

### श्लोक ९०

**रसाळ रसाळ**—रसाळ आम्रवृक्ष. **विततमाल**—विस्तृत आहे माला ज्यांची; माळच्या माळ लागली आहे ज्यांची. **तमाल**—तमालवृक्ष. **कलरव**—मंजुल शब्द. **कलकोकिळ**—कोकिळ. ‘ कल ’ हा शब्द कलहंसाप्रमाणें येथेंही ‘ कोकिळ ’ या शब्दामागें लावला आहे. पहा—कलकल कलहंसें फार केली सुटाया ’—दम. स्व. रघुनाथपंडित ४४ श्लोक.

### श्लोक ९१

**अवनीरजें**—नीरजें = कमळें; ‘ नीरजें ’ याच्या मागें ‘ अव ’ हा प्रत्यय केवळ यमकाकरितां लावल्याचें दिसतें. तत्पुरुष समासांत ‘ अव ’ प्रथम आलें असता ‘ अवक्रुष्ट ’ असा त्याचा अर्थ करतात. पण येथें ‘ अवक्रुष्टं नीरजैः ’ यापासून फारच थोड्या अर्थाची प्राप्ति होते. कमळें कशीं विकसताहेत! **ओळ २.** ही पृथ्वी रजःकणानें अति सुगंधित झाली आहे. पहा—‘ गंधमाघ्राय चोर्व्याः ’—मेघदूत २१. **सम**—एक सारख्या ओळीनें. **ओळ ४.** येथें चैतन्यारोप ( Pathetic fallacy ) साधला आहे.

### श्लोक ९२

**सारसें**—सारस पक्षी. हे पक्षी बहुधा जलाशयाचा आश्रय धरून राहतात. यामुळें यांच्या शब्दांवरून जलार्थी पथिकांस, जलाशय समीप अथवा दूर आहे, असें समजतें. हे पक्षी उत्तरहिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं आढळतात. ( चंद्रावळीवर्णनांतील ६५ श्लोकांवरील काव्यसंग्रहाची टीप.)

वरील ९०–९२ हे श्लोक, नागेशानें आपल्या चंद्रावळीवर्णनांत हरिवनाच्या वर्णनांतही घातले आहेत. **रसें**—आवडीनें.

### श्लोक ९३

**सारणि**—पहा– ‘ अश्रुजलाच्या सारणिमाजीं फोंफावत तो जातो ’–रे. टिळक, वनवासी फूल. **ओळ २**. येथें पुनः चैतन्यारोप ( Pathetic fallacy) केला आहे. **ओळ ३**. पहा—‘ अमृतही पयही म्हणवीतसे ’—दमयंती-स्वयंवर—रघुनाथपंडित श्लोक ३८. **रस**–जल.

### श्लोक ९४

**सारस**—कमळ. **सदागती**—वायु. **ओळ ४**. जे त्या आश्रमांत नित्य राहतात त्यांस गति ( मोक्ष ) प्राप्त होतो.

### श्लोक ९५

श्लो.९५–९७. निरनिराळीं फळें दिलीं आहेत. **नारंग**–नारिंगाचा अत्यंत पिंग = पिवळा रंग. **कलिंग**—कलिंगड. **जंबूफळें**–जांभळें. **सप्तालसें**–सप्तालू—Peach.

### श्लोक ९६

**जंबीर**—लिंबाची एक जात. **तुरंज**—महाळुंग. **करंज**—करंद = करवंद. **दाडिम**—डाळिंब. **कमरखें**—एक झाड व त्याचें आंबट फळ. या फळाचें लोणचें करतात. फळास चार धारा असतात. ( सं. कर्मरंग, हिं. कमरख. ) **हरिखें भजावीं**—मोठ्या हर्षानें खावीं. **खिरणिसें**–याचें पान बकुळीसारखें, व फळ कडूनिंबाच्या निंबोळीसारखें असून, आंत चीक असतो. फळ मधुर असतें. याला गुजराथींत ‘रायणी’ म्हणतात. **उपमें त्यजावीं**—निरुपम.

### श्लोक ९७

**तर्बूज**–टरबूज, कलिंगड. **खर्बूज**–खरबूज, कलिंगडाप्रमाणें याचा वेल वाढतो, व त्याचें फळ वाटोळें तांबूस रंगावर असतें. फळाची, भाजी,

रायतें, कोशिंबीर वगैरे करतात. **ओळ २. इक्षुदंड**—ऊंस. पहा ' प्रतिपर्वरसावहम्, ' **मेवा**—फळफळावळ. नित्य नवी फळफळावळ. कारण मेरु पर्वत कांहीं कोठें गेला नव्हता. मेरु पर्वत हा वनस्पतींचा व फळफळावळांचा अपूर्व सांठा. मग फळांना काय कमी ? वरील तीन श्लोकांत येणाऱ्या फळांच्या तुलनार्थ पहा.—

> दाळिंबें, सोनकेळें, पनस, अननसें, जांबळें, मातुलिंगें,
> अंबे, लिंबें, सुरंगें, टरबूज, पपये, अंजिरें, हें कलिंगें,
> शेपें, शीताफळेंही, खरबुज, खिरणी, सुंदरें तूत, बोरें,
> सप्ताळें, ऊंस, पुंडें, कविठ, कमरखें, वाळकें, सूक्ष्म थोरें. ॥
>
> —सामराज, रुक्मि. ३।४९.

## श्लोक ९८

यांत गौतमाश्रमांतील पुष्पें दिलीं आहेत. **तिलक**—A species of tree, with beautiful flowers. **चंपक**—चांफा. **केतक**—केवडा. **यूथि**—A kind of jasmine or its flower. पहा. ' यूथिकाशबलकेशी '—विक्रमोर्वशीय ४।२४. **कुरबक**—A species of amarnath, पहाः—' कुरबकाः रवकारणतां ययुः—रघु. ९।२९. ' चूडापाशे नव कुरबकं, चारुकर्णे शिरीषम् '—मेघ. ६५. **बंधुक**—A flower of a tree of that name. पहा ' बंधूकद्युतिबांधवोऽयमधरः । '—गीतगोविंद १०. **कदंबक**—A flower of कदंब tree. पहा— ' ते चोन्मीलितमालती सुरभयः प्रोढाः कदंबानिलाः ।—काव्यप्रकाश, उल्लास, १. कोणते वृक्ष कशानें फुलतात यासंबंधीं पहा—' स्त्रीणांस्पर्शात्प्रियंगुर्विकसति बकुलः सीधुगंडूषसेकात् । पादाघातादशोकस्तिलककुरबकावीक्षणालिंगनाभ्याम् ॥ मंदारो नर्मवाक्यान्मृदुपटुहसनाच्चंपकोवक्त्रवातात् । चूतोगीतान्नमेरुर्विकसति च पुरा नर्तनात्कर्णिकारः ॥

## श्लोक ९९

**साहीऋतु**—वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत व शिशिर. **येथें**—गौतमाश्रमांत. साही ऋतूंचा एके ठिकाणीं वास झाल्यामुळें, प्रत्येक ऋतूंत

होणाऱ्या फळांफुलांचा तेथें लाभ झाला. **ओळ ३।४.** निरनिराळ्या ऋतूंत होणारीं फळें, फुलें, येथें एके ठिकाणीं वर्णन केलेलीं पाहून वाचक आक्षेप घेतील, यास्तव नागेश आपण असें सर्व ऋतूंतील फळांफुलांचें मिश्र वर्णन कां केलें, याचें कारण सांगून दोष न देण्याबद्दल वाचकांना विनवितो.

## श्लोक १००

**ओळी ३।४.** गौतमाश्रमांत आल्यावर सर्व गप्प बसले, व तें आश्रमस्थानही ओसाड असें पाहून, रामानें विश्वामित्रास तसा प्रश्न केला.

## श्लोक १०१

विश्वामित्रानें रामास अहिल्योद्धाराची कथा सांगण्यास प्रारंभ केला. प्रथम येथें तो अहिल्यास्वयंवराची हकीकत सांगतो. **जाणोनिया नेणता**—सर्व जाणून पुनः न जाणल्यासारखा ( अलिप्त ). पहा—‘ जाणूनि नेणतें करीं माझें मन.’

## श्लोक १०२

**ओळी ३।४.** ब्रम्ह्यानें अहिल्येच्या स्वयंवरास लावलेला, पृथ्वीला सात प्रदक्षिणा घालून सर्वांत अगोदर येणें, हा पण.

## श्लोक १०३

हा पण अवघड असें पाहून, इंद्रादि दिक्पति अगदीं प्राकृत जनाप्रमाणें आपापल्या वाहनांची अडचण पुढें आणीतआहेत. “ आम्ही सातदां पृथ्वी प्रदक्षिणा केल्या असत्या हो, पण काय करावें, आमचें वाहन सुस्थितींत नाहीं.” असें म्हणून आपला कमीपणा प्रत्येक जण झांकण्याचा प्रयत्न करीत आहे. देवासारख्यांनीं अशा फुसक्या सबबीवर, पण जिंकण्यास मागें सरावें, हें पाहून थोडी गंमत वाटते. नागेशाच्या विनोदाचा हा एक मासला आहे. **वन्हि**—अग्नि पृथ्वीप्रदक्षिणेस गेला असता, पण त्याचें वाहन मेंढरूं, तें लांडग्यांनीं नेलें. नाहीं तर तो गेला असता ! केवढी अडचण त्याच्या मार्गांत ही !

## श्लोक १०४

**दिक्पति**–१ इंद्र (पूर्व), २ अग्नि (अग्नेय), ३ यम (दक्षिण), ४ नैर्ऋतिः (नैर्ऋत्य), ५ वरुण (प्रतीची), ६ वायु (वायव्य), ७ सोम (उदीची), ८ ईश्वर (ईशानी) **म्हैसा**–रेडा गाळांत कसा रुतून बसला कळेना. **उलूक**–नेर्ऋत्याचें वाहन, घुबड. तो पृथ्वीप्रदक्षिणेला गेला असता पण त्याचें वाहन दिवाभीत दिवसा चालणार कसें?

## श्लोक १०५

**जळस्वामी**–वरुण. **तमासा**–तमाशा, मौज. त्याचें वाहन मासा केव्हांचं पाण्यांत पळून गेला. **मारुत**—वायु. **झांसा**—तळमळ. पहा–'लाविसी हरि किती मज झांसा'–साम. रुक्मि. ४।११७. सर्व लोकांना हालवून सोडणारा वायु, पण त्याला आज वाहन नाहींसें झालें! त्याचें वाहन मृग पारध्याच्या फाशीं अडकलें. तें आतां वायूला कसें मिळणार!

## श्लोक १०६

**ओळी** १।२. कुबेराचें वाहन, मनुष्यवाह्य विमान. ईशानाचें वाहन बैल, पण तोही कांहीं रोगानें मेला. **बरगें**–बरग=केसांमध्यें गोचिड्या, उवा पडणारा गुरांस होणारा मसुऱ्या रोग.

## श्लोक १०७

गणपतीची अडचण, वाहनाची असूनही थोडी शारीरिक स्वरूपाची होती. त्याला ब्रह्मदेवाचा पण कठीण वाटला.

## श्लोक १०८।१०९.

"प्रसवोन्मुख गाईस प्रदक्षिणा घातली असतां, पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य लागतें" हा शास्त्रार्थ गौतमाला ठाऊक असल्यामुळें, त्यानें प्रसवोन्मुख धेनूस सात प्रदक्षिणा केल्या, व त्याला सात वेळ पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य प्राप्त झालें. अशा रीतीनें गौतमानें ब्रह्मदेवाची अट पाळली, व त्यानें अहिल्येचें पाणिग्रहण केलें.

## श्लोक ११०

अहिल्या गौतमाला मिळाल्याबद्दल इंद्राला राग आला, व तो अहिल्येस म्हणाला ‘ कामुक होत्साता मी कपटानें तुझ्याशीं रममाण होईन ’.

## श्लोक १११

अहिल्या–गौतमांचें दांपत्यजीवन.

## श्लोक ११२

इंद्र, कपटवेशानें, गौतम नाहीं असें पाहून, त्याच्या आश्रमांत येतो. **प्रत्यक्ष जाला मुनी**—इंद्र प्रत्यक्ष गौतम झाला. त्यानें गौतमाचें प्रत्यक्ष रूप घेतलें. **ओळी** ३।४. अहिल्येस इंद्राचें कपट कळलें नाहीं. तिला तो आपला खरा पतीच वाटला.

## श्लोक ११३

इंद्र अहिल्येस म्हणत आहे. **संचली**—संचणें–राहणें–( एके ठिकाणीं राहिली ). पहा—‘ आत्मा हेम जसें तसा स्थिरचरीं नाना नगीं संचला ’– वामन, भूगोलवर्णन श्लोक, १. **ओळ** ४१ ती आपला नवराच आला आहे असें समजून बोलते. **टवाळी**—चटोरपणा.

## श्लोक ११४

**काम**–कामविकार. **ओळ** २. आपला पति, दिवसा असा चटोरपणा करील अशी, तिची कल्पना नव्हती. **ओळ** ३. स्नानाहून परत येण्याची रोजची वेळ तर झाली नव्हती. कारण गौतमरूपधारी इंद्र मध्यंतरींच आला होता. **ओळ** ४. पहा—‘ पुढें न ये रे, रस या वयाचा ’— साम. रुक्मि. ४।३२.

## श्लोक ११५

**ओळ ३. रतीची**–आवडीची. **ओळ ४. सुरत**—मैथुन. **रतीची**—कामेच्छेची.

## श्लोक ११६

**मार**—मदन. पहा ‘मदनो मन्मथो मारः’–अमर. **आग्रह**—पति-रूपी इंद्राचा मैथुनाग्रह. **ओळ ३.** “मनाला खंत तरी थोडी वाटावी. तुमच्या मनाला थोडेंतरी दुःख वाटावें” असें, अहिल्या, कपटवेषधारी इंद्र आपला खरा पती आहे, अशा भावनेनें बोलते. **ओळ ४.** शेवटीं जिवित-त्यागाची निर्वाणीची मात्रा देखील ती काढून पाहते. पण व्यर्थ !

## श्लोक ११७

कपटी इंद्राचें भाषण. **आजि पाळी**—आजचीच रतिप्रसंगाची पाळी आहे. **मदनसदन**—कामागार, गुह्यांग. **ओळी ३।४.** शेवटीं इंद्रानें पत्नीधर्माचा उपदेश करण्याचा आव आणला आहे. पत्नी-धर्माप्रमाणें पतीची इच्छा तृप्त करणें, हें पत्नीचें कर्तव्य आहे, अशा समजुतीनें अहिल्या कपटी इंद्राला वश झाली.

## श्लोक ११८

**मंजीर**—नूपुर–पैंजण. **भूषा**—अलंकार. **रवकार**—पहा, झण-कार. **कांची**—कमरपट्टा. **विपंचीझणकार**—वीणेचा झंकाररव. **हुंकृति**—हुंकारशब्द. अहिल्या व इंद्र यांच्या रतिप्रसंगाच्या वेळचा वरील भूषणांचा नाद होय.

## श्लोक ११९

**कळकिंकिणी**—मधुर नादाच्या क्षुद्रघंटिका. **ओळी ३।४.** यावेळींच खरा गौतम आपल्या आश्रमास परत आला, व हे सर्व मधुर नाद ऐकून, त्याला हें सर्व रहस्य कळून आलें. **निजनायके**—आपल्या स्त्रीस, (अहिल्येस).

## श्लोक १२०

**ओळी ३।४.** अहिल्येस आतां इंद्राचें कपट कळलें. **मघवा**–इंद्र.

## श्लोक १२१

दर—भीति. **निकुरें**—निकरें. निश्चयानें, **रहिं**—( सं. रहसि ) = एकांतीं. **ओळी ३।४.** गौतमाचा इंद्रास शाप. **ओळ ४. भगें**—छिद्रें.

## श्लोक १२२

अहिल्याही चळचळा कापूं लागली. **रातसी**—रममाण झालीस.

## श्लोक १२३

अहिल्येची विनवणी. **छळानें**—कपटानें. **प्रचारिलें**—( माझ्याशीं ) व्यापार केला. आपल्याकडे कांहीं, दोष नाहीं, म्हणून ती गौतमाकडे उःशाप मागते. **उःशाप**—शापमोचन. **ओळ ४. पहातां**—पाहतां पाहतां, झटकन्. किंवा हा ( इंद्र ) पाहत असतांनाच.

## श्लोक १२४

गौतमानें अहिल्येस दिलेला उःशाप. **सदाम**—मालालंकृत.

## श्लोक १२५

विश्वामित्रानें अशा प्रकारें गौतमशापाची कथा सांगून, अहिल्यारूपी शिळा पुढें पडलेली दाखविली. **चळे**—निघे.

## श्लोक १२६

विश्वामित्र, रामास म्हणतो, " आतां ही अहिल्या उःशापाप्रमाणें तुझीच वाट पाहत आहे. तूं या वनास आला आहेस, तर तूंच तिचा उद्धार करावयाचा आहेस. **लाघव**—कौशल्य.

## श्लोक १२७

**बरी करी इ०**—रामानें शिळेला नमस्कार केला. कारण ती अहिल्याच होती. रामाचा विनयशाली स्वभाव दिसून येतो. **सन्नती**—वंदन.

## श्लोक १२८

रामाचे मनांतील विचार. **अहिल्या ही पतिव्रता असल्यानें, त्या शिळेला पाय कसा लावावा, असा विचार त्याला पडला. त्याची तनु**

कंपायमान झाली, पण सर्व, तसें करावयास सांगत होते. म्हणूनच त्यानें शिळेला पाय लावला.

### श्लोक १२९

**शिळांतर**—शिळेचा अंतर्भाग. अहिल्योद्धार झाला.

### श्लोक १३०

**अमरोत्तमा**—देवश्रेष्ठ रामास. **ओळ** २. अहिल्येचे उद्धार. **ओळी** **३।४**. जसा अहिल्या–गौतमांचा संयोग तूं पुनः घडवून आणलास, तसा तुझाही सीतेशीं संयोग घडेल.

### श्लोक १३१

**दंपती**—अहिल्या-गौतम. रामाच्या अद्भुत लीला पाहून, स्वर्गांतून पुष्पवृष्टि झाली. ब्राह्मणांना तर आतां फावलेंच.

### श्लोक १३२

ब्राह्मणांना वाटलें कीं, आतां दैवयोगानें राम इकडे आला आहे, तर आता स्त्रियांना काय तोटा! तो ज्या शिळेला पाय लावील, ती उत्तम सुंदर स्त्री होईल. कारण नुकतीच शिळेची अहिल्या रामानें केली होती. या समजुतीनें, ब्राह्मण पर्वतांतल्या शिळा हुडकूं लागले. नागेशानें आपल्या कल्पकतेनें, येथें आपल्या स्वभावानुसार विनोद उत्पन्न केला आहे.

**चाला**—चाळा, शोधा. **तीच्या**—अहिल्येच्या.

### श्लोक १३३

आतां येथून पुढील २० श्लोकांत, प्रत्येक ब्राह्मण आपल्या घरांतील बायको कशी अवगुणी व कुरूप आहे, याचें वर्णन करून, आपणांस नवी पत्नी करणें कसें प्राप्त आहे, याचें समर्थन करीत आहे. **कक्षा**—कांखा.

### श्लोक १३४

**एकाक्ष**–एका डोळ्यानें आंधळी. **नाकास इ०**–नाकास ठिकाण नाहीं, इतकी बसक्या नाकाची. **वचना इ०**–जी सांगितलेलें कांहीं ऐकत नाहीं.

## श्लोक १३५

**चाट**—हलकट, लुची, चावट. पहा—' मेळवुनी चाट, करी सुरापान '–तुकाराम २५०९ **अचाटी**—चावट, फाजील. पहा—' केलीं मुलें हीं अवघीं अचाटें.'—साम. रुक्मि. १।७ **बोरकांटी**—बोराटी. बोरीची कांठी. **तरटी**–तरंटी—A tree, capparis Erythrocarpus. ( Molesworth. ) **तिवाटी**—चिवाटी. ज्या झाडांना कांटे असतात, अशांचीच उपमा येथे दिल्याकारणानें, त्या स्त्रीच्या खरबडित अंगाची कल्पना येते. **गाटी**—हट्टी, हेकड. पहा–' जात होते यमुनेच्या हाटा। तेथें आला यशोदेचा गाटा'—मध्वमुनीश्वर ११६. ' भेटेल वाटे जरि कृष्ण गाटा '—नागेश. चंद्रावळीवर्णन, श्लोक, १८. **गदूटी**–गटाटी––गाताडी (?) = अडेल, दुराग्रही. **जगथोंट**—मुलखाची दांडगी ( थोंट )—पहा ' थोट उद्धट लंपट '—दासबोध २।३।३०. हाच श्लोक नागेशानें आपल्या चंद्रावळीवर्णनांत घातला आहे. पहा चंद्रावळीवर्णन. श्लोक २४४.

## श्लोक १३६

**बहुसाल रोडी**—फार रोडांगी. **होंटतोडी**—ओंठतुटकी. **मुढी**—मूर्ख ( सं. मूढ ). **कुढी**—कपटी, कुरठी. **हेकुडी**–हेकड = हट्टी, दुराग्रही. ' हे ' व ' कुडी ' असे निराळे शब्द घेतल्यास ' कुडि ' हे ' दंतदाढा ' याचें विशेषण होईल. जिच्या दंतदाढा कुड्या म्ह० वाईट आहेत अशी.

## श्लोक १३७

**अदंत**—दंतविहीन, बोथरी. **नांवें इ.**—नांव मृगलोचना पण अंधळी. ' नांव सोनूबाई व हातीं तखलाचा वाळा ' अशी गत. **खुळी**–थोटी. पहा—' एरवीं असतां हातीं खुळा ' ज्ञानेश्वरी १३।४५६. **लंगित**–लंगडत.

## श्लोक १३९

नांव सुलोचना पण डोळे पहावे तर वांकडे, तिरवे. अशा स्त्रीला पाहून मन पोळतें. **महावोस**—जिचें वक्षस्थळ वोसाड आहे अशी. जी शून्यस्तनी आहे अशी.

## श्लोक १४०

सदा मुखें इ०—जिच्या तोंडाचा नगारा व मृदंग सारखा वाजतो आहे. सारखी बडबडी व तोंडाळ. **कामी**—कामासक्त. हे एका नवऱ्याचें उद्गार आहेत.

## श्लोक १४१

हें वर्णन बीभत्स आहे. **वपुहि इ०**—जिचें शरीर खराऱ्याप्रमाणें. **धांगडी**–गैरशिस्त वर्तनाची स्त्री. वरील सर्व स्त्रियांच्या वर्णनाशीं पुढील स्त्रीचें वर्णन तुलनार्थ पहा—

मागे ती लुगडीं, सकाप बुगडी, आठां दिसां बांगडी,
घालीते फुगडी, कधी न रगडी, फाडीतसे आंगडी, ।
खैराची सगडी तशी धडधडी, तोंडाळ मोठी खुडी,
सोन्याच्या लगडीस देखुनि गडी, ऐशी महा धांगडी; ॥ १ ॥
दारीं देत कडी, सदा कडकडी, बोले महा वांकडी,
दाणें चोरुनि फांकडी, न कळतां घेते मुळे कांकडी, ।
खाते ती जसि माकडी, वसवशी दातीं दिसे खेंकडी,
या योगें अमृतेश्वरासि रुचली गंगातिरीं झोंपडी ॥ २ ॥

—अमृतराय–कवितासंग्रह पृ. ९७.

## श्लोक १४२

**मांजरडोळी**—घाऱ्या डोळ्याची. **वक्षिहि झोळी**–लंबस्तनी, **ग्रामहि चाळी**—गावांत तिरपटणारी, गांव पालथा घालणारी. **गाळी**—शिवी. **अनबाळी**—जी बाला नव्हे ती, वयस्क अशी.

## श्लोक १४३

**डोळे घालणें**—मारणें-डोळा मिचकवून खूण करणें. **दावित गोळे**–स्तन दाखविणें. **लोळे तोडित**—लचका तोडणें—घेणें. **खोळे पाडणें**—अडचणींत पाडणें. अशी स्त्री सोडून, आतां मी एक शिळा आणीन व रामाच्या पदस्पर्शानें ती सुंदर स्त्री होईल, मग ती मला माळ घालील.

## श्लोक १४४

अर्थातच ही रामाकडून प्राप्त झालेली सुंदर स्त्री, चंद्रवदना व चपलनेत्रा असून, पतीस हळूहळू हांक मारणारी, व मृदु नादच सहन करणारी असणार.

## श्लोक १४५

ज्या नवऱ्याची घरीं दाद लागत नाहीं, त्यानें दुसरी माळ घालावयास सिद्ध असणारी (स्रग्विणी) नवरी कां न वरावी? येथें 'स्रग्विणी हें विशेषण घालून वृत्ताचेंही नांव सूचित केलें आहे.

## श्लोक १४६

या श्लोकांत टाकाऊ स्त्रीचें सगुण व सावयव वर्णन केलें आहे. **पदास पृथुता**—जंगी पाय. **वक्त्रीं** इ०–तोंडावर प्रेतकळा. **कटीस इ.**—लठ्ठ कंबर, पखवाजासारखी. **नाकीं उद्वसता**—नाकास ठिकाण नाहीं, चिकण्या सुपारीसारखें नाक. **वदें कठिणता**—कठिण उत्तर देणारी. **चित्तांत** इ०—निर्लज्ज. **हस्तीं** इ०—चोरटी.

## श्लोक १४७

या श्लोकांत पत्नीत्वास योग्य अशा स्त्रीचें गुण, अवयवपरत्वें दिले आहेत. **करी** इ०—हस्त कमलासारखे. **वाणी** इ०—वाणी किंवा भाषण अमृतासारखें; मधुरभाषिणी. **पायीं** इ०—पाय पद्मासारखे. **वक्षस्थली** इ०—पीनपयोधरा. **नेत्रास** इ०—दीर्घापांगनेत्रा. जिचे डोळे कानापर्यंत विस्तृत आहेत अशी.

## श्लोक १४८

ब्रम्हचारी बुवांना फार पंचाईत वाटूं लागली. ते वरील दुसऱ्या बायका मिळविणाऱ्या ब्राम्हणांच्या नांवानें हाका मारूं लागले. आपणास अजून एकही पत्नी नसतां, हे ब्राम्हण घरांत एक बायको असतांना दुसरी करण्यांत गुंतलेले पाहून ते त्यांना म्हणतात—" तुम्हांला निदान एक तरी

बायको घरीं आहे, ( मला तीही नाहीं ). आतां तुम्हीं रामाकडून सुंदर स्त्रिया मिळविण्याची संधि साधीत असतां, मी जर गप्प बसलों, तर बाजार उलगल्यावर मला काय मिळणार आहे. मला देखील आतांच संधि साधली पाहिजे." **तारूं लुटणें**—जहाजांतील माल लुटणें. येथें, रामाच्या कृपेनें स्त्रिया मिळतात म्हणून त्यांची वाटेल तशी लयलूट करणें. अशी ब्राह्मणांनीं लयलूट केल्यावर बिचाऱ्या ब्रह्मचाऱ्याची दाद कशी लागणार, ही त्याची अडचण. आतांपर्यंत तो अविवाहित राहिला, पुढें रामाच्या कृपेनें सगळ्याबरोबर स्त्रिया मिळण्याची संधि आली, तर हे विवाहित ब्राह्मण दुसऱ्या बायका मिळवून, पुनः त्याच्याआड आलेच. सर्व बायका विवाहितांनींच संपविल्यावर मग ब्रह्मचाऱ्याचें लग्न तरी कसें व्हावें ?

## श्लोक १४९

वरील ब्रह्मचाऱ्याच्या शंकेस ब्राह्मणांनींहीं खासें उत्तर दिलें. ते म्हणाले कीं, " बाबा ! शिळांना तर कांहीं तोटा नाहीं. एक किंवा अनेक शिळा रामाच्या पायाजवळ धर, तुला वाटेल तितक्या स्त्रिया मिळतील. तूं संकटांत पडूं नको. " ( आम्हीं कांहीं तुझ्या विवाहाआड आलों नाहीं. ) **अपायीं**—अपाय—विपत्ति. पहा—' शिणतां बाह्य उपायीं । जन अपायीं पडताती । ' एकनाथी भागवत १३।५३८.

## श्लोक १५०

घरची वाईट बायको टाकून दुसरी चांगली मिळविणें, हा ब्राह्मणांचा क्रम सुरू झाला. शिळेचा स्पर्श रामाच्या पायास घडवून, सुंदर स्त्री मिळविण्याची अहमहमिका, त्या ब्राह्मणांत सुरू झाली. आपल्या अगोदर रामास दुसरे गांठतील, म्हणून ते ब्राह्मण धांवूं लागले.

## श्लोक १५१

रामापुढें शिळा डोक्यावर घेऊन येण्यांत ब्राह्मणांचें धाष्टर्य तर खरेंच. पण रामाला वाटलें कीं, ज्या अर्थी हे ब्राह्मण डोक्यांवर शिळा घेऊन

आले आहेत, त्या अर्थी यांच्या बाबतींत कांहीं तरी अन्याय झाला असावा, त्याचें परिमार्जन करण्यास्तव, हे आपल्यापुढें आले असावे.

## श्लोक १५२

मग विश्वामित्रानें त्या ब्राह्मणांची खरी स्थिति सांगितली कीं, हे ब्राह्मण जे शिळा घेऊन भ्रमताहेत, ते मदनपीडित आहेत.

## श्लोक १५३

विश्वामित्र रामास म्हणतो 'हे तुजकडे येणारे ब्राह्मण, तुझ्या चरणधूळीची इच्छा करतात. कारण तुझ्या पदकमलाच्या स्पर्शानें, आपल्या जवळच्या शिळांच्या, सुंदर स्त्रिया बनवून घेण्याची, त्यांची मनीषा आहे.'

## श्लोक १५४

ब्राम्हण, रामास आपलें रडगाणें सांगतात. **कुऱ्हाडी**—कुबडी. **दुसरे वऱ्हाडीं**—दुसऱ्या लग्नाची. 'जर तरुण व मदगर्वित सुंदरीचा (पति) होणार नाहीं, तर दरीचाच आश्रय करीन' अशी एका ब्राह्मणाची प्रतिज्ञा. पहा—'एका भार्या सुंदरी वा दरी वा।'–भर्तृ.

## श्लोक १५५

**बांदरी**—वानरी. घरांतल्या वानरीला (कुरूप स्त्रीस) टाकून द्यावी.

## श्लोक १५६

रामानें हें जाणून, "तुमच्या घरांतल्याच कुरूप बायका सुंदर होतील" असा वर दिला. "पण माझ्या बोलण्याचा आदर न कराल तर दगडाच्या स्त्रियांच डोक्यावर राहतील." असा धाकही घातला.

## श्लोक १५७

ब्राह्मण घरीं येऊन पाहतात, तों घरच्या स्त्रिया इतक्या सुंदर झालेल्या कीं, त्यांनीं सुरयुवतींनाही आपल्या रूपानें धास्ती उत्पन्न करावी. **परिशंकिती**—भिवविती.

## श्लोक १५८

लांबून मिथिला नगरीच्या देखाव्याचें वर्णन, यापुढें आलें आहे. **माधुरी**—वाणी.

## श्लोक १५९

येथें पुनः चैतन्यारोप ( Pathetic fallacy ) केला आहे. **लती**—लतिका (?) लहान लता.

## श्लोक १६०

**उमटती**—उमटणें—प्रामुख्यानें पुढें येणें. आपले लताकृती बाहू पुढें करून, वृक्ष रामाला जणु नमस्कारच करीत आहेत. **कलाशतिं**—आपल्या अंगीं असणाऱ्या असंख्य कलांनीं. **बाहती**—बोलावतात.

## श्लोक १६१

**अमृतास**—त्या नद्याचें पाणी असें गोड कीं, केवळ अमृतच.

## श्लोक १६२

**अनघ**–निर्मळ. **आकारिती**–बोलावती. ( अर्थात् रामास ). **टाकुनि इ०**—रहाट इ. पाणी काढणाऱ्या यंत्राचा जो आवाज होई, त्यानें विहिरी व मोठे आड रामाला बोलावीतच आहेत, त्याचें स्वागतच करीत आहेत, असा भास होई.

## श्लोक १६३

**सरसी**-सरोवर. राम कदाचित् तेथील सरोवराला विसरेल, म्हणून त्याला आठवण राहण्यासाठीं, सरोवरांतील हंस आपलें कौशल्य दाखवीत होते. **सारस**—पक्षीविशेष. **बहुत इ०**–सारसपक्षी आपल्या शब्दानें अमुक ठिकाणीं कमलें, आहेत अशी सूचना देत होते. जेथें सारस, तेथें सरोवर, व जेथे सरोवर तेथें कमलें. **सारस**–कमलें. **सांगती**–सुचविती. **अमृतसार इ०**—सारस पक्षी अमृताचें जणु सत्व असा कमलांतील मध, इच्छीत होते.

## श्लोक १६४

**आलिनीव्रजीं**—भृंगींच्या समूहानें. कमलिनीवर काळ्या भृंगी बस-

त्यामुळें त्या मलिन ( काळ्या ) दिसत होत्या. **अवनीश**—हे रामा ! **झणीं व्रजीं**–लवकर ( स्वयंवरास ) जा. **परिचरी इ०**—वाहणाऱ्या लहरी ( लाटा ), किंवा परिचारी = दासी. कमलनींच्या मागून जाणाऱ्या ज्या दासी, (लाटा) त्या आपल्या सखींचीं मुखें, एकदा झाकीत व पुनः त्यांचीं चंचलमुखें उघडीं करीत. वाहणाऱ्या लाटांमुळें सरोवरांतील कमलें कंपायमान होत असत, असा अर्थ. **परिचरी**–वाहणाऱ्या ( विशेषण ), किंवा, अनुचरी. **लाविती**—झांकिती. अशाच प्रकारचें वर्णन तुलनार्थ पहाः—

कासारीं कमळविकास । देखोनि वाटे नारदास ।
अतिथि मी पोहोनि उल्हासें । हास्य करी वनराज. ॥ ४३ ॥

कोकिलादिकांचें कूजन । ऐकोनि मानिलें नारदमनें, ।
यावें म्हणोनि आकारण । करिती मातें सद्विज. ॥ ४४ ॥

लतागळितसुमनें । होतां मानी मुनींचें मन, ।
पुरसुंदरीवत लाजावर्षण । करिती ऋषिराज मी प्रवेषतां. ॥४५॥

मंदवातें कदळी आंदोलन । तेंचि वाटलें परम व्यजन, ।
कोविदारतरु चामर समर्पण । करितां वाटे निज गुच्छें. ॥४६॥

—निरंजनमाधव, सांप्रदायपरिमळ.

## श्लोक १६५

मिथिलेचे जवळून वर्णन, श्लोक १६५-१७४. **अमरीपुरी**—इंद्राची अमरावती. **सरी न करी**–बरोबरी करीत नाहीं. पहा–' जे लाजवीते अमरावतीला '–साम. रुक्मि ५।५.

## श्लोक १६६

**प्राकार**—तट. **संवेष्टिली इ०**—नगरीसभोंवतीचा तट पाहून ही नगरी, शेषानेंच जणु वेष्टिली आहे, असें वाटलें. तटाची लांबी व नागमोडी बांधणी, दर्शविली आहे. **चऱ्यास–चरी**—खंदकांना. **फेरा**–वळसा.

खंदक वर्तुळाकार होते. **ओळ ४.** ( या खंदकामुळें ) त्या नगरीला शत्रूंचा घेरा ( वेढा ) कधीं पडला नाहीं.

### श्लोक १६७

**हुडे**—बुरूज. **ओळ २.** पर्वताच्या तुटलेल्या कड्याप्रमाणें उंच. **ओळ ४.** खंदक इतका खोल व पाण्यानें भरलेला होता कीं, समुद्रच तेथें कोंडून राहिला आहे, असें वाटे.

### श्लोक १६८

मिथिलेंत अनेक वाद्यें कशीं वाजत होतीं, त्याचें वर्णन. **दमामे**—दमामा—मोठा नगारा. **तमाम**—पूर्ण. **कर्णे**—करणा—तोंडानें वाजविण्याचें पितळेचें तुतारीसारखें, आरंभीं लहान व पुढें मोठें होत गेलेलें एक वाद्य. याचा आवाज गंभीर खर्जांतील असतो. लांबी सुमारें चार हात. थोरलें तोंड वर्तुळाकार, व्यास टीचभर सुमारें. लहान तोंड पायाच्या अंगठ्याच्या व्यासाचें. चौघड्यानंतर वाजवितात. **नफेऱ्या**—नफेरी—एकप्रकारची सनई, अशा प्रकारच्या वाद्यांना समानार्थक पहा:—

तुतारे, नगारे, तुरे, शंख, भेरी, मृदंगादि, वीणे, दमामे, नफेरी; ।
डफांचे झणत्कार, शृंगे, बुरंगे, । किती चौकडी, झल्लरी वेणुरंगे. ॥
—विठ्ठल सीतास्वयंवर ६।२४.

### श्लोक १६९

**नगारियांचा**—नगाऱ्यांचा. **नगारि**—इंद्र. इंद्र देखील त्यांच्या ध्वनीचें वर्णन करतो. **तारें**—नखरा, मिजाशखोरी.

### श्लोक १७०

**नव गारा**—नवे दगड, नगाऱ्यांच्या कठोर आवाजानें नवे दगड देखील फुटत. **बांके**—पटाईत मनुष्य ( शिपाई ). राजाच्या बाक्यांच्या गर्जनेनें सर्व भिऊन जात. **ओळ ४.** पण या धाकाचा जो काय परिणाम होईल, तो लोकांना पोटांत घालावा लागे,—सहन करवा लागे. **उरीं घालणें—पोटीं घालणें**—सहन करणें.

## श्लोक १७१

**निशाणें**–पताका. **तगट**—भरजरी वस्त्रें. जेवढीं म्हणून सुंदर भरजरी वस्त्रें होतीं, तेवढीं संपवून त्यांचीं निशाणें लावलीं. **शाणें**–शानें–छानदार. **पर**—शत्रु. शत्रूंचा अभिमान गळे.

## श्लोक १७२

**ओळ १.** निशाणांची मा (शोभा) आकाशांत विराजमानझाली होती. **सुषमा**—शोभा. **ओळ ३.** निशाणें इतकीं उंच गेलीं होतीं कीं, आकाशांत फडफडणारें त्यांचें वस्त्र एकाद्या माशाप्रमाणें भासत होतें. आकाशांत जणु एक मासा वावरतो आहे, असें निशाणांच्या उंच फडफडणाऱ्या कापडाकडे पाहून लोकांना वाटलें. आकाशही समुद्रजलाप्रमाणें निळेंच असतें.

## श्लोक १७३

**मागध**—राजांची बिरुदावली म्हणून पुकारणारे भाट. **ओळ २. बोलती**—रागानें बोलती. **ओळ ३.** वाद्यांच्या गजरानें सर्वांचे कान बधिर झाले. कोणास कांहीं ऐकूं येईनासें झालें. **ओळ ४.** रथांच्या वेगामुळें उडालेल्या धुरळ्यानें, सूर्य पृथ्वीपासून दुरावला, दिसेनासा झाला.

## श्लोक १७४

रामाला पाहण्यास लोकांची दाटी. **ओळ ४. रामा**–सुंदर स्त्रिया.

## श्लोक १७५

जिच्या उदरीं असा सुंदर राम जन्मला, तिची सर्वांना धन्यता वाटली.

## श्लोक १७६

विदेहाला वाटलें कीं, आपण सीतास्वयंवराचा जो पण एकदा बोलून गेलों, तो केला नसता तर, रामालाच आपण सीता अर्पण केली असती.

## श्लोक १७७

**वरराजसभा**–सीतेस वरावयास आलेल्या राजांची सभा, किंवा श्रेष्ठ राजांची सभा.

## श्लोक १७८

**अजागळें**—अजागळ पहा–अजागळस्तनस्येव तस्य जन्म निरर्थकम्'

## श्लोक १८०

स्वयंवराचें कौतुक पाहण्यास कोण कोण आले होते, त्यांची यादी या श्लोकांत दिली आहे. **दिगंबरपती**—दिगंबर जैन पंथाचे मुख्य. **जंगम**—लिंगाइत लोकांचा गुरु. **आगमी**—Learned, versed in theory, ( Apte ). पहा–विठ्ठल–सीतास्वयंवर ३।२७.

## श्लोक १८१

**इंद्रजालक**—इंद्रजालिक—जादुगिरी करणारे. **नटे**–नट. **कलाकलापनिधि**—कलांच्या समुदायाचे केवळ समुद्र, सर्वकलाकोविद.

## श्लोक १८२

येथून गोसाव्याची बुवाबाजी, त्याचें निंद्य वर्तन व त्याचा नित्याचा व्यवहार, यांचें नागेशानें मोठें सूक्ष्मवर्णन केलें आहे. नागेशाच्या काळीं गोसाव्यांची बुवाबाजी चांगलीच बोकाळली असावी, म्हणून त्यानें त्यांच्या वर्तनावर चांगलेच कोरडे ओढले आहेत. **बाळरंडा**–बालविधवा. या, गोसाव्याच्या तावडींत प्रथम सांपडावयाच्या. **तलगा**—तरुणी. तरुण सुवासिनीही पुष्कळ फशीं पडत. **ब्रह्मरस**—दैवी ज्ञानाचा उपदेश देण्याकरितां एकांतीं नेऊन, तेथें कामरसाचाच आस्वाद हे घेत असत.

## श्लोक १८३

**बाळा**—बालविधवा. **ओळ ३.** प्रथमतः ती व आपण हे दोन आहों असें दाखवून, नंतर तिच्याशीं समागमानें तिचा व आपला अभेद तो ( गोसावी ) दाखवी. नागेश येथें व पुढील श्लोकांत अत्यंत पांचट बनला आहे. अश्लील बोलण्यापर्यंत त्याची मजल गेली आहे.

## श्लोक १८४

**उच्चाटि**–उच्चाट–उचल्या, भामटा. **सादर इ०**–गर्ह्य निंद्य डोळेमोड

करण्यांत सादर ( तयार ). **ओळ ३.** बाळरंडेचें भाषण. **ओळ ४**–गोसाव्याचें तिला उत्तर.

## श्लोक १८६

**ओळ ४.** गोसाव्यांचें अगदीं थोडक्यांत वर्तनसार दिलें आहे.

## श्लोक १८७

**खटाळी**—खनपटीस बसे. **गटाळी**—गिळणें ( ? ) त्याला घरोघर भीक मागावी लागे. **सटाळी**—झुकांडी ( देतो. ) **फटाळी**—फटकळ बोले—तोंडानें वाटेल तसें अभद्र बोले.

## श्लोक १८८

गोसाव्याचें ढोंगी वर्तन. इकडे तर दुसऱ्याचा हातचें खायचें नाही असें दाखविणारा, पण सर्व यथास्थित पाहिजे. **भावी**—चिंतन करी.

## श्लोक १८९

**वरान्न**—वरण.

## श्लोक १९०

**अहारपोळी**–निखाऱ्यावर भाजलेली पोळी ( आरोळी ). **ओळ ४.** पांढऱ्या भाताच्या एवढा ढीग, कीं, तो जणु कैलास पर्वतच भासला. गोसावीबुवांचा आहार कांहीं कमी नव्हता !

## श्लोक १९१

**डोणें**–डोणा–द्रोण. **ओळ २.** द्रोणांना लांकडी किंवा दगडी डोणीचीच उपमा शोभली असती, इतके ते मोठे होते. **ओळ ३.** इतकें सर्व अन्न केव्हांच फस्त झालें, तें कळलें देखील नाहीं. चित्राहुती व जेऊन उरलेलें पान तेवढें राहिलें. तेंही खाल्लें नाहीं म्हणून बरें ! **चित्राहुति**—भोजन प्रसंगीं ब्राह्मण ताटाच्या बाहेर, चित्र, चित्रगुप्त, यम व यमधर्म यांच्या नांवानें जे घास काढून ठेवतात ते.

## श्लोक १९२

**ओळ २.** गुणिजनांनीं सभेला शोभा आणली. **बहुभर्तृका**—नृत्यांगना, वेश्या. **ओळ ४.** मुनिजनांच्या मनांतही मदनपीडा उत्पन्न करणाऱ्या.

## श्लोक १९३

**ओळ १.** ‘ जया ’ ज्यांत मुख्य आहे अशा सख्या. सीतेला तिच्या सख्या शृंगारसाज चढवितात. **नभोवर्म**—आकाशाचा पापुद्रा. **वर्म**—Bark, rind—( Apte ). नाद आकाशापर्यंत पोंचला असा भाव.

## श्लोक १९४

**मोहबंदी**—मोहाची आडकाठी. सर्व मोह सोडून दिला. **तोहबंदी**—तहबंदी—ऐक्याचें बंधन. चित्ताला त्यांनीं ऐकण्याचें बंधन घालून घेतलें. सर्वत्र ऐक्य स्वीकारण्याचें ठरविलें. **ओळ ३.** तांबड्या वस्त्राची अतिशय आवड.

## श्लोक १९५

**तोहबंद**—अंतरीयं—( राजव्यवहार कोश. ) An under-garment ( Apte ) पहा—“ नाभौ धृतं च यद्वस्त्रमाच्छादयति जानुनी । अंतरीयं प्रशस्तं तदच्छिन्नमुभयांतयोः । ”—

## श्लोक १९७

यांत डोकींतले दागिने दिले आहेत. **त्रिवेणी**--प्रयाग येथील, गंगा, यमुना व सरस्वती यांचा संगम ( त्याप्रमाणें ) तिपेडी. **त्रिगुणात्म**—सत्व, रज, तग, या तीन गुणांची बनलेली. पहा—विठ्ठल-सीता. ५।३४. **फरा**—पिंपळपान. **केतकिपत्र**—केवडा = बायकांच्या वेणींतील लांबट चौकोनी सोन्याचें फूल. **राखडी**—स्त्रियांचें एक केशभूषण.

## श्लोक १९८

**मूद**—स्त्रियांचें केशभूषण पहा— ‘ मुदेने मोदेना नळगुणगणीं जें गुण-गुणी । ’—रघुनाथपंडित. **नागबंद**—नाग—बायकांच्या डोकींत घालावयाचा

एक नागाकृती दागिना. पहा.—‘ नाग, मुदी, कंकण । त्रिलिंगी भेदिली खूण ’—अमृतानुभव ९।१२. **बंद्**—दोरी, नाडी. **नागबंद्**—कंबरपट्टा, असा अर्थ आहे, पण येथें तो लागू नाहीं. **भोकरें**—स्त्रियांचें कर्णभूषण. **कासव, मासा**—भोकरावरच घालण्याचे या आकाराचे मोत्याचे किंवा जडित दागिने असावे. कासव व मासा हे ईश्वराच्या अवतारांत समाविष्ट झाल्या-मुळें, त्या आकाराचे दागिने करण्याची रीत आहे. मासबाळी असावी. ( मासा and बाळी )—A fish-form ear-ornament of females. —( Molesworth. ) **मोर**—वेणींत घालण्याचा सोन्याचा किंवा जडित मोर असावा. **बोर**—बोराच्या आकाराचा बायकांच्या वेणींत घालण्याचा सोन्याचा दागिना. पहा—‘ राखडि सुंदर मूद बोरही ; ’—अमृतराय ५५. **कुहिरी**—कुइली. An ornament for the head. ( of females )—( Molesworth. )

## श्लोक १९९

**दाळिमावरी** इ०—डाळिंबावर राघू बसला आहे, असा सोन्याचा जडित, स्त्रियांच्या डोकींतील दागिना असावा. **बेल**—बेलफळ ( सोन्याचें ). **सालफळ**—एक लहान चिकाचें फळ. (A small gum-yielding fruit ) —( Molesworth ), असें सोन्याचें फळ करून डोक्यांत घालीत असावे. **आवळ्या** इ०—सोन्याचे आवळे. **आरसी**—अरसी-लहान आरसा.पहा— ‘ त्या आरशा घालुनि आंगठ्याला ’—साम. रुक्मि. ६।२७. डोक्यांत वेणीवर लहान आरसे बांधीत असावे. **चंपक**—चांफ्याचें फूल.

## श्लोक २००

**आवळें**—आवळून बांधी. **झबीसह्**—झुबी,-झुबकबाळी—An ear-ring having a cluster of pearls, coral &c., as a pendant. ( Molesworth ). **गोंडे**—नगगोंड्याच्या वेणीस शेवटास गोंडे असतात. ‘ गांठिझुबें ’ म्हणून स्त्रियांचा एक कानांतील अलंकर इकडे कुलवाडी लोकांत प्रचारांत आहे. **धिषण**—बृहस्पति. **कोंडे**—कुंठित होई. **नाडे**—

नाडा, वेणीचा अंगवळ. **पवाडे**—विस्तार, वर्णनंविस्ताराची नागेशाला जाणीव आहे.

### श्लोक २०१

**गंगावन**—तार्तरी किंवा नेपाळ देशांतील वनगाईच्या शेंपटीचे काळे केस; स्त्रियांचे केस कमी असल्यास, वेणी घालतांना हे त्यांत मिसळतात. **श्रोणी** इ०—वेणीच्या शेपटा मागें नितंबापर्यंत सुटला होता. **ओळी** ३।४. ती लांब सडक वेणी, जणु कृष्णसर्पिणीच असून ती रामाच्या मनाला दंश करावयास—त्याचें चित्त मदनपीडित करण्यास—जात आहे कीं, काय असें वाटलें.

### श्लोक २०२

**सीसफुल**—शिरः पुष्पं। ( राजव्यवहारकोश ). **हंसळी**—A collar of gold or silvsr. ( Molesworth. ) **पानें**—सोन्याची बारिक पानें. **पट्या**—पट्टया. **पत्रीय**—पानांच्या शेंवटीं लावलेले. **भांगरेखें**—भांगाच्या रेषेंत. **भांगटिळा**— तु ललामकम्–( राजव्यवहारकोश. ) = वेणीफणी, काजळ कुंकू इ० स्त्रियांचा शृंगार, नट्टापट्टा.

### श्लोक २०३

**चंद्र**—स्त्रिया कपाळावर जी अर्धचंद्राकृति गोंदतात ती कोर. **हंसा**—हाही एक गोंदण्याचा प्रकार असावा असें वाटतें. **ओळ** ४. भुवयांमध्यें शेंदराची टिकली लावली होती.

### श्लोक २०४

नाकांतले अलंकार. येथें नाकांतले ‘ बेसर, मोर, फुली व मोती ’ असे अलंकार दिले आहेत. ‘ नासापुष्पं तु बेसरम्, मुक्ताफलं मोती, फुली तु नासापुष्पं, ’ ( राजव्यवहारकोश ). **मोर**—नथेचा पर्यायवाचक नासालंकार. नथ किंवा चमकीचे हे पर्यायवाचक शब्द आहेत. याला समानार्थक पहा—“ भाळीं भांगटिळा, नासिकीं सुपाणी”—आनंदतनय–

पूतनावध श्लोक १८. " ल्याली असे बेसर दिव्य नाकीं "—साम. रुक्मि. ६।२५. " नासेंस मोती विलसे सुपानी "—साम. रुक्मि. ६।३४.

## श्लोक २०५

कर्णभूषणें. **भोंवरिया**—बुगड्या. पहा— " पै आकारा नांव भंवरी येर सोने तें सोने ॥ " ज्ञानदेवी—१३।९०३. " कृष्णश्रवण जडित भोंवरीं। कानीं घातली निर्धारीं ॥ " —एकनाथ—रुक्मि. १६।४०. **पंखे**—कानांतला दागिना. ( पंखबाळी ). **कोथिंबिरी**—कोथिंबिरीबाळी—कानांत घालावयाच्या बाळ्यांचा प्रकार. याला कोंथिबिरीच्या दाण्याच्या आकाराचे मोत्याचे घोस जोडलेले असतात. पहा—' कोथिंबिरी टोपण घोंसबाळ्या '—साम. रुक्मि. ६।२४. **खुंटबाळ्या**—स्त्रियांचें एक कर्णभूषण. **घोसबाळ्या**—मोत्यांचे घोस लावलेली कानांत घालावयाची बाळी. **जडिती**—रत्नजडित.

## श्लोक २०६

**तोंगले**—बुगड्या बाळ्या इ. कर्णभूषणास लाविलेला मोत्यांचा घोस; मोत्यांचें भोकर; कानांतील अलंकार. **काप**—स्त्रियांच्या कानांतील एक कुड्यासारखा दागिना. पहा—' काप गेले भोकें राहिलीं. ' **नागोत्तरें**—नाग हा नंतर कुंडलाकृति झाला म्हणून तिनें कुंडलेंच कानांत घातलीं. नागकुंडल या नांवाचा कानांतील एक अलंकार आहे. " नागोत्रा " An ornament, also called वाळ " असा Molesworth च्या कोशामध्यें एक शब्द सांपडतो, तोंही येथें सुचविला आहे.

## श्लोक २०७

**टिकमणि**—मण्याच्या टिका. **गरसोळी**—गळसरी.—गळसर—A neckless of ( glass or gold beads ) consisting of from four to eight strings, also a single string ; also a single bead ; ( Molesworth ). **दुलडी**—स्त्रियांचें एक दोन पदरीं कंठभूषण. **एकदाणें**—एकेरी मण्यांची माळ. यांत कांचेच्या पोतीमध्यें मधोमध एक

सोन्याचा मणी असतो. पहा—“ पेट्याचे एकदाणे, तदुपरि दुलडी कंठदेशीं तयेच्या ” —साम. रुक्मि. ६।२३.

### श्लोक २०८

**एकावळी**—एक पदरी माळ. कंठा. **अंबरसा**—अंबरचा लहान मुलांच्या गळ्यांतील एक दागिना. (फारसी–अन्बरचा) **पेटी**–बायकांच्या गळ्यांतील एक जडावाचा, लहान लहान पेट्या असलेला दागिना. चिंचपेटी. **चिताक**—हा अलंकार सोन्याचा असून मराठे स्त्रिया वापरतात. याचा आकार पट्ट्यासारखा असून, तो गळ्यांत सरीसारखा घालतात. नाथांच्या वेळींही तो गळ्यांतला दागिना होता. परंतु आठव्या शतकाच्या सुमारास तो कमरेचा दागिना होता असें दिसतें. (महाराष्ट्रशब्दकोश). पहा—‘ चितांक चिंताकुल लेत नाहीं’–साम. रुक्मि. ६।२८. **चिंचपटी**–चिंचपेटी, **मोहनमाळ**—‘ज्ञेया प्रालंबिका बुधैः’—राजव्यवहारकोश. गळ्यांत घातली असतां बेंबीपर्यंत लोंबणारी सोन्याची माळ.

### श्लोक २०९

**धुकधुकी**–ग्रैवेयकम्–राजव्यवहारकोश. गळ्यांत घालण्याचा दागिना. पहा–“ मुक्ताशेखर पोहच्या धुकधुक्या ’–साम. रुक्मि. ३।४२. **कारलें**—कारल्याच्या आकाराचा सोन्याचा दागिना. (स्त्रियांच्या गळ्यांतील सुटा किंवा एकाद्या माळेच्या मधोमध असलेला). पहा—‘ भोवऱ्या कारलें भांगार ’—वेणाबाई सीतास्वयंवर—११।५. **हयमल**—हयकोल–हैकोल (आरबी) An ornamental ring, worn around the neck (esp. by females)—Dictionary of the Persian and Engilsh languages, by Maulawi Fazl–i.–Ali, **अहिदोरा**–आयतोळा (?)–An ornament for the neck, amongst the शूद्र tribes. (Molesworth). **अहेवदोरा** (?) =मंगळसूत्र. **हंबेल**–हमैल--A neckless of flowers–(Dictionary of Persian and English Languages.) **मरुज**–मरुजः–A kind of perfume. (Apte) **निंबोळियांची**—निंबोण्यांची माळ, स्त्रियांचा सोन्याचा एक दागिना.

## श्लोक २१०

**ओळ ४.** कंबरेंतला कडदोरा, जरी कमर झणाणतो, तरी ( त्याच्याशीं स्पर्धा करणाऱ्या ) लहान लहान घागऱ्या किंवा घंटाबरोबर तो कमरेवर नांदतो. तो त्यांच्यासह तेथें राहतो.

## श्लोक २११

**बाजुबंद** — " बाहुमणिर्बाजूबंदाभिधायकः " — राजव्यवहारकोश. स्त्रियांच्या दंडातला दागिना. **तोळबंदी** — ' अंगदं तोलबंदः ' —राज्यव्यवहारकोश. दंडांत घालण्याचा वांकीसारखा स्त्रियांचा दागिना. **चुडे**—कांकण, बांगडी, ( स्त्रियांचें सौभाग्य ). **वांकीं**— ' कूर्परभूषणम् '—राजव्य० कोश, कोपरांतलें भूषण.

## श्लोक २१२

**सुवाळे**—हे हातांतले दिसतात. **जवे**—' मणिबंधस्तथा जवे, '—राजव्यवहारकोश. **हातसरे**—हातांत घालण्याचें कंकण. पहा ' हे पाटल्या हातसरास ल्याली, ' साम. रुक्मि. ६।२६. **काचांचिया**—काचेच्या.

## श्लोक २१३

**पोहची**—' स्यान्मणिकटः'—राजव्य. कोश. **सिका**—छाप. ठसा. पोहचीवर ठसा असावा. **ओळ २.** बोटांत नवरत्नांच्या अंगठ्या-**जेहगीर**—झिहगीर— A ring generally of bone, worn by archers on the right thumb. ( Dictionary of Persian and English Languages ). पहा—" त्या आरशा घालुनि आंगठ्याला, । ल्याली असे सुंदर आंगठ्यांला ।। साध्या बिलोरी नकशीजडीता, । दशावतारांकित मूर्तिमंता ।। ' साम. रुक्मि. ६।२७.

## श्लोक २१४

**पैंजण**—' नूपुरं स्मृतम्—राजव्य. कोश. **सांखळियां**—सांखळ्या. पहा—' ते जोड पायीं सज साखळ्यांचे. साम. रुक्मि. ६।३०.

## श्लोक २१५

**गुजऱ्या**—एक पायांतला दागिना. पहा 'चरणी वाळे घागरिया वाकी वरत्या गुजरिया' व्यंकटेशस्तोत्र ५६. **जेह्र**—झेवर—झिवर—An ornament of gems, gold or silver—Dictionary of Persian and English Languages. **ओळ ४.** वरील पायांतील भूषणांचा झणत्कार ऐकून मदनाचा जोर वाढावयाचाच.

## श्लोक २१६

**अनवट**—पायाच्या अंगठ्यांत घालावयाचा रुप्याचा दागिना. **पोल्हारियानें**—पोल्हार—पायाच्या अंगठ्यांत घालण्याचें बायकांचें एक चांदीचें भूषण. **विरोल्या**—वरीलप्रमाणेंच पायाच्या बोटांतील (स्त्रियांच्या) अलंकार. पहा—

अनवट निटल्या ही जोड त्या जोडव्यांचा,
अनुपम उमटे हा शब्द पोल्हारियांचा ।
रुचिरतर विरोल्या शोभती अंगुळीला,
कितियक नग लेतां भार झाला मुलीला. ॥

—साम. रुक्मि. ६।३१.

## श्लोक २१७

**मुकुर**—आरसा. **अंजन**—काजळ. **सारसाक्षी**—कमलाक्षी.

## श्लोक २१८

**बुंथि**—ओढणी. **ओळ ३.** सीतेचा भाव.

## श्लोक २१९

**गुरूची**—बृहस्पतीची.

## श्लोक २२०

येथून २६५ श्लोकापर्यंत, कवि सीतेच्या आपादमस्तक अवयवांचे वर्णन करीत आहे. **नखर**—नखें. **ओळ ४.** तीं पायाचीं नखें इतकीं

आरक्त होतीं कीं, नागाच्या पांच फणांवरील लाल मण्याप्रमाणें, तीं शोभत होतीं. **ओळ३।४.** रूपकालंकार.

## श्लोक २२१

बोटें व नखें. पायांच्या बोटांना पोवळ्याची वेल मानली, तर त्यांचीं नखें त्या वल्लीला येणारीं तांबडीं फुलेंच. **प्रवाळें**—कोंभ. **सुरगोप**—cochineal (Apte) किरमिजी रंग ज्याचा करितात, असा कृमि. (रानडे कोश). पहा—इंद्रगोप. तिचीं नखें जणु सुरगोपच होते. **ओळ १।२.** रूपक. **ओळ ३।४.** उत्प्रेक्षा.

## श्लोक २२२

**ओळी १।२.** तिचीं पायाचीं बोटें म्हणजें मदनाचे पंच शर होत. जग जिंकून झाल्यावर मदनानें ते तिच्या पायांच्या ठिकाणीं ठेविले आहेत. हेतूत्प्रेक्षालंकार.

## श्लोक २२३

**ओळ १।२.** तिच्या अंगुलींचा सरळपणा पाहून कमलांच्या देठांना आपल्या वाकडेपणाबद्दल लाज वाटून, तीं लाजेनें कांपू लागलीं. **पाउलराग**--पावलांचा रंग. तो इतका तांबडा कीं, प्रत्यक्ष अरुण त्यांस पाहून मनांत वरमला. व्यतिरेकालंकार.

## श्लोक २२४

व्यतिरेकाअलंकार. **अरुणभाव**--आरक्तता.

## श्लोक २२५

**पुरुषार्थ**—धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ. यांनीं तिच्या घोंट्यांच्या ठिकाणीं वतसतिच जणु केली. उत्प्रेक्षालंकार. **निर्लोमिका**—केश-रहित. **पोटरिया**—पिंढऱ्या. पहा-- ' त्या पोटऱ्यांची रुचिरप्रभा ते '—साम. रुक्मि ५।११६. **कमनीय**—सुंदर.

## श्लोक २२६

**जानु**—गुडघा. पहा.—जानुद्वयें सुंदर फार भीरू, ' साम—रुक्मि.

५।११७ **ऊरू**—मांड्या. पहा—' असेत त्या मांसल फार ऊरू '—साम—रुक्मि. ५।११७. मांड्या सुवर्ण खांबाप्रमाणें. **ओळी** ३।४. मांड्यांना केळी व हत्तीच्या सोंडेची उपमा दिली असती, पण केळी फार थंड तर हत्तीची सोंड फार कठीण. म्हणून या दोघांनाही उपमा देतांना वगळणें भाग पडलें. प्रतीपालंकार.

## श्लोक २२७

तिचे नितंब पीन कां, याबद्दल कवीनें हेतूत्प्रेक्षा केली आहे. अगस्ति ऋषीच्या भयानें विंध्य पर्वत जणु नम्र झाला, व त्यानें सीतेच्या नितंब-बिंबाच्या ठिकाणीं वसति केली. त्यामुळें नितंब येवढे स्थूल दिसूं लागलें. विंध्यपर्वत अगस्तीचा शिष्य असून, ऋषि दक्षिणेंतून परत येईपर्यंत नम्र होऊन राहण्याची आज्ञा, त्याला ऋषींकडून मिळाली होती. सारांश सीतेचा नितंबभाग ( नम्र झालेल्या विंध्याप्रमाणें ) पीन होता. पहा—' तीच्या नितंबास गुरुत्व साजे '—साम.—रुक्मि. ५।११५.

## श्लोक २२८

**मध्यास**—कंबरेस.—सिंहकटी. **ओळी** १।२. व्यतिरेकालंकार. पहा—' माजें जिच्या सिंहसमाज लाजे, ' साम. रुक्मि. ५।११५. **ओळ** ३।४. नितंबाच्या पीडेनें व त्याच्या सत्तेच्या भयानें, तिची कंबर संकोच पावली. कंबर बारीक होती, असा अर्थ.

## श्लोक २२९

**कांची**—कंबरपट्टा. **ओळ** ४. कंबरेच्या बारीकपणामुळें कांचीही बारीकच झाली. ती भुजंगाप्रमाणें लांब असूनहि, जणु काय भीतीनेंच आपली लांबी विसरली. उत्प्रेक्षालंकार.

## श्लोक २३०

कटि बारिक कां, याबद्दल कवि आणखी हेतूत्प्रेक्षा करतो. सीतेचें बाल्यावस्थेचें राज्य संपल्यामुळें, तिच्या कटीला जणु दारिद्य आलें. राज्य

गेल्यावर दारिद्य येणारच. सीतेचें बालपण संपून तिनें तारुण्यांत पदार्पण केल्यामुळें, तारुण्याचें चिन्ह जें कटीचें कृशत्व, तें तिच्या ठिकाणीं आलें. **सौराज्य**—चांगलें राज्य. पहा—'एको ययौ चैत्ररथप्रदेशान् सौराज्यरम्यान-परो विदर्भान्'—रघु. ५।६०. **ओळी ३।४.** आणखी हेतूत्प्रेक्षा. पूर्वी लहानपणीं, सीतेची कटि पीन होती. पण आतां तारुण्यांत तिच्या दोन स्तनांनींच जणु हल्ला करून व तिचें पीनत्व हरून नेऊन, ते स्वतः मात्र पीन झाले. सीतेचे स्तन पीन, व कटि कृश असा भाव.

## श्लोक २३१

**विधिकरुनि**—यथाविधि. **कष्टीं**—श्रमानें. **ओळ ३.** ती मुष्टमेय होती. ब्रह्मदेवानें जणु तिला आपल्या मुठींत धरूनच तिचें निरीक्षण केलें. **ओळ ४.** अशी सुंदर सीता आपली मुलगी आहे असें पाहून, आपल्यावर अमृतवृष्टीच होत आहे असें जनक राजास वाटलें. पहा. "किंवा हे तरि विश्वकर्मे पुतळी निर्मोनि मुष्टीं धरी। तेव्हां बारिक माज साच घडला मुष्टींत हा मातसे"। निरंजनमाधव--शिवसांबस्तुति ३६.

## श्लोक २३२

**गंभीर**--खोल. पहा--'चकित हरिणीप्रेक्षणा निम्ननाभिः'-मेघ. ८२. **ओळ ३.** जनकाची मुलगी हीच कोणी गंगानदी असून, तिची नाभि ही त्या नदींतील जणु भोंवराच ( आवर्त ) होता. **देहभाव सांडणें**—मोक्ष-प्राप्ति होणें. पहा--'नाभि हा अतिनिम्नकाय म्हणिजे हे तों सुधावापिका" निरंजनमाधव- शिवसांबस्तुतिध्यान ३५.

## श्लोक २३३

येथून सहा श्लोकांत रोमराजीचें वर्णन केलें आहे. **रोमराजी**—नाभी-पासून निघालेली केशावलि. **करवाळ**—तरवार. **कसाचा**—जोमदार. रोम-राजी ही तरवार झाल्यास, ज्या नाभीपासून ती निघाली ती (नाभि), त्या तरवारीची मूठच जणूं. पहा—"नाभीऱ्हदीं या मदनास थारा, रोमावली तत्तरवार धारा"—साम. रुक्मि. ५।११५. उत्प्रेक्षा.

## श्लोक २३४

सीतेचे स्तनद्वय हेच कोणी दोन पक्षी (गरुड). त्या दोन पक्ष्यांच्या भांडणाच्या वेळीं रोमावलीरूपी सर्पिणी भिऊन, जणु नाभिरूपी बिळांत शिरत आहे. भांडणाऱ्या पक्ष्यांच्या उपमेनें स्तनांचें पीनत्व दर्शविलें; तर रोमावलीला सर्पिणीच्या दिलेल्या उपमेनें तिचें कृष्णत्व व लांबी दर्शविली. उत्प्रेक्षालंकार.

## श्लोक २३५

ही नाभि नसून रोमराजीरूपी लतेचें तें आळेंच आहे. **ओळ १**— अपन्हुति. **ओळ ३।४.** किंवा ही रोमराजी म्हणजे, मदनाच्या दोन हत्तींच्या गंडस्थळांतून वाहणाऱ्या मदाची धाराच होय.—उत्प्रेक्षालंकार.

## श्लोक २३६

**चिद्घनाची**-ज्ञानरूपी मेघाची. मेघ काळाच असतो. **ओळ २.** नयनांत घातलेल्या काजळाची तारुण्यशोभाच जणु. उत्प्रेक्षालंकार. **त्रिलोकी**-त्रैलोक्य. ओळी ३।४. उत्प्रेक्षा.

## श्लोक २३७

**स्तनगुच्छ**—स्तनरूपी फुलांचे झेले. या फुलांच्या झेल्यांच्या आकर्षणानें ही रोमराजीरूपी भ्रमरपंक्तीच वर जात आहे काय! (उत्प्रेक्षा.) पहा—'गंभीरनाभीऱ्हदपार्श्ववर्तिनी विराजते लोममती मृगीदृशः। मुखारविंदस्य' रसाभिलाषिणी द्विरेफपंक्तिश्चलितेव नीरवा ॥—सुभाषितरत्नभांडागारम् । **त्रिरेखा**—पोटावरील तीन वळ्या. **ओळ ४.** रोमावळी हा त्या नद्यांवरील पूलच जणु. (उत्प्रेक्षा.) पहा—'या अत्यंत कृशोदरीं त्रिवळिका पाहा कशा शोभती। जैसा रोमलतेसि मंडप दिजे पावावया उन्नति'— निरंजनमाधव. 'वलित्रयं चारु बभार बाला।'—कुमारसंभव.

## श्लोक २३८

रोमराजीवर आणखी उत्प्रेक्षा. स्तनरूपी हतीच्या गंडस्थलांवरून

सुटलेली ही एक भृंगपंक्तीच, नाभिरूपी कमलाच्या आश्रयाला जणु आली! भृंग हे हत्तीच्या दानोदकासाठीं लुब्ध असतात. गंडस्थलापासून सुटल्यावर ते कमलाशिवाय दुसरीकडे कोठें जाणार? **ओळी ३।४.** किंवा ही रोमराजी म्हणजे मदनाच्या हत्तीची सोंड असून, ती खोल नाभिरूपी सरोवरास पाणी पिण्यास जात आहे. ( उत्प्रेक्षा ). नाभीपासून वर स्तनापर्यंत जाणाऱ्या रोमराजीवर वरील बहारीच्या उत्प्रेक्षा केल्या आहेत.

## श्लोक २३९

आतां स्तन. **हंसमाने**—हंस पक्ष्याप्रमाणें. **ओळ २.** हे दोन स्तन म्हणजे मदनराजाचे दोन पहिलवान. या दोघांचें मल्लयुद्ध आतां वक्षस्थलरूपी मल्लभूमीवर व्हावयाचें. ( हेतूत्प्रेक्षा. )

## श्लोक २४०

ते कुच नसून तारूण्यरूपी हत्तींचीं कठोर गंडस्थलेंच होत. (अपन्हुति). **ओळी ३।४.** तारुण्यरूपी सूर्याच्या तेजानें बाल्यरूपी पाणी आटून गेल्यामुळें, हे स्तन म्हणजे (पाण्याविना) उघडीं पडलेलीं बेटेंच जणु! (उत्प्रेक्षा). तारुण्याच्या उदयाबरोबर, बाल्याचा अस्त झाल्यामुळें, स्तन उन्नत दिसूं लागले असा अथ.

## श्लोक २४१

**रुद्रवीणा**—दोन भोपळ्यांची वीणा. **उरोज**—स्तन. **तुंबीफळ**—भोपळा पहा—न हि तुंबीफळविकलो वीणादंडः प्रयाति महिमानम्।—सुभाषितम्. **ओळ २.** स्तनद्वय हेच त्या रुद्रवीणेचे दोन भोपळे. **स्मरांग**—नारीवरांग. **सद्गुण**—त्या वीणेची तार. ( हेतूत्प्रेक्षा. )

## श्लोक २४२

**हेमवल्ली**—सुवर्णवेल. **प्रवाळें**—अंकुर.

## श्लोक २४३

**ओळ २.** सोन्याच्या केळीचे गाभेच जणु. **तळियांची**—तळ्यांची.

**पाळी**—कांठ. हाताचे तळवे हींच तळीं. त्याच्या काठीं लावलेल्या लहान केळी म्हणजेच सीतेचीं बोटें. ( उत्प्रेक्षा ).

## श्लोक २४४

सामुद्रिक चिन्हें. **रेखांकित**—पायांवरील रेषा. पहा—' वज्राब्जां-कुशऊर्ध्वरेखसहितें चिन्हें पदीं शोभतीं '—निरंजनमाधव. ' वज्रांकुशध्वज ऊर्ध्व ऱ्हस्वांबुज, चिन्हें देखे पृथ्विमंडळीं.---वामन–भरतभाव. **चक्रें**—पायाच्या बोटांवरील चक्रें. पहा—एक-चक्री सदा भोगी, द्विचक्री राज-पंडितः ।

## श्लोक २४५

**रेखात्रय**—कंठावरच्या तीन रेषा. पहा—याचा सोदर कंबु घेउनि असे हा दिव्य कंठाकृती । – निरंजनमाधव. 'स्मरस्य कंबुः किमयं चकास्ति दिवि त्रिलोकीजयवादनीयः ।–नैषधीयचरित.–२२।२२. गळयाला शंखाची उपमा नेहमीची आहे. ( व्यतिरेक ).

## श्लोक २४६

**ओळी** ३।४. हनुवटीवर कौशल्यानें काढलेला गोंदण्याचा बिंदु, तेथें बसलेल्या मुंगीप्रमाणेंच जणु शोभत होता. ( उत्प्रेक्षा ).

## श्लोक २४७

**दृग्दोष**–दृष्ट लागेल म्हणून. **अंजनबिंदु**—काजळाचें बोट. **ओळी** ३।४. किंवा तो गोंदित बिंदु हा जणु रोडावलेला राहु असून, त्याची दृष्टि तिच्या नाकांतील मौक्तिकरूपी चंद्रावर आहे. राहुचंद्रांचें वैमनस्य व राहूचा काळेपणा व चंद्राची दीप्ति प्रसिद्ध आहे. ( उत्प्रेक्षा ).

## श्लोक २४८

**प्रवाळें**—पोंवळीं. पहा—' वोष्ठीं पल्लवराग पूर्ण दिसतो संपक्व तुंडी फळें । किंवा विद्रुमखंड हे मिरविती माधुर्यधारा गळे ।।—निरंजनमाधव.

शिवसांब ५५. ( व्यतिरेक ). **ओळी ३।४.** हे ओठ नसून मुखांतील अमृतवल्लीपासून ऊद्भवलेले अंकुरच आहेत. ( अपन्हुति ).

## श्लोक २४९

**ओळ २.** पहा—‘ दंतपंक्ति जणु कुंदकळ्यासम दिसते विराजमान ’ —मेघदूत. कृष्णशास्त्री चिपळुणकर. ‘ मध्यें कुंदकळ्यासमान बरवी बारीक दंतावळी ’—निरंजनमाधव.

## श्लोक २५०

**ओळी १।२.** प्रतीपालंकार. तांबूल भक्षणानें दांत तांबडे झाले, म्हणून दाळिंबाच्या दाण्यांची उपमा. **चिऱ्याविराजित**—दोन दांतांच्या मधल्या ज्या बारीक चिऱ्या—भेगा, त्यांनीं तिचे सारखे दांत शोभत होते. तिचे दांत जणु हिऱ्याचे दगड असून त्यांमधील चिऱ्या म्हणजे नीलमण्यांचा बनविलेला चिखल होय. त्या चिखलांत त्या हिऱ्याच्या दगडांचें जणु बांधकाम केलें आहे. गवंडी लोक दगडाचें बांधकाम करतात. येथें तिचे दांत हे हिऱ्याचे दगड असून मधल्या चिरा म्हणजे नीलमण्याच्या चिखलाचें बांधकाम. ( उत्प्रेक्षा ). ‘पाहा—हीरकपंक्ति रम्य मिरवे रम्य प्रभा आगळी ’ —निरंजनमाधव. शिवसांब ५६. दांतांमधील चिरांमुळेंच दंत विलग दिसतात.

## श्लोक २५१

**विधु**—चंद्र. चंद्राचे कर्वतानें ३२ तुकडे सारखे केल्यानें, हे दांत झाले. चंद्रावरील जो काळा डाग त्याच्याच काळ्या चिऱ्या बनविल्या. (हेतूत्प्रेक्षा). पहा—‘ रदन दिसति जणु शशिबिंबाचे खंड मुखीं खोंविले ’—संशयकल्लोळ. अंक १. ( हेतूत्प्रेक्षा ).

## श्लोक २५२

**सोळा कळा**—चंद्राच्या कला. शुद्ध प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत कला-वृद्धि होते. **ओळी ३।४.** या कलांनीं पूर्वीं जो अंधकार भक्षण केला, तोच सीतेच्या दांताच्या चिऱ्यांत येऊन बसला. ( हेतूत्प्रेक्षा ).

### श्लोक २५३

**ओळी** १।३. व्यतिरेक. **नोबले**—न बोले. तिच्या अबोल्यानें **सर्वत्र** अंधकाराचें साम्राज्य पसरे.

### श्लोक २५४

कपोलवर्णन. **वोप**—पहा—‘ वोपा जशी शोभत सोनियाची ’। **मागें** श्लोक २७. **बिंबतें रूप**—कपोलावर इतर वस्तूंचें प्रतिबिंब **दिसावें,** अशी उज्वलता. ( उत्प्रेक्षा ). पहा—“ दोन्ही दिव्य कपोल ते **मिरवती** आदर्शबिंबापरी ”—निरंजनमाधव, सांबस्तुति ५५.

### श्लोक २५५

नासिका. **ओळ** १।२. प्रतीपालंकार. समानार्थक पहा—“ **आधीं** नासिक कीरतुंडसम हें, कीं नीट चांफेकळी। किंवा हें तिलपुष्प काय म्हणिजे शोभा दिसे आगळी॥” निरंजनमाधव–सांबस्तुति २३. **ओळी ३।४.** व्यतिरेक.

### श्लोक २५६

व्यतिरेकालंकार. पहा—“ नेत्र इचे अति चंचल देखुनि घालति **मत्स्य** जळीं शरिरासी॥ वर्तुळ आणि विशाळ विलोकुनि नित्य कुरंग फिरे **वन-** वासी॥ ”—अनंतकवि.

### श्लोक २५७

**चकोरें**—चकोरपक्षी. पहा—‘ चकोरीपांडित्यं मलिनयति **दृक्भंगि-** **महिमा** ’ काव्यप्रकाश उल्लास २, ‘ येतीं मुखासन्मुख हें चकोरें ’—**साम.** रुक्मि. २।५५.

### श्लोक २५८

नेत्रांचें आकर्णत्व. डोळ्यांनीं जी धाव घेतली, ती ते कानाच्या **आडांत** जाऊन पडावयाचेच. पण भ्याले म्हणून कानापर्यंतच थबकले. **आश्र-** **वण**—कानापर्यंत. **कर्णकूपकुहर**—कानाच्या आडरूपी खड्ड्यांत. **पहा—**

आकर्णांत विशाल रम्य दिसती भावे अनेकापरी "–निरंजनमाधव. सांब-स्तुति २१. ( हेतूत्प्रेक्षा ).

## श्लोक २५९.

**ओळी १।२.** डोळ्यांना मदनाच्या फाशांची दिलेली उपमा अभिनव आहे. ( उत्प्रेक्षा ). **ओळी ३।४.** पहा—" कांते विलोकुनि सुधाकर अष्टमीचा। म्यां मानिला निटिलदेश तुझाच साचा" नलोपाख्यान ७९.

## श्लोक २६०

सीतेच्या मुखानें चंद्राच्या धिःकार केल्यामुळें, त्याला अपमान सहन न होऊन तो अंतःकरणांत जळूं लागला. त्या जळण्यानें (दाहानें) जो काळा डाग चंद्रबिंबामध्यें दिसला, त्यालाच हल्लीं कलंक म्हणतात. ( हेतूत्प्रेक्षा ).

## श्लोक २६१

**चामर**–चौरी. **मयूरें इ.** पहा—'लाजेत ईचे कबरीस मोरें '–साम. रुक्मि. २।५५.

## श्लोक २६२

**ओळ १.**—अपन्हुति अलंकार. ती वेणी नसून भृंगपंक्तीच होती, व पाठीवरून मुखकमलाकडे जणुं जात होती. **ओळ ३।४.** तिची पाठ सोन्याच्या केळीच्या पानासारखी तेजस्वी होती.

## श्लोक २६३

भांगवर्णन. **धम्मिल्ल.**—अलंकार, फुलें, मोतीं, इ. गुंफून घातलेली वेणी. अशा अलंकृत वेणीरूपी राहूच्या पोटाचा भेद झाल्यामुळें, ग्रासलेला मुखरूपीचंद्र बाहेर आला. राहूचें फाटलेलें पोट मिटावयाचें, पण भीतीनें अर्धोन्मीलित राहिलें, व जी फट राहिली त्यालाच भांग अशी संज्ञा मिळाली. राहू चंद्राला ग्रासतो हें प्रसिद्ध आहे. कृष्ण केशकलापावर राहूचा व मुखावर चंद्राचा आरोप येथें केला आहे. केशकलाप व मुख यांचें सानिध्य, यांस कारणीभूत आहे. केशकलापावरून राहूच्या भिन्न

पोटाची, जी भीतीनें अर्धोन्मीलित मधोमध फट राहिली, तोच भांग. ( हेतूत्प्रेक्षा ).

### श्लोक २६४

**केशावली**—'केशोपलीं' असा शब्द पाहिजे. **केशोपल**—कशरूपी निकषाचा काळा दगड भांग म्हणजे या केशरूपीं निकषावर ओढलेली एकसारखी सोन्याची रेषाच जणु! ( उत्प्रेक्षा ). **मुदिर**—मेघ. किंवा ही भांगरेखा म्हणजे मेघांतील विद्युल्लेखाच! ( उत्प्रेक्षा ). **ओळ ३.** किंवा हा भांग म्हणजे नीलाकाशांतून येणारी मंदाकिनीच. ( गंगा ) ( उत्प्रेक्षा ).

### श्लोक २६६

**माडियेसी**—पहा—' पहाया वैदर्भी मग उपर माडीवरि चढे "— साम. रुक्मि. ७।८४.

### श्लोक २६७

**झरोका**—लहान खिडकी, जाळी, गवाक्ष. पहा—' मुखांबुजीं रोधिति ज्या झरोखे '— साम. रुक्मि. ७।६७. सीता, स्वयंवरास जमलेल्या राजांचें निरीक्षण करते.

### श्लोक २६८

**आप्त**—जास्त ओळखीचे, नात्यांतले. **ओळी ३।४.** 'जया' नांवाची सखी, सीतेला सर्व सभासदांची नांववार ओळख करून देते. रघुवंशांतील ६ व्या सर्गांत सुनंदा दासी, अशीच इंदुमतीला सर्व राजांची ओळख करून देते. हेंच वर्णन नागेशानें आपल्या या वर्णनास आधारभूत धरिलें आहे. **जया**—सीतेच्या सखीचें नांव.

### श्लोक २६९

येथून राजांचें वर्णन सुरू होतें. **ओळ २.** कोंकणस्थांची बुद्धि चलाख असते ही प्रसिद्धि, नागेशाच्या काळींही होती असें दिसतें. **तमालकरानें**—

तमालवृक्षाचीं वनें. पहा—‘ अनेन सार्धं विहरांबुराशेस्तीरेषु तालीवनमर्मरेषु ’। रघु. ६।५७.

### श्लोक २७०

**शतवाजी**—शंभर घोडे. **हेशतवाजी**—खिकाळणारे घोडे.

### श्लोक २७१

**दक्षिणांत**—दाक्षिणात्य राजा. पहा—“ अनेन पाणौ विधिवद्गृहीते महाकुलीनेन महीवगुर्वी । रत्नानुविद्धार्णवमेखलाया दिशः सपत्नी भव दक्षिणस्याः ॥ ”—रघु. ६।६३. **शरासन**—धनुष्य.

### श्लोक २७२

**भा**—कांति. **परिभावि**–जो राजांना जुमानीत नाहीं. परिभाविन्—Setting at naught, defying, ( Apte. ) **अनुभाव**—शक्ति, तेज, सत्ता, पहा—‘ अनुभावविशेषात्तु सेनापरिवृताविव ’, ।—रघु. १।३७.

### श्लोक २७३

राजांच्या हालचालींचें वर्णन. यालाही रघूच्या ६ व्या सर्गाचा आधार आहेच. **ओळ २**—कानापर्यंत तोंड पघळून कोणी राजा आपले दांत दाखवीत होता.

### श्लोक २७४

**ओळ १**—पहा–‘ वज्रांशुगर्भांगुलिरंध्रमेकं व्यापारयामास करं किरीटे’। रघु. ६।१९. **ओळ ४**. पहा—‘ तिर्यग्विसंसर्पिनखप्रभेण पादेन हैमं विलिलेख पीठम् ’ । रघु. ६।१५.

### श्लोक २७६

**ओळ ३**. सीतेचे उद्गार. **राजसा**–रामा. **निचयीं**–समुदायांत.

### श्लोक २७७

**सिरताज**—सरताज—A chief, ( Dictionary of Persian and English Languages ), **निरता**—निःशेषें रत व्हा.

## श्लोक २७८

दासी, आतां रामाची वंशावळ सांगते. **जयाची**—यशांची. **ओळ ३.** पहा—" वैवस्वतो मनुर्नाम माननीयो मनीषिणाम् '—रघु. १।११. दिलीपानें नंदिनीची सेवा केली, म्हणून त्याला तिच्या प्रसादानें रघु हा पुत्र झाला. हें वर्णन रघूच्या दुसऱ्या सर्गावरून घेतलें आहे.

## श्लोक २७९

**बहुसाल**—पुष्कळ. **मानवि**—मान्य होई. **ओळी** ३।४. या ओळी रघुवंशाच्या ५ व्या सर्गातील पहिल्या दोन श्लोकांवरून रचल्या आहेत. पहा—' तमध्वरे विश्वजिति क्षितीशं निःशेष विश्राणितकोशजातम् । उपात्तविद्यो गुरुदक्षिणार्थी कौत्सः प्रपेदे वरतंतुशिष्यः " ॥ रघु. ५।१. " स मृण्मये वीतहिरण्मयत्वात्पात्रे निधायार्घ्यमनर्घशीलः । श्रुतप्रकाशं यशसा प्रकाशः प्रत्युज्जगामातिथिमातिथेयः " । रघु. ५।२. **विश्वजिती**—या नांवाचा यज्ञ. **भूपात्र**—मातीचें भांडें. वर ' मृण्मये वीतहिरण्यमयात् ' हे शब्द पहावे. **विभूति**—भस्म.

## श्लोक २८०

वरतंतूचा शिष्य कुत्स, रघूकडे आला व गुरुदक्षिणेसाठीं द्रव्य मागूं लागला. **मनुसंख्य**—मनु—A symbolical expression for the number ' fifteen ' – ( Apte ). १५ कोटी नाण्यांची दक्षिणा मागितली.

## श्लोक २८१

**पवाडें**—पराक्रमानें. **आशिर्वदला**—' सुपुत्र होईल ' असा रघूला आशीर्वाद दिला. **अज**– राजा. इंदुमतीचें स्वयंवरवर्णन रघुवंशाच्या सहाव्या सर्गात आलें आहे.

## श्लोक २८२

**ओळ २. अजानें**—अज्ञान. Ingnorant—( Molesworth ). **सर्वघटीं**—सृष्ट जीवांच्या ठिकाणीं समदृष्टि, ज्याची सर्वांवर सारखी दृष्टि आहे.

**ओळ ४.** इंदुमतीचें स्वयंवर आटपून सन्मानानें जे आपल्या घरीं ( नगरीस ) आले.

## श्लोक २८३

दशरथवृत्त. **कलभ**—हत्तीचें पिल्लूं. दिग्गजाला कलभ व्हावा, तद्वत् ओघानेंच अजाला पराक्रमी दशरथ पुत्र झाला. **शुक्राचार्य** असुरांचा गुरु. इंद्राला देवाच्या बाजूनें मदत करावयास गेलेल्या दशरथानें याचा पराभव केला. **प्रीतिपानें**—प्रीतीनें दिलेल्या पेयाचें अनेक वेळ प्राशन.

## श्लोक २८४

**पुत्रेष्टि**—पुत्र होण्यासाठीं यज्ञ. पुत्रकामेष्टि.

## श्लोक २८५

दासी रामाबद्दल सीतेस सांगते. **ओळ** ४. पहा—' शृगालसंघांतुन सिंह जैसा '—सामराज. रुक्मि.

## श्लोक २८६

**खद्योत**—काजवा. **द्युमणि**—सूर्य. सूर्यापुढें जशी काजव्याची स्थिति. **नलिनी**—ही सूर्यविकासी असल्यामुळें चंद्रोदयास ती मिटते. **ओळ ३.** पंडित ज्याप्रमाणें मूर्ख लोकांना लेखतो. ( भावि ). **उलूक**—घुबड.

## श्लोक २८८

रामाचें वर्णन. **विभा**—प्रभा. **त्रिजगतीसदनाची**—त्रैलोक्याची.

## श्लोक २८९

**तोरा**—डौल. " संपत्तीचा त्यापुढें काय तोरा. "—वामन. **महासा**—महा, असा. **जयाचा**—ज्याचा. (ओळ १.) **ओळ** ३. हा राम संसाराला योग्य अशा वयाची स्थिति प्राप्त झाला आहे. **भवभाव**—संसाराला योग्य अशी स्थिति. हा राम आता वयांत आला आहे, असा अर्थ. **ओळ ४.** **भवभावला**—( तुझा ) होणारा ( भव )भावला ( नवरा ) पाहावयाचा आहे.

## श्लोक २९०

रामाच्या शस्त्रांचें व पराक्रमाचें वर्णन. **ओळ २.** त्याच्या बाणाचें नातें शत्रूच्या वक्षःस्थलाशींच असतें. शत्रूला अचूक बाण मारणारा.

## श्लोक २९१

**टिका घेणें**–हक्कदार होणें. जो यशाचा हक्कदार आहे. **नभस्पर्शनातें**–भाल्यास नभस्पर्श व्हावा, इतका उंच भाला घेणारा. **मानणें**–मान्य होणें.

## श्लोक २९२

**बागदार**—गुप्ती. **समशेर**–( फा. ) तलवार. **पुराणी**–पराणी, टोचणी. **विभाकर**–तेजस्वी तळपणाऱ्या ( बाडें याचें विशे. ) **बाडें**–शस्त्राच्या धारेनें. **करबाडें**—गुरांनीं खाऊन उरलेला व तुडविलेला कडब्याचा गाळ.

## श्लोक २९३

**वारे**—निवारण होई, दूर होई, मरे. **परजाला**—परज–तरवारीची किंवा ढालेची मूठ. **ओळ. ४. दिव्यमार्गपर**—उत्तम गति मिळणारा. समरांगणांत रामाच्या हातून मरणाऱ्या शत्रूस सद्गति मिळे.

## श्लोक २९४

**जमदाडे**—एक प्रकारची मोठी तरवार. **ओळी ३।४.** ही तरवार पाहूनच शत्रूची बोबडी वळे. मग तिचा वार लागला तर तो काय करील कोण जाणे !

## श्लोक २९५

रामाच्या घोड्याचें वर्णन. **ओळ ३. पर**–पिसें. **हुमिया**–हुमा (फा.) घोड्याच्या डोक्यावरचा पिसाचा तुरा. घोड्याच्या डोक्यावरील तुऱ्यांच्या पिसांनीं, ते घोडे शोभत होते. **यांचे**—शत्रूचे.

## श्लोक २९७

रामाच्या घरच्या घोड्यांच्या जाती. **अरब्बी**—स्यात् पारसीकः— (राजव्य. कोश.) अरबस्तानांतील. **बदक्षान**–बदकशाम (शुभकारक) घोडा. बदकशान नांवाच्या शहरावरून. **ताजी**—मद्रजस्तु भवेत्ताजी–(राजव्य.

कोश.) **तुरकी**—वल्गनः स्मृतः ।–(राजव्य. कोश.) One who gallops, दुडकी चालीचा. **रुमी**–रोमन. **पर्वती**–पर्वतीयस्तु टांकणः–(राजव्य. कोश.) लहान जातीचा घोडा. **घुट्ट**–(?) गिड्डया जातीचा (?). **कच्छी**–कच्छी जवन उच्यते–(राजव्य. कोश.) **इराखी**—यावनः स्मृतः–(राजव्य. कोश.) **फिरंगी**—पोर्तुगीज. **येंबिये**–कांबोजचा अपभ्रंश तर नसेल ? कांबोजचे घोडे प्रसिद्ध होते.

## श्लोक २९८

**सारंग**–Dark bay colored horse. **सुमेद**–कुमैत (?) श्यामलस्तु कुमैतः स्यात्–(राजव्य. कोश.) **नीळे**–नीलः कर्कः परिज्ञेयः–(राजव्य. कोश.) **पंचकल्याण**–गुडघ्यापर्यंत पांढरे पाय, व तोंडावर पांढरा पट्टा असलेला घोडा. हा शुभ असतो. **जर्दे**–जरदा नाम पाटलः–(राजव्य. कोश.) **बनोजी**—बनोसी–फिक्या डाळिंबी रंगाचे (?) **अवलख्ख**–कर्बुरस्त्वबलखो नाम–(राजव्य. कोश.) चित्रविचित्र रंगाचा, सर्व शरीर लाल असून त्यात पांढरे, काळे जर्दे पट्टे असलेला घोडा. हा फार दुर्मिळ आहे **तेजी**—तेजस्वी तु भवेत्तेजी.—(राजव्यव.कोश.) या घोड्यांच्या नांवांन समानार्थक पहा—विठ्ठल–सीतास्वयंवर ६।११,।१५.

## श्लोक २९९

**दानीं**–मदोदकानें. **ओळ २.** ( हतींच्या ) सोंडेवर वेलबुटी काढलेले. **रदानीं**–दांतांनीं. **ओळ ४.** काळे हत्ती रस्त्यांतून चालले असतां ते पृथ्वीवर अवतरलेल्या मेघांप्रमाणें जणु भासत. ( उत्प्रेक्षा. )

## श्लोक ३००

“ रामाच्या घरच्या हत्तीवर बसण्यांत अतुल सुख आहे, रामाच्या सुखाला उणेपणा ( जरा ) नाहीं ” अशी भावना सरहद्दीवरील प्रांतांत राहणाऱ्या ( देशांतक ) हिमालयनिवासी ( हीमवासनाही ) राजांच्या मनांत असते.

### श्लोक ३०१

**वर**—नियोजित पति. **वरमान**—श्रेष्ठप्रतीचा मान. **आनंदशेजें**—स्वात्मानंदाच्या सुखशय्येवर.

### श्लोक ३०२

**जयामुखें**—जया नामक सीतेच्या सखीच्या तोडानें. **ओळ** २. विदेहानें पुढें काय केलें तें पहा. **वाडें**—थोर. **निवाडें**—हौसेनें.

### श्लोक ३०३

**बहुवस्त**—बहुवस—फार. **अलोभ**—लोभ किंवा भीड न धरितां. **भवाचें**—शंकराचें. **श्लोक ३०३ (अ)** जनकाची घोषणा. **एकमान**—प्रमाण. **ये कमाने**—जो या धनुष्याच्या कमानीस दोरी चढवील. हा श्लोक पूर्वी आला आहे. पण येथें यांत थोडा फरक केलेला दिसतो.

### श्लोक ३०४

**ओळ** २, किंवा येथन उठून जावें. **पराङ्मुख**—पराजित होईल.

### श्लोक ३०५

**सद्गद**—कंठ दाटून आला आहे असे. **ओळ** ४. त्यांना जणु दावाग्नीची आग व कंप लागले होते. जनकाचा कठिण पण ऐकून राजांच्या अंगाची रागानें लाही झाली, तर पणाच्या अशक्यपणामुळें त्याच्या अंगाला कंप सुटला.

### श्लोक ३०६

प्रचंड धनुष्याला पहून राजे कल्पना करतात. **पर्वतकाय**—पर्वताच्या शरीराचा.

### श्लोक ३०७

**काळदंड**—यमदंड. **वरविघ्न**—मोठें संकट. **अर्गळ**—अडसर. हें धनुष्य म्हणजे आम्हांला स्वयंवराच्या मार्गांत मोठा अडसरच होय.

### श्लोक ३०८

**ओळी १।२.** पहा.—' कीं आड आलें दुरदृष्ट माझे ? '–साम. रुक्मि. १।१०. **ओळ ४.** या धनुष्यरूपी महामृत्यूपुढें आतां हे सर्व राजे काय वांचतात !

## श्लोक ३०९

हे प्रचंड धनुष्य रामाला उचलणार नाहीं. मग तो कसचा आपल्यास लाभतो, असें, वाटून सीतेला देखील तें धनुष्य म्हणजे एक मोठी दैवी आपत्ति भासली, व ती आपल्या सखीला म्हणते. **अदृष्ट**—दैव. **सर्पाकृति**–सर्पाच्या आकाराचें, प्रचंड. शिवाय मार्गांत साप आडवा येणें, अपशकुन मानतात. सीतेच्या रामलाभाच्या मार्गांत हा धनुष्यरूपी सर्प आडवा येणें, तिला अपशकुन वाटला.

## श्लोक ३१०

**प्राप्त**–कृतार्थ. दुसऱ्या ओळीपासून फलज्योतिष शास्त्राप्रमाणें आपल्या राशीला कसें अनिष्ट ग्रहमान आलें आहे, हें सीता सांगत आहे. हें धनुष्य तिला अनिष्ट येणारा प्रत्येक ग्रह वाटला, असा भाव. **आठवा बृहस्पति**–स्वतःच्या राशीपासून, गुरु ( किंवा दुसरा ग्रह ) ज्या राशीला असेल तेथपर्यंत मोजल्यास जर आठ आंकडा भरत असला तर गुरु ( किंवा तो ग्रह ) आपणांस आठवा आला असें समजतात. अशाप्रमाणें ग्रह ४ था, ८ वा व १२ वा येणें, फलज्योतिषशास्त्रांत अनिष्ट मानतात. धनुरूपी गुरु आपल्याला ८ वा आला ( अनिष्ट ) असें सीतेला वाटलें. **वक्रकेतु**—फलज्योतिषांत मार्गी होणें व ' वक्री होणें ' अशी परिभाषा आहे. एकादा ग्रह ज्या राशीस असेल त्यापासून ओघानें पुढच्या राशीस जाण्याच्या ऐवजीं मागच्या राशीस अचानक आला तर तो ' वक्री झाला ' असें म्हणतात. तो राशिपरत्वें इष्टानिष्ट फळ देतो. सीतेला तें धनुष्य वक्र गतीनें आलेल्या केतूप्रमाणें, तिच्या राशीला अनिष्ट फल देणारें भासलें.

## श्लोक ३११

मंगळ हा ग्रह क्रूर असून पीडा देणारा आहे. सीतेला तें धनुष्य क्रूर मंगळ वाटला. **वेडाविलें**—वेड लावलें. **ओळ** ३।४. त्याचप्रमाणें शनि हा देखील क्रूर ग्रहच मानतात. हा कोदंडरूपानें येऊन आपणास पीडा देत आहे असें, सीतेस वाटलें. शनीची साडेसाती प्रसिद्ध आहे. **भोगी**–त्रास देणारा. ‘ भोगीं ’ असा पाठ स्वीकारल्यास भोग = ताऱ्याचें शरवृत्त आणि उत्तरायणपातांतील शरवृत्त या पातळ्यांमध्यें जो कोन होतो, त्याला त्या ताऱ्याचा भोग म्हणतात–सूर्यसिद्धांत. पण नागेश इतक्या खोलांत शिरतो काय? **वरविघ्नयोगी**—मोठ्या संकटाचा योग घडविणारा. वरील वर्णनांत बहुतेक सर्व क्रूर ग्रहच घेतले आहेत.

## श्लोक ३१२

कोदंडाला जर केतुग्रह असें नांव दिलें तर, त्यानें मला ग्रहण लावून पीडा दिली असें होईल. कोदंडरूपी केतूनें सीतारूपी चंद्राचा ग्रासच केला. सीतेला धनुष्याचें ग्रहण लागलें, रामाबद्दल तिला आशा वाटेनाशी झाली. **ओळ** ४. स्वयंवराचा नादच सोडलेला बरा. नागेश वृत्तीनें जोशी असल्यामुळें त्याला फलज्योतिषाची माहिती असणें स्वाभाविक आहे.

## श्लोक ३१३

रामाला धनुष्याचा भार सहन होणार नाहीं, असें समजून सीता सर्व देवांना त्यांच्या मदतीस येण्यासाठीं त्यांचा धांवा करते. **सकुमार**–( राम ) **कुमार**—कार्तिकस्वामी. **साहे**—साह्यास. **रसा**–पृथ्वी. “ माझी आई पृथ्वी जर मला पावेल तर तिच्या कन्येचें आयुष्य नीरस होणार नाहीं. ” पृथ्वीनें प्रसन्न होऊन रामाला धनुष्य हलकें करून द्यावें, असा सीतेचा भाव.

## श्लोक ३१४

**रानें लावणें**– विघ्नांना पळवून लावणें, नाश करणें. **याला**–रामाला.

## श्लोक ३१५

**जनके**—जननी. **धनुकेतु**—धनुरूपी धूमकेतु. **हळु**—हलकें. पहा—'इयेशीं हळू जाहल्या उंच गेल्या—' दमयंतीस्वयंवर १६३.

## श्लोक ३१६

**मेहुणें**—दंपत्य. **सातें**—सहित. 'मी रामासह नवीन दांपत्यानें तुझ्या दर्शनास येईन' असा सीतेचा नवस. **जगती**—पृथ्वी.

## श्लोक ३१७

**आस.**—आशा (सफल होवो). **वाटें लावणें**—घालविणें, निरोप देणें.

## श्लोक ३१८

सीता सर्व देवांना विनविते. **याचा**—धनुष्याचा. **सहसारयाचा**—साऱ्यांच्या—सर्वांच्यासह जो भार वाटणीला येईल तो रामाला द्यावा, अशी सीतेची देवांना विनंति. **भंगो**—(रामाच्या हातून) भंग पावो. (व तो पण जिंको.) पहा—" ती भूमीसि म्हणे 'उमानिधनुषा! रामासि साह्या करीं। शेषा लोटिं शरासनासि तपना ओढीं सहस्रा करी ॥ शंभूकार्मुक आवरीं दशभुजीं पृष्ठासि कूर्मा धरीं। चापा दिग्गज हो! धरा विधि! तुवां होई हळूं तें करीं." ॥ —विठ्ठल सीतास्व. ५।१२.

## श्लोक ३१९

**सुकृतराशि**—पुण्यसंचय, पहा—' वानूं किती सुकृतसंघ सख्या तयाचे—' दमयंतीस्वयंवर ६९. **जीन**—जगेन.

## श्लोक ३२०

**कमठपृष्ठकठोर**—कांसवाच्या पाठीप्रमाणें कठीण. **साजणी**—हे सखे प्रस्तुत श्लोक हनूमन्नाटकांतील पुढील श्लोकाचें भाषांतर आहे.—"कमठपृष्ठकठोरमिदं धनुर्मदनमूर्तिरसौरघुनंदनः। कथमधिज्यमनेन विधीयतामहह तात पणस्तव दारुणः ॥"—हनूमन्नाटक १।९.

## श्लोक ३२१

पुढील दोन श्लोकांत सीतेची सखी, तिच्या वरील भीतीचें परिमार्जन करते. राम लहान असला म्हणून काय झालें? "लहान मूर्ति पण थोर कीर्ति,' अशांचीं उदाहरणें ती आपल्या विधानाच्या समर्थनार्थ देते.

## श्लोक ३२२

**कामदुघा**—कामधेनु. **स्वसुखी**—स्वजन सुखी (करी.)

## श्लोक ३२३

**ओळ १.** समानार्थक–'रत्नं समागच्छतु कांचनेन'–रघु. ६. राम सांवळा म्हणून निळाच्या खड्याची उपमा दिली आहे. **जोडा** (क्रि.)= बसवा.

## श्लोक ३२४

रावणाचें स्वयंवरसभेस आगमन. नागेशानें येथें अर्थानुकारी शब्दरचना योजली आहे.

## श्लोक ३२५

रावणाच्या धाकानें इतर राजे भ्याले, त्यांचे उद्गार. **उरीं फुटणें**—काळजीनें व्याकुळ होणें. **धोंडी**–धोंड, मोठी अडचण.

## श्लोक ३२६

रावणाच्या भयानें राजांची झालेली त्रेधा, वर्णन केली आहे. कोणाला थंडीच येते, तर कोणाला लघुशंका होते इ. **तिजा**—तिसरा. **शारें**–शहारें, कांटा. **झांकपाळी**—झांक = मारा, चुणुक. थंडीच्या माऱ्याची पाळी. **ओळ ४.** पटक्यानें कानपट्टी बांधतो.

## श्लोक ३२७

**विंशतिनेत्रशंका**—विंशतिनेत्र = वीस डोळ्यांचा (रावण). **शंका**–भीति. रावणाची भीति. **ओळ ३।४.** वास्तविक रावणाच्या भयानें दुसऱ्या ओळींत वर्णिलेली फजीति झांकण्याकरितां, त्यानें शैत्याचें निमित्त पुढें केलें आहे.

## श्लोक ३२८

खरें पाहिलें तर, या राजाला धनुष्याजवळ जाण्याची छातीच नाहीं, पण आपण लांब राहूनच सर्व प्रकार कां बघतो, यांचें तो दुसरेंच कारण देऊन, आपला आब सांभाळूं पाहात आहे.

## श्लोक ३२९

आणखी कोणी राजा, मुळीं धनुष्याच्या भानगडींत पडतच नाहीं. त्यानें पोटशुळाच्या व्यथेचें कारण पुढें केलें आहे. **साधक**–उपकारक. ( बरें करणारा ) **बाहा**—बोलावा.

## श्लोक ३३०

**हा**—आणखी कोणी राजा, पांच भूतांनीं पछाडलेला. याला कोणता पंचाक्षरी अंगारा लावील ? **पंचाक्षरी**–भूतबाधा काढणारा. 'पंचभूतीं'–पंचमहाभूतांनीं असा श्लिष्ट व पारमार्थिक अर्थही अभिप्रेत असेल. **म्हैसासुर**—महिषासुर—म्हसोबा, रावण. या म्हैसासुराच्या प्रभावानें वरील धांदल उडाली. **अनुभाव**–प्रभाव. **लक्षा**–पहा. **ओळ ४.** या पीडेच्या निवारणार्थ 'रामरक्षा' च म्हटली पाहिजे. किंवा या म्हैसासुरापासून रामानेंच रक्षण केलें पाहिजे.

## श्लोक ३३१

येथून रावणाच बढाईखोर भाषण सुरू होतें. त्याचा असा अभिनिवेश कीं, आपण पंचमहाभूतें सुद्धां आपल्या धाकांत ठेविलीं असून, त्यांना आपण कस्पटाप्रमाणें लेखतों. **सर्षप** मोरी ( एवढा ). **आभास**–तेज. आभासाला (तेज या महाभूताला) घागरींत घालणारा. **दिक्चक्रें**—अष्टदिशा. **कैलासपुरी** इ०—कैलास चेंडवाप्रमाणें हातांत धरणारा.

## श्लोक ३३२

निरनिराळ्या देवांना रावणाच्या घरीं काय काय कामें करावीं लागत, हें पुढील दोन श्लोकांत सांगितलें आहे. **पुष्पें** इ०–याला समानार्थक

पहा—" प्रसन्न केला शिव भोळा । भय नाहीं कळिकाळा । इंद्रा हातीं गुंफविल्या माळा । ग्यां रावणानें " ॥ १ ॥ **दीपप्रचर्या**—Defusion of light. **जळाधिप**—वरुण. **पचन**—शिजविणें. **वैश्वानर**—अग्नि. **सटवी**—प्रारब्धदेवता. **बंदखानीं** बंदिखान्यांत, तुरुंगांत.

## श्लोक ३३३

**विघ्न**—इ० हें काम अनादिकालापासून त्याच्याकडे आहे. तो विघ्नहर्ता आहे. **नगरीं इ०**—विष्णु नेहमीं क्षीरसमुद्रांत राहतो. (अर्थात् रावण-भयानें!) **शेषाचा इ.**—पृथ्वी धारण करणाऱ्या शेषाच्या डोक्यांतील **मणि** रावणानें आपल्या मंडपास हंडीसारखा लावला. **निरुता**—खरोखर. **योषांस**—रावणाच्या घरच्या बायकांस. **ओळ ४.** असा ज्याचा प्रभाव त्याला हें शिवधनुष्य कांवटाप्रमाणें वाटल्यास नवल काय? वरील दोन्ही श्लोकांना समानार्थक पहा:—"राजे थोर धरातळीं अतिबळी ते रावणें जिंतिले, । स्वर्गींचे सुर गेहकार्यकरणीं जेणें सदा योजिले ॥ पाताळीं उरगांगाना हरुनिया चूडामणी घेतले । द्वारीं नित्य उभे नवग्रह, असे बंदीं किती घातले ॥"—निरंजनमाधव-मंत्ररामचरित, श्लोक. २ पहा— **विठ्ठल** सीतास्वयंवर ४।२१, २२.

## श्लोक ३३४

यापुढची रावणाची बढाई विलक्षणच आहे. **ओळ १.** ' आकाश-पातळ एक करीन ' अशी म्हण रूढ आहेच. **कूर्माचे इ०**—आदिकूर्माची पाठ काढून तिचें ठावकें किंवा पणती करून त्यांत मी दिवा लावीन, असा माझा प्रभाव. **तारामौक्तिक इ०**— आकाशांतील तारामौक्तिकांना खालीं ओढून, त्यांचा तुरा करून मीं आपल्या डोकींत खोवीन.

## श्लोक ३३५

मी माझ्या नुसत्या नखानें या ब्रम्हांडाचीं दोन शकलें ( तुकडे) करीन. ( हीं मग नगाऱ्याच्या टोपणाप्रमाणें भासतील ). अष्टदिग्गजांचीं कातडीं

काढून मी वरील नगाऱ्याच्या टोपणांना तीं चिकटवीन, म्हणजे त्यांचे दोन नगारे तयार होतील. हे नगारे वाजविण्यासाठीं प्रत्यक्ष यमाच्या भुजदंडांचा मी कुडपण्याप्रमाणें उपयोग करीन, व अशा रीतीनें हे नगारे ( दमामा ) वाजतील. **कुडपुनी**–कुडपणी–लहान जाड काठी. हा शब्द कोल्हापूर प्रांतांतही रूढ आहे. **रोकडें**–प्रत्यक्ष. **धडफुडे**—खरोखर.

## श्लोक ३३७

**ओळ २.** आल्या वाटेनेंच याला चुकवीन. ( परत पाठवीन ). **भुलवीन**—चुकवीन. **मुनि**—विश्वामित्र.

## श्लोक ३३८

रावण धनुर्भंग करण्यास जातो. हेळें–हेलया ( सं. ) सहज. **ओळ ४.** रावणाचें प्रचंड शरीर पाहून सीतेला वाटलें ‘ कदाचित् हा धनुर्भंग करील, तर याला हें धनुष्य न उचलो. ’

## श्लोक ३३९

“ पृथ्वी ही माझी खरोखरच जर आई असेल, तर मी पूर्वी तिला केलेली विनंति लक्षांत ठेवून, धनुष्यभंगाच्या वेळीं ती अशी योजना करील कीं, याला ( रावणाला ) दुष्टाला हें धनुष्य उचलूंच नये.” पहा–‘ लंकेशा नुचलो शरासन, ’ महीमातेसि सीता म्हणे । अंबे! मंगलमातरे ! सुखकरे तस्मै नमो ब्रह्मणे’ ॥—विठ्ठल–सीतास्वं. ४।३७.

## श्लोक ३४०

**विपारें**–विरूपानें. पहा–“ बळहीन, कळाहीन, मुद्राहीन, दीक्षाहीन ॥ लक्षणहीन, लावण्यहीन, अंगहीन, विपारा ॥ ”–दासबोध–२।३।३५. **पारे**–पारणें–मानवणें, हितावह होणें.

## श्लोक ३४१

रावण धनुर्भंगास सरसावतो. **हटेलें**—हटेला. ( विशे. )–दुराग्रही, हेकेखोर. **दोर्दंड**–बाहु. **ठोक फोडणें**—( कुस्ती करण्यापूर्वी किंवा

कोणतेंही मोठें ओझ उचलण्यापूर्वी मांडीवर ) आघात करणें, शड्डू थोपटणें.

### श्लोक ३४२

**मांडीखुटीं**—मेटाखुटीं—ढोपर टेकून बसण्याची रीत, महत्प्रयास, मेटाकुटीस येणें = शिकस्त करून कंटाळणें. **उभविणें**—उभे करणें. **मेढा**—धनुष्य.

### श्लोक ३४३

प्रचंड मेरु ज्याप्रमाणें उलथावा, त्याप्रमाणें तें प्रचंड धनुष्य उलथून रावणाच्या उरावर पडलें. **भोंकर**—' भों ' असा आवाज करणारें. **वासणें**—उघडणें. ही रावणाची फजीती थोडी बीभत्स आहे.

### श्लोक ३४४

**ओळ ४.** धनुर्भंगाचें फळ, विफळ ( व्यर्थ ) आहे, असें असूनही तो त्याची इच्छा करीत होता. रावणाला धनुर्भंगाचें फळ मिळणार नसूनही, तो त्याची आशा धरीत होता.

### श्लोक ३४५

रावण पडलेला पाहून तेथें जमलेल्या लोकांचे त्याला उद्देशून उद्गार. **ओळ २.** तूं आपल्या तोंडानें आपली लक्षखंडी कीर्ति बडबडत होतास. **मुरकुंडी घालणें**—मूर्च्छा इत्यादिकांमुळें, आकुंचित शरीर होऊन पडणें. **फट्ट**–( उपपद ) रांड, लंडी, फजीती इ. शब्दांशीं व तत्सदृश शब्दांशीं आधिक्यार्थी उपयोग करतात. **नामर्द**—( फा. ) भ्याड. **लंडी**–भित्रा. पहा—लंडी, लटिका, लबाड ॥ कुकर्मी कुटिल निचाड ॥—दासबोध. २।१।३३.

### श्लोक ३४६

रावणाच्या आतांच्या पडक्या व मागील चढत्या स्थितींतील विरोध स्पष्ट केला आहे. **देव इ०**–देवांना न जुमानणारा. **वानित इ०**–आपलेंच वर्णन करणारा, बढाईखोर. **सफेरत**–सफारत–सिफारत–Making peace (bet-

ween ) others,–Dictionary of Persian and English Languages. **कुक्कुरु**—कुत्रें. **तोता**–पोपट. **ओळ २.** कुत्र्याप्रमाणें किंवा पिंजऱ्यांतील पोपटाप्रमाणें ( आतां रावण ) गयावया करीत होता. **ओळ ३.** पूर्वी तों बोक्याप्रमाणें लोकांच्या नरडीस बसे. **भलतें**–विलक्षण, याचें कांहीं तरी भलतें व्हावें, हा मरावा.

### श्लोक ३४७

**कस्त**—दगदग, परिश्रम. पहा–‘खस्त खाणें.’ हें–हा बिचारा रावण.

### श्लोक ३४८

**हरामसंगें**—अन्यायानें. **निचरतें**–झरतें, पाझरतें ( बाहेर पडतें ).

### श्लोक ३४९

**ग्लांति**–नम्रपणाची प्रार्थना, काकुळत, विनवणी. पहा–‘ग्लांति लिहितां वेळोवेळां । उबग गोपाळा न मानावा ॥–एकनाथ रुक्मि. स्वयं. ४।४४. रावण तेथील लोकांना विनवणी करतो. **हेमपुरीचें**—लंकेचें. स्वतःला धनुष्यापासून सोडविणारास, रावणानें लंकेचें राज्य देऊं केलें आहे.

### श्लोक ३५०

**ओळ ४.** हातांत सांपडलेल्या ( पाण्याबाहेर काढलेल्या ) माशाप्रमाणें मी तळमळत आहे. **ओळी ३।४.** इतर लोकांचे उद्गार. मागचा पुढचा विचार न करतां या चपळ रावणानें, हें धनुष्य उचलिलें, पण हेंच जर याच्या उरावर आणखी एक क्षणभर राहील, तर हा प्राणास मुकेल.

### श्लोक ३५१

**मारिग**–मार्ग. याला कांहीं तरी चांगला मार्ग काढा.

### श्लोक ३५२

रावणाचें विनवणीचें भाषण. **भारेंकरोनि**—धनुष्याच्या भारानें. **ओळ २.** माझ्या दहा तोंडांच्या द्वारां रक्ताची वांति झाली. **वसनीं**–वस्त्रांत. **शंका**–लघुशंका. **राखा चुडे इ०**–घरांतल्या बायकोला चुडेदान द्या. मला

वांचवून तिचें सौभाग्य राखा. **निजधर्म इ०**—आपल्या धर्माची ( दया-धर्माची ) थोडी तरी भीड धरा.

## श्लोक ३५३

**ओळ २.** सर्व कळून तुम्हीं उगीच स्वस्थ बसत आहां. **सुढळा**—हालवा. **ओळ ४.** हा ( रावण ) शपथ घेऊन सांगतो कीं, मी पुन्हां तुम्हास पीडा देण्यास तुमच्या घरास यावयाचा कधीं नाहीं.

## श्लोक ३५५

**आरव**—ध्वनि, आवाज, शब्द. **वधावा**—नाश करावा. मारनाश करावा. **ओळ ४.** ' उगीच जातीचा ब्राह्मण ( रावण ) कां मारावा ' रावण ब्राह्मण होता. ब्राह्मणाला हकनाक मृत्यूच्या तोंडीं कां देता ? असा भाव.

## श्लोक ३५६

**बळासि करावें**—बळ चालवावें. **यांस**—धनुष्यास. " धनुष्यास उचलून वाटेल त्यानें सीतेचें पाणिग्रहण करावें, आपली त्याला कांहीं आडकाठी नाहीं " असें रावणाचें म्हणणें. **भाषितें इ०**–( तुम्हांला ) किती म्हणून खरें सांगावें !

## श्लोक ३५७

धनुर्भंगाच्या पणांत, रावण हटलासें पाहून जनक इतर राजांकडे पाहतो. पण कोणी पुढें येत नाहींसें पाहून, त्यांना उद्देशून बोलतो. **राजरेखा**–राजांची रांग.

## श्लोक ३५८

**कुनाम**—अपकीर्ति. **ओळी** २।४. या ' हनूमन्नाटकां ' तील खालील श्लोकांतील ओळींचें भाषांतर आहे, पहा—' नाकृष्टं न च टंकितं न नमितं नोत्थापितं स्थानतः । केनापीदमहो महद्धनुरिदं निर्वीरमुर्वीतलम् ॥ हनूमन्नाटक १।१०. **निर्वीर**–वीररहित. **उर्वीतल**—पृथ्वीतल.

### श्लोक ३५९

**मुनि इ०**—विश्वामित्राच्या डोळ्याची खूण. जनक, राजांना उद्देशून बोलत असतां विश्वामित्रानें, रामाला डोळ्याच्या खुणेनें सुचविलें. **ओळी ३।४.** राम धनुर्भंगास उठतो. **विभावें**—पराक्रमानें.

### श्लोक ३६०

राम प्रथमतः ब्राह्मण, शंकर पार्वती, सूर्य इत्यादींनां नमन करतो. **अवनिदेव**–ब्राह्मण. **सुंदरानें**–( रामानें. ) **शिवशिवा**—शंकर पार्वती. **दशशतकिरण**–सहस्रकिरण, सूर्य.

### श्लोक ३६१

**तयातें**–धनुष्यास. **चित्तिच्या इ०**–बुद्धिकौशल्यानें. **श्रवण अवधि**–कानापर्यंत. **वोढी**—ओढी, ताण. रामानें तें धनुष्य तीनदा कानांपर्यंत, ताणताणन ओढलें. **ओळ ४.** रामकृत धनुर्भंग.

### श्लोक ३६२

धनुर्भंगाच्या आवाजानें, ठिकठिकाणीं कशी घडामोड झाली तिचें वर्णन. **तटतटे**—तुटेपर्यंत ताणलें गेलें. **वैराट**—विराट–सर्वव्यापी पुरुष, भगवान्. **सुरकरटि**–ऐरावत. **वटे**–वठे-नम्र होई. **कपाटे देणें**–दारें लावणें ( भीतीनें ). पहा—' आले लंघुनि ब्रह्मगिरी कपाटे। तों पार्वतीनें दीधलीं कपाटें ॥' —उमाविलास ९. **कमठपुट**—कांसवाची, आदिकूर्माची पाठ. पहा–' नातरी पाठी करोनि निबर। रूप धरी कमठाचें ' –एकनाथ. रुक्मिणीस्वयंवर २।१३. **पुट**—पृष्ठ–पाठ. **निसटे**–डोळा चुकवून पळाला.

### श्लोक ३६३

**भारवीतें**—वाणीतें. **गज आरती**—श्रेष्ठ आरती. मागें ( श्लोक ५९ ) ' गजपत्रिका ' असें आलेंच आहे. वामन ज्याप्रमाणें कृष्णाच्या पलंगास ' श्रीपलंग ' म्हणतो त्याप्रमाणें. **राजदारा**–राजांगना. **आर्तिक्य**

—आरातिक = आरती-पहा—' आरातीकें घेउनी भक्त येती,'—साम. रुक्मि. ७।५६. **ओळ ४.** वराला ( रामाला ) आरती ओवाळली.

## श्लोक ३६४

**वरवंटी**—सुंदर, गोजीरवाणी, देखणी. ( सीता ). **परवंटी**—साडी नेसण्याचा एक प्रकार. लहान मुलीस साडीचा पदर न काढतां निऱ्या साडीच्या पदरापर्यंत काढून ती साडी पदरानेंच कमरेभोंवतीं आवळणें. **कंबुककंठी**—शंखासारखा गळा आहे अशी ( सीता ). **ओळ ४.** येथें सीतेनें रामास माळ घातली.

## श्लोक ३६५

**या वयाचें**—या लहान वयांतील. पहा' पुढें नसे रे रस या वयाचा'—सामराज.

## श्लोक ३६६

**जगदभिरामा**—जगदानंदकारका ! **पणाजित**—पण जिंकला आहे असा. **हनहतलामा**—( प्राकृत ) हनुहातलावा = हनुवटीला हात लावणारा (?). **अगणितधामा**—अतुल तेजाचा.

## श्लोक ३६७

**अविदितसारा**—कळलेली नाहीं शक्ति ज्याची असा. **नृपअवतारा**—राजाचा अवतार घेतला आहे असा.

## श्लोक ३६८

**मुनिजनशरणा**—मुनिजनांचें आश्रयस्थान. **निजसुखसदना**—आत्मसुखाचें केवळ माहेरघर असा. **कृतरिपुकदना**—केलेला आहे शत्रूचा नाश ज्यानें असा.

## श्लोक ३७०

**आगमसूत्रा**—वेदमूलग्रंथा. **भवसन्मीत्रा**—शंकराचा चांगला मित्र.

## श्लोक ३७२

**राजभारीं**—सर्व राजसमुदायासह. **सुत**—भरत शत्रुघ्नादि. पुत्रासह **कारभारी**—सुमंत्रादि प्रधान. **आयतीला**—तयारीला. **राय**—दशरथ.

## श्लोक ३७३

येथून लग्नांतील मंगलविधी व सोहाळे वर्णन केले आहेत. नागेश हा जोशीच असल्यामुळें, त्याला हे सर्व विधी बारकाईनें माहीत असणें साहजिक आहे. **ओळ १.** प्रथम गणपतिपूजन व नंतर वाङ्‌निश्चय. **भूपाळ**—दशरथ. **वाङ्‌निश्चय**—लग्नाचा विधिपूर्वक तोंडी करार. यावेळीं नवऱ्याकडून मुलीला कांहीं दागिने घालतात. **नग**—दागिने. **स्वश्रिया**—आपल्या ऐश्वर्यानें. **मुद्री**—अंगठी.

## श्लोक ३७४

**पंचक**—तिथि, वार, नक्षत्र, योग व करण, या पांचांस म्हणतात. **लग्न**—राशीचा उदय व त्याचा काळ, यांस ज्योतिषशास्त्रांत ही संज्ञा आहे. लग्नवेळेला कोणती शुद्ध राशि उदय पावते व ती वधुवरांना इष्ट आहे कीं कसें तें पाहतात. **त्यास**—जोशास. **लागे हरिद्रा**—हळद लागणें. **वेदिका**—ओटे. **देवप्रतिष्ठा**—देवक बसविणें.

## श्लोक ३७५

**रविमंडळार्धसमयीं**—भर बारा वाजतां. **ओळ ४.** जोशांनीं घटका घातली.

## श्लोक ३७६

**लक्षणदक्ष**—नियमदक्ष. **वराधावा**—वरधावा—लग्नाचे वेळीं वरास आणण्यासाठीं जाणारा वधूचा भाऊ किंवा तत्सदृश मनुष्य मिरवीत जातो, ती मिरवणूक. येथें वराचा भाऊच वरास आणण्यास आला आहे. **मूळीं**—प्रथमतः. **मूळसवें**—आमंत्रणाबरोबर. **रुखवतें**—रुखवत—लग्नांत नवरा मुलगा वधूच्या घराकडे लग्नासाठीं जाण्यापूर्वीं, वधूपक्षाकडून वरास व त्याच्या स्नेह्यांना जो उपहार देण्यांत येतो तो. **पदें**—रामाचे पाय.

### श्लोक ३७७

शिबिकें-पालखींत.

### श्लोक ३७८

राम, लग्नाला जात असतां निघालेल्या मिरवणुकीमागून चालणाऱ्या सुंदर स्त्रियांचें वर्णन करून, पुढील पांच श्लोकांत सुंदर स्त्रियांच्या जातींचीं लक्षणें दिलीं आहेत. **विद्री करणें**—विद्री करणें–कुरूप करणें. तेथील स्त्रिया, देवांगना, नागांगना व किन्नरी यांना कुरुप करीत [ ठरवीत ] होत्या. इतक्या त्या सुंदर होत्या. **सुजघना**—सुष्ठु जघनं यस्याः सा। **मरालस्वनी**— हंसाप्रमाणें मंजुळ स्वर आहे अशी.

### श्लोक ३७९

**चारुतराधरामृतधरा**—आपल्या सुंदर ओठांत अमृत धारण करणाऱ्या. **उरूपीवरा**—ज्यांच्या मांड्या मांसल आहेत अशा. **सूक्ष्मोदरा**—ज्यांचें पोट पातळ आहे अशा. **ओळ** ३।४ सुंदर स्त्रियांच्या, पद्मिनी, चित्रिणी, शंखिनी, व हस्तिनी अशा चार जाती आहेत. या जातींच्या स्त्रिया मिरवणुकीमागें होत्या.

### श्लोक ३८०

पद्मिनीच लक्षण. हा श्लोक अनंगरंग १।८,९. या श्लोकांवरून रचिला आहे. पद्य–" प्रांतारक्तकुरंगशावनयना पूर्णेंदुतुल्यानना। पीनोत्तुंगकुचा, शिरीषमृदुला स्वल्पाशना दक्षिणा॥ फुल्लांभोजसुगंधकामसलिला लज्जावती मानिनी। श्यामा कापि सुवर्णपंकजनिभा देवादिपूजारता ॥ ८ ॥ उन्निद्रांबुजकोशतुल्यमदनच्छत्रा, मरालस्वना। तन्वी हंसवधूगतिः सुललितं वेषं सदा बिभ्रती॥ मध्यं चापिवलित्रयांकितमसौ शुक्लांबराकांक्षिणी। सुग्रीवा शुभनासिकेतिगदिता नार्युत्तमा पद्मिनी " ॥ ९ ॥

### श्लोक ३८१

चित्रिणीचें लक्षण. पद्य–अनंगरंग १।१०, ११. " तन्वंगी गजगामिनी चपलदृक् संगीतशिल्पान्विता। नो ऱ्हस्वा न बृहत्तराथ सुकृशा

मध्ये, मयूरस्वरा ॥ पीनश्रोणिपयोधरा, सुललिते जंघे वहंती कृशा । कामांभो मधुगंधि सोष्ण्यमपि सा तु छोत्रतं (?) वत्सला ॥ १० ॥ कामागारमसांद्रलोमसहितं मध्ये, मृदुप्रायशो । बिभ्रत्युल्लसितं च वर्तुलमथो रत्यंबुनाढ्यं सदा । भृंगश्यामलकुंतलाथजलजग्रीवोपभोगेरता । चित्रा शक्तिमती रतेल्परुचिका ज्ञेयांगना चित्रिणी" ॥ ११ ॥ **सुवृत्त**—गोल.

## श्लोक ३८२

शंखिनीलक्षण. पहा अनंगरंग १।१२, १३, "दीर्घं बाहुशिरः कृशं पृथुमथो देहं वहंती तथा । पादौ दीर्घतरौ कटिं च बृहतीं स्वल्पस्तनी कोपिनी ।। गुह्यं क्षारविगंधिना स्मरजलेनाल्पेन सांद्रैः कचैः । आनीतं कुटिलेक्षणाद्रुतगतिः संततगात्रा भृशम् ॥ १२ ॥ संभोगे करजक्षतानिबहुशो यच्छत्यनंगाकुला । न स्तोकं नच भूरि भक्षति सदा प्रायोभवेत्पित्तला ॥ स्रग्वस्त्राण्यरुणानि वांछति दयाहीना च पैशुन्यभृत्पिंगा दुष्टमनाश्च घर्घरमहारूक्षस्वना शंखिनी" ॥ १३ ॥ **करजक्षतें**—नखक्षतें.

## श्लोक ३८३

हस्तिनीलक्षण. पहा—अनंगरंग १।१४. "स्थूला पिंगलकुंतला बहुभुक्क्रूरा त्रपावर्जिता । गोरांगी कुटिलांगुलीकचरणा, ऱ्हस्वा नमत्कंधरा ॥ बिभ्रत्येभमदांबुगंधिरतिजं तोयं भृशं मंदगा । दुःसाध्या सुरतेतिगद्गदरवा स्थूलोष्ठिका हस्तिनी ॥ १४ ॥ **ढळतसे**—वाकलेली. **ग्रीवाखर्व**—जिची मान बसकी आहे अशी.

## श्लोक ३८४

वरातीच्या मिरवणुकींतील रामाला पाहण्यास नगरींतल्या स्त्रिया उत्सुकतेनें धावतांना, त्यांची कशी धांदल व त्रेधा उडाली, याचें वर्णन यापुढें केलें आहे. ३८४–३८९ या श्लोकांतील वर्णनावर रघुवंश सर्ग ७ यांमध्यें येणाऱ्या, अशाच प्रसंगाच्या वर्णनाची छाया पडली आहे. अज व इंदुमती यांची मिरवणूक पाहण्यास येणाऱ्या, नगरांतल्या स्त्रियांची धांदल

जी कालिदासानें तेथें वर्णन केली आहे, ती नागेशाच्या दृष्टीसमोर होती, असें दिसतें. **भुक्तिकरिता**—भोजनाकरितां. **ओळी** १।२. पहा—' बभूवुरित्थं पुरसुंदरीणां त्यक्तान्यकार्याणि विचेष्टितेनि '।—रघु. ७।५.

**श्लोक ३८५**

**भुलोनि**—फसून. **अभ्यंग**—स्नान.

**श्लोक ३८७**

**ओळ,** पहा—' विलोचनं दक्षिणमंजनेज संभाव्य तद्वंचितवामनेत्रा तथैव वातायनसंनिकर्षे ययौ शलाकामपरा वहन्ती '॥—रघु. ७।८. **सळे**—सळई ( शलाका. )

**श्लोक ३८८**

**ओळी** १।२. तुलनार्थ पहा—' जालांतरप्रेषितदृष्टिरन्या प्रस्थानभिन्नां न बबंध नीवीम् । नाभिप्रविष्टाभरणप्रभेण हस्तेन तस्थावलंब्य वासः ' ॥ रघु. ७।९. **ओळ ३.** वाद्यें वाजत असल्यामुळ भांबावून जाऊन, एकीनें मुलाच्या ऐवजीं कुत्र्यास कडेवर घेतलें. **ओळ ४.** मोर ओरडत असतां मूलच ओरडत आहे असें समजून ' उगी हां !' असें म्हणून मोरालाच स्तनपान देणारी.

**श्लोक ३८९**

**ओळ** १।२. पहा— ' प्रसाधिकालंबितमग्रपादमाक्षिप्य काचिद्द्रवरागमेव । उत्सृष्टलीलागतिरागवाक्षादलक्तकाङ्कां पदवीं ततान ' ॥—रघु. ७।७.

**श्लोक ३९०**

या श्लोकाला समानार्थक पहा—" स्थाने वृता भूपतिभिः परोक्षैः स्वयंवरं साधुममंस्त भोज्या । पद्मेव नारायणमन्यथासौ लभेत कांतं कथमात्मतुल्यम् ॥ १३ ॥ परस्परेण स्पृहणीयशोभं न चेदिदं द्वंद्वमयोजयिष्यत् । अस्मिन्द्वये रूपविधानयत्नः पत्युः प्रजानां वितथोऽभविष्यत् " ॥१४॥ रघु. ७.

**श्लोक ३९१**

नवरा मुलगा आल्यावर लग्नमंडपांत प्रवेश करतांना त्याच्यावरून दहि-भात ओंवाळून टाकण्याची चाल आहे. **राजवनिता**—जनकपत्नी.

## श्लोक ३९२

नवऱ्यापुढें जीं फळें आणून ठेविलीं, तीं सांगतांना, मागील श्लोक ९५ ९६ व ९७ यांची पुनः पुनरुक्ति झाली आहे. तरी तेथें दिलेल्या टीपा पहाव्या. **बिही**—एक आंबटगोड फळ. **नाबद**—खडीसाखर, पहा—' व्यासवचन इक्षुदंडु। गाळुनि सरस सारांश गोडु। देशभाषा वळिले लाडु। नाबदेचे आवडी। ' मुक्तेश्वर सभापर्व १।१९. ' उचचि नाबद साकल खोबलें, खजुल देऊनि गाय बलें बलें। '—वामन—द्वारकाविजय ३।२१.

## श्लोक ३९३

**बुद्धुरे**—' बंधुरे ' असें असावें. बंधुर—सुंदर. **फालसें**—एक वृक्ष व त्याचें फळ; उत्तर हिंदुस्थानांत याची विशेष उत्पत्ति होते. पक्क फळें पिंपरीच्या फळासारखीं असून तीं खातात. उन्हाळ्यांत या फळांचें सरबत करतात. [ सं. परुष ]. **खिसमिसें**—बेदाणा. **सेउपें**—शेपें–सेबें,–सेब An apple ( Richardson ). **लसलसी**—रसरसीत, रसभरित.

## श्लोक ३९४

येथून दशरथानें सीतेच्या अंगावर घातलेल्या दागिन्यांची यादी आली आहे. ती पूर्वी १९५–२१८ श्लोकांत दिलेल्या दागिन्यांची पुनरुक्ति असल्यानें, तेथें दिलेल्या टीपा पहाव्या.

## श्लोक ३९७

**सरी मुरडिवा**—मुरडीची, मुरड घातलेली. गळ्यांत घालण्याची सोन्याची सरी.

## श्लोक ४०१

**सळें**—अभिमानानें

## श्लोक ४०२

**चादर**—' चादरः स्यात् प्रावरणी'—राजव्य.कोश. **जरी**–जरीच्या.

## श्लोक ४०३

पुरोहितानें लग्नासाठीं सीतेला घरांतून आणिलें. पण ती येऊन बसते तोंच ' अगोदर गणपतिस्थापना कीं कलशस्थापना ? ' असा ब्राह्मण मंडळींत वाद होऊन भांडणें झालीं. **महाकळस**—तांब्याची किंवा घागरीची पूजा. पहा—' कृष्णपुरोहित निष्काम । न करिती कलश-पूजेचें काम ॥ '—एकनाथ रुक्मिणीस्वयं. १५।६३.

## श्लोक ४०४

हें ब्राह्मणांचें क्षुल्लक गोष्टीवरचें भांडण इतकें विकोपाला गेलें कीं, परस्पराला शिविगाळीपर्यंत पाळी आली. क्षुल्लक कारणाकरितां ही भिक्षुक मंडळी कशी भांडतात, हें नागेशानें सूक्ष्मतेनें पाहिलेलें आहे. शिवाय तोही स्वतः जोशीच. **उश्वसती**—जोराचा श्वास बाहेर टाकीत. मनुष्य रागांत असतां त्याचा श्वासोश्वास जोरानें वाहतो. **वर्मे**—उणेपणा. **ओळ ३.** शिव्या देण्याचा प्रकार, आतांप्रमाणेंच ग्राम्य दिसतो. नागेशाच्या चंद्रावळी वर्णनांतही अशा शिव्या आल्या आहेत. **गाधा**–गद्ध्या. **पढलास**–शिकलास.

## श्लोक ४०५

**भुंकसी**–( कुत्र्याप्रमाणें ) भुंकतोस. **ओनामाही**–शिक्षणाचा आरंभ या अक्षरांनीं होतो. अतएव सर्वच गोष्टींचा आरंभदर्शक शब्द. हल्लीं आपण ' श्रीगणेशा ' म्हणतों. **एकाक्षरीं**—'एकाक्षरं परब्रम्ह'–ॐकार, ओनामा ही न जाणणारा ॐकाराचा अर्थ कसा जाणणार ! **स्थूळास**—स्थूलदेहास. " परब्रम्हाकडे पहावयाचें सोडून स्थूलदेहाकडेच तुझी दृष्टि आहे. " असा भाव. **मिथ्या नव्हे मानसी**—हा देह मिथ्या नव्हे ( खोटा नाहीं ) असें तूं मानतोस. शांकर वेदांताप्रमाणें ' ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या ' अशी तुझ्या मनाची स्थिति असावयास पाहिजे. पण तूं देहादिविषय खरेच मानतोस. यावरून 'तूं ब्रह्मैक्य पावला नाहींस' असा अर्थ.

## श्लोक ४०६

**यातें सोडुनि थोर**—या श्रेष्ठ आधारास ( गणपतीस ) सोडून. **पोर कळसा**—क्षुद्र, लहान, अशा कलशास ( तांब्यास ). अगोदर गणपति-स्थापना कां कलशस्थापना हा वाद शेवटीं मिटून, गणेशस्थापना हीच प्रथम, नंतर कलशस्थापना असा निर्णय लागला. **क्षितिसुरां**—ब्राम्हणांना.

## श्लोक ४०७

**मधुपर्क**—विवाहसमयीं नवरा मुलगा दाराशीं आला असतां, किंवा तसाच कोणी सन्मान्य शिष्ट घरीं आला असता, यजमान त्याचे पाय धुऊन त्याची पूजा करतात, तो विधि. पहा—‘ वर वरिष्ठ कृष्णदेवो । मनीं धरूनि हाच भावो । मधुपर्कविधी पाहा वो । पूजाविधान करीतसे’ ॥ एकनाथ रुक्मिणी. ६।५. **अंत्रपाट**—नवरानवरीच्या मध्यें लग्नाचे वेळीं जें वस्त्र धरतात तें. पहा—‘ कैचा अंत्रपाट जाण । कवण म्हणेल सावधान’॥ —एकनाथ रुक्मिणी. ४।३९. ‘ जडत्व भ्रांतीचें कपट सरलें अंत्रपट तो ।’ —वामन द्वारकाविजय १।२६.

## श्लोक ४०८

**हलपला**—गडबड या अर्थी. **गल्बला**—गलबला = कल्ला, गडबड. हल्बलागल्बला, हा जोडशब्द ‘ गोंधळ ’ या अर्थी रूढ आहे. प्रचलित मंगळाष्टकांतही ‘ वाजंत्री बहु गल्बला न करणें कुर्यात्सदामंगलम् ’ असा चरण आढळतो. या मंगलाष्टकांपैकीं, पहिल्यांत, गोंधळ न करण्यां-बद्दल बजावलें आहे. **एकच सावधान**—‘ सावधान ’ हा शब्द.

## श्लोक ४०९

या दुसऱ्या मंगळाष्टकांत गणपतीनें मंगल करावें अशी इच्छा प्रकट केली आहे. **ओळ ३.** जो आपल्या सोंडेच्या हालचालीनें आपल्या मनांतील भाव व्यक्त करतो. **मोरेश्वरीं**—पुणें जिल्ह्यांतील मोरेश्वर या गांवीं. जेजुरीपासून १७ मैलांवर हा गांव करा नदीच्या काठीं आहे. तेथें गणपतीचें प्रसिद्ध स्थान आहे. नागेशाच्या काळीं हा गांव गणपतीच्या स्थानाबद्दल प्रसिद्ध असावा.

## श्लोक ४१०

हें मंगलाष्टक ब्रह्मदेवाला उद्देशून म्हटलें आहे. **विता**—(सृष्टीचा) उत्पत्तिकर्ता. **सावित्री**—ब्रम्ह्याची पत्नी.

## श्लोक ४११

यांत विष्णूला आळविलें आहे, व त्याच्यापासून मंगलाची अपेक्षा केली आहे. **नृपालन**—मनुष्यांचें पालन. ब्रह्मदेवाकडे उत्पत्ति हें काम तर विष्णूकडे ' स्थिति, ' रक्षण ही कामगिरी आहे.

## श्लोक ४१२

शेवटीं शंकराचें वर्णन करून वरीलप्रमाणें त्याच्याकडूनही मंगलाची याचना केली आहे. **रामाला स्मरतो**—शिव हा रामाचें ध्यान करीत असतो, अशी प्रसिद्धि आहे. **अंतर्पटा साधिजे**—वधूवरांमध्ये अंतःपट ठराविक मुहूर्तघटिकेपर्यंत धरतात. तो साधणें म्हणजे मुहूर्त साधणें, बरोबर ठराविक घटिकेस लग्न लागणें.

**करा**—कऱ्हा = लग्नांत पाणी भरलेल्या तांब्यांत अथवा पंचपात्रींत आंब्याच्या डहाळ्या, पानें टाकून त्यावर शेंडी वर केलेला नारळ ठेवतात. या भांड्यास कऱ्हा म्हणतात, व तो नवरीच्या व नवऱ्याच्या बहिणीच्या (किंवा दुसऱ्या स्त्रीच्या) हातांत असतो, आणि तो कऱ्हा घेऊन ती आपल्या बहिणीच्या ( वधूच्या ) अगर भावाच्या (वराच्या) मागें उभी असते.

## श्लोक ४१४

कन्यादानाचें महत्त्व पृथ्वीदानाइतकें मोठें आहे. **आव्याला**—आवा-बोहल्याच्या चार कोपऱ्यास ज्या चार मडक्याच्या उतरंड्या असतात त्या. यालाच वही म्हणतात. या वहीची पूजा करतात. **विद्वज्जना इ.**-आपलें काव्य विद्वानांना मान्य झालें, असा नागेशाचा आत्मविश्वास आहे.

# कठिण शब्दांचा कोश.

**अ**

अखर्व—मोठा

अचाटी—चावट, फाजील

अनुभाव—शक्ति, तेज

अपाय—आपत्ति

अमोघ—फलदायी

अहारपोळी—निखाऱ्यावर भाजलेली पोळी

**आ**

आकारणें—बोलावणें

आभास—तेज

आरसी—लहान आरसा

**उ**

उटाळी—तरफ

उमटणें—पुढें येणें

**अं**

अंबरसा—गळयांतील एक दागिना

**क**

करबाड—कडब्याचा गाळ

कसाचा—जोरदार

कुडपुणी—लहान जाड काठ्या

कुऱ्हाडी—कुबडी

कोंडणें—कुंठित होणें

**ख**

खटाळणें—खनपटीस बसणें

**ग**

गटाळी—गिळी (?)

गाटी—हट्टी, हेकड

गाठी—माळ

**च**

चार—हलकट, चावट, लुच्चा

चाळणें—शोधणें.

**ज**

जनणें—जन्मणें

जेहर—रत्नजडित, सोन्याचा अगर रुप्याचा पायांतला दागिना

जेहगीर—तिरंदाजांनीं उजव्या अंगठ्यांत घालण्याची हाडकाची केलेली आंगठी

**झ**

झांक—मारा

झासा—तळमळ

**त**

तगट—भरजरी वस्त्र

तटतटणें—ताणले जाणें

तलगा—तरुणी

तारे—नखरा

तोंगलें—बुगड्या

**थ**

थोंट—दांडगी

**ध**

धडफुडें—खरोखर

धम्मिल्ल—अलंकारयुक्त वेणी

धिषण—बृहस्पति

**न**

निशाणें—रणभेरी डंका.

**प**

परवंटी—साडी नेसण्याचा एक प्रकार
परिभावणें—लाजविणें
परिशंकणें—भिवविणें
पवाडे—पराक्रम
पाळी—कांठ
पेलणें—लोटणें, ढाकणें
प्रमाणिक—अधिकारी पुरुष

**फ**

फटाळणें—फटकळ बोलणें

**ब**

बरग—गुरांचा मसुऱ्या रोग
बरवंटी—सुंदर गोजिरवाणी
बांका—पटाईत मनुष्य ( शिपाई )
बागदार—गुती
बाड—शस्त्राची धार
बांदरी—वानरी

**भ**

भातुकें—खाद्य
भार—समूह
भावणें—चिंतणें

**म**

मरुज—एक प्रकारचा सुवास
मुदिर—मेघ
मुदी—आंगठी
मेढा—धनुष्य
मोहरा—मणि

**र**

रळीया—रळी—विनोद

**व**

वटणें—नम्र होणें
वाहा—गति
विपार—विरूप
वोजा—सहज
वोपा—तेज

**स**

सटाळणें—झुकांडीं देणें
सराईत—पटाईत
सळें—अभिमानानें
सादर—तयार
सारस—कमल
सिरताज—प्रमुख
सिंतरणें—फसविणें, चुकविणें
सुरगोप—किरमिजी रंगाचा एक किडा ( इंद्रगोप )
संचणें—राहणें

**ह**

हटेला—दुराग्रही
हयमल—हयकुल—स्त्रियांच्या गळ्यांतील एक दागिना
हळु—हलकें
हुमिया—हुमा—घोड्याच्या डोक्यावरील तुरा
हेकुडी—हट्टी
हंबेल—पुष्पमाला